







॥ श्री ॥

आता हे आमचे
भाषाशुद्धीचे
कार्य
आपण पुढे
चालवा

# भाषाशुद्धि

# भा षा शु द्धि

कृते म्लेच्छोच्छेदे भुवि निरवशेषं रविकुला-
वतंसेनात्यर्थं यवनवचनैर्लुप्तसरणीम् ।
नृपव्याहारार्थम् स तु विबुधभाषां वितनितुं
नियुक्तोऽभूदविद्वान्नृपवरशिवच्छत्रपतिना ।। १ ।।
सोऽयं शिवच्छत्रपतेरनुज्ञाम्
मूर्धाभिषिक्तस्य निधाय मूर्ध्नि
अमात्यवर्गो रघुनाथनामा
करोति राजव्यवहारकोशम् ।। २ ।।
विपश्चित्संमतस्यास्य किं स्यादज्ञविडंबनैः ।
रोचते किं क्रमेलाय मधुरं कदलीफलम् ।। ३ ।।

**भावार्थ** :— या आर्यावर्तात म्लेच्छसत्तेचा अुच्छेद करून स्वतंत्र हिंदु राज्य स्थापित केल्यानंतर श्री शिवछत्रपतींनीं आपल्या विद्वान अमात्यवर्गांतील ज्या रघुनाथ पंडित नामक विख्यात पंडिताला आज्ञा केली कीं यवनभाषेच्या वर्चस्वानें अगदीं लुप्तप्राय झालेल्या आपल्या स्वकीय विबुधभाषेचें पुनरुज्जीवन करण्यासाठीं बहिष्कार्य शब्दांस संस्कृत प्रतिशब्द दिलेला राजव्यवहारापुरता अेक कोश करावा,—तो रघुनाथ पंडित, त्या आज्ञेनुरूप, हा राजव्यवहारकोश रचीत आहे.

श्री शिवछत्रपतीसारख्या अनेक थोर आणि ज्ञानी पुरुषांना संमत असलेल्या ह्या प्रयत्नास मूर्ख लोक जरी हंसले तरी त्यांस कोण भीक घालतो ! कांटे खाणाऱ्या अुंटाला मधुर अशा केळ्याची रुची ती काय असणार ?

**श्री रघुनाथपंडितकृत राजव्यवहारकोशाचा अुपोद्घात.**

# भा षा शु द्धि

(हिंदु हृदय सम्राट स्वा. वीर सावरकरांचे भाषाशुद्धिविषयक निवडक लेख)

(आवृत्ती दुसरी)

महाराष्ट्र राज्य दिन, शालिवाहन संवत १९०३
१ मे १९८१

प्रकाशक :

महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळ,
५ वा मजला, मंत्रालय, मुंबअी-४०००३२







मुद्रक :

व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय,
वाअी (जि. सातारा)



प्रथम आवृत्ती :

मकर संक्रांत, शके १८७९
जानेवारी अिसवी सन १९५८



पुनर्मुद्रण :

महाराष्ट्र राज्य दिन
शालिवाहन संवत् १९०३
१ मे १९८१



मूल्य :

किंमत रु. २०-००

# भाषाशुद्धीचीं मूलतत्वें

१. गिर्वाण भाषेंतील साराचेसारा संस्कृत शब्द संभार आणि संस्कृतनिष्ठ अशा तामिळ, तेलगु ते आसामी, काश्मीरी, गौड, भिल्ल बोलीपर्यंत ज्या आमच्या प्रांतिक भाषा भगिनी आहेत त्या सर्वांतील मूळचे प्रांतिक शब्द हे सर्व आमच्या राष्ट्रभाषेच्या शब्दकोशाचें मूलधन, स्वकीय शब्दांचे भांडवल होय.

२. ह्या आपल्या राष्ट्रीय शब्दभांडारांत ज्या वस्तूंचे, विचारांचे वाचक शब्द होते वा आहेत वा निर्मितां येतात त्या अर्थाचे अुर्दू, अिंग्रजी प्रभृति परकीय शब्द वापरू नयेत. जर तसे परकीय शब्द आपल्या पूर्वींच्या ढिलाअीमुळें आपल्यांत घुसले असतील तर त्यांना हुडकून काढून टाकावें. अद्यतन विज्ञानाची परिभाषा नवे नवे संस्कृत–प्राकृतोत्पन्न शब्द पाडून व्यक्तविली जावी.

३. परंतु ज्या परदेशी वस्तु अित्यादि आपल्याकडे नव्हत्या, त्यामुळें ज्यांना आपले स्वकीय जुने शब्द सांपडत नाहींत आणि ज्यांना त्यांच्या त्या परकीय शब्दां-सारखे सुटसुटीत स्वकीय शब्द काढणें दुर्घट जातें असे परकीय शब्द मात्र आपल्या भाषेंत जसेचे तसे घेण्यास प्रत्यवाय नसावा. जसें : बूट, कोट, जाकीट, गुलाब, जिलबी, बुमरॅंग, टेबल, टेंनिस अित्यादि. तथापि अशा नव्या वस्तु आपल्याकडे येतांच त्यांना कोणी स्वकीय नांवे देअून तीं रुळवून दाखवील तर अुत्तमच.

४. त्याचप्रमाणें जगांतील कोणच्याहि परकीय भाषेंत जर अेखादी शैली वा प्रयोग वा मोड ही सरस वा चटकदार वाटली तर तीहि आत्मसात करण्यास आडकाठी नसावी.

# अनुक्रमणिका

(ह्या पुस्तकांतील पहिल्या ५० पानांपर्यंतच्या छेदक-क्रमांक टाकून लिहिलेल्या लेखाची अनुक्रमणिका, १९२६ मध्ये प्रसिद्ध झालेल्या 'मराठी भाषेचें शुद्धीकरण' ह्या पुस्तकांत दिल्याप्रमाणेंच, येथें विषयवार छेदक-क्रमांकाप्रमाणें दिली असून त्यापुढील लेखांचीं अनुक्रमणिका लेखाचें नांव आणि पृष्ठ याप्रमाणें दिली आहे ... –प्रकाशक)

## विषयवार अनुक्रमणिका

छेदक क्रमांक

छेदक क्रमांक

छेदक क्रमांक

छेदक क्रमांक



लेखाचें नांव – पृष्ठ क्रमांक



● ●

# प्रस्तावना

( सन १९५८ च्या आवृत्तीची )

या पुस्तकांत आम्हीं वीर सावरकरांच्या भाषाशुद्धि या विषयावरील कांहीं निवडक लेखांचें पुनर्मुद्रण करीत आहों. ह्यांतील बहुतेक लेखांचें पुस्तकरूपानें हें तिसरें पुनर्मुद्रण आहे यावरून या लेखांविषयींची मराठी वाचकवर्गाला वाटणारी अभिरुचि आणि आवश्यकता व्यक्त होत आहे.

त्यांतहि आतां भाषाशुद्धीचा प्रश्न हा केवळ मराठी भाषेपुरताच मर्यादित राहिलेला नसून त्याला अखिल भारतीय स्वरूप प्राप्त झालें आहे. हिंदी हीच भारताची राष्ट्रभाषा ज्या दिवशीं ठरली त्या दिवसापासूनच हिंदी म्हणजे कोणती? संस्कृतनिष्ठ हिंदी कीं अरबी–फारशी–निष्ठ 'यानें हिंदुस्तानी'? हा वाद विशेषतः अुत्तर हिंदुस्थानांत कडाक्यानें चालू झाला आहे. राष्ट्रभाषा हिंदीला अिंग्रजी प्रभृति प्रगत परराष्ट्रीय भाषांअितकेंच शब्दसंपन्न आणि विचारप्रदर्शनक्षम करायचें तर तिला संस्कृतनिष्ठतेवरच अवलंबून रहाणें अपरिहार्य आहे. त्यासाठी संस्कृतनिष्ठ नवे नवे पारिभाषिक आणि व्यावहारिक सहस्रावधि शब्द अुद्भावून भाषापंडित प्रवर डॉ. रघुवीरांनीं आंग्ल–हिंदी–प्रशासन–शब्दकोश या नांवाचा अेक नवीन प्रचंड कोशहि प्रकाशित केला आहे. परंतु त्यांनीं अुद्भाविलेल्या संस्कृतनिष्ठ शब्दांवर आणि संस्कृतनिष्ठतेच्या तत्त्वावरहि सामान्य शिक्षित अशिक्षित वर्ग हिंदी प्रांतांतूनहि ते सर्व आक्षेप घेअूं लागला आहे कीं जे वीर सावरकरांनीं सन १९२४ च्या वर्षीं भाषाशुद्धीची चळवळ जेव्हां प्रकटपणें हातीं घेतली तेव्हांपासून मराठी भाषेच्या शुद्धीकरणाच्या त्यांनीं चालविलेल्या धुमधडाक्याच्या प्रचारावर आपल्या अिकडे प्रथम प्रथम घेण्यांत आलेले होते. त्या त्या आक्षेपांची अत्यंत तर्कशुद्ध, प्रभावी आणि परिणामकारक प्रत्युत्तरें त्या त्या वेळीं वीर सावरकरांनीं लिहिलेल्या अनेक लेखांतुन जीं दिलेलीं होतीं तींच प्रत्युत्तरें राष्ट्रभाषा जी संस्कृतनिष्ठ हिंदी तिच्यावरहि आज घेण्यांत येणाऱ्या आक्षेपांचे आमूलात् निरसन

करण्यासाठीं रामबाण मात्रेसारखीं अुपयोगीं पडणारी आहेत. वास्तव त्यांच्या त्या लेखांतील ह्या कांहीं निवडक लेखांचें पुनःमुद्रण करणें राष्ट्रभाषेच्या दृष्टीनेंहि आज आवश्यक झाले आहे.

यद्यपि वीर सावरकरांनीं आपल्या भाषाशुद्धीवरील पहिल्या पुस्तकास 'मराठी भाषेचें शुद्धीकरण' हें नांव दिलें होतें तथापि त्याच पुस्तकांत त्यांनीं ह्या भाषाशुद्धीच्या प्रश्नास पुढें होणारी राष्ट्रभाषा संस्कृतनिष्ठ हिंदी तिलाहि तोंड द्यावें लागेल हें स्पष्टपणें सांगितलें होतें. तें 'मराठी भाषेचें शुद्धीकरण' हें पुस्तकहीं आतां दुर्मिळ झाल्यामुळें ह्या लेखसंग्रहांत प्रारंभींच पुन्हा छापलें आहे.[1] पुढें जेव्हां हिंदी ही राष्ट्रभाषा आपल्या भारतीय राज्यघटनेंत ठरली आणि वीर सावरकरांनीं अपेक्षिल्याप्रमाणें हिंदी कीं 'याने-हिंदुस्थानी' हा वाद अुपस्थित झाला तेव्हां त्या विषयाबरहि त्यांनीं स्वतंत्र लेख लिहिले. त्यांपैकीं अेक महत्त्वाचा लेख 'आमची राष्ट्रभाषा आणि भाषाशुद्धि' आम्हीं ह्या पुस्तकांत[2] छापला आहे.

ह्या भाषाशुद्धीच्या प्रश्नावर वीर सावरकरांनीं लिहिलेल्या कित्येक लेखांचीं भाषांतरें हिंदींतहि प्रथमपासूनच प्रसिद्ध होत आलेलीं आहेत.

## भाषाशुद्धीच्या चळवळीचा प्रभाव

आपल्या भाषेंत अनवश्यक परकीय शब्द आणि त्यांतहि अुर्दू आणि अिंग्रजी शब्द ह्यांचा वापर करणें ही गोष्ट आपल्या स्वाभिमानास कलंक लावणारी आहे, भूषणास्पद तर नव्हेच नव्हे ह्या सत् प्रवृत्तीचा प्रभाव वीर सावरकरांनीं सन १९२४ च्या वर्षापासून चालविलेल्या ह्या भाषाशुद्धीच्या विविधांगी चळवळीमुळें बृहन् महाराष्ट्र जनतेच्या मनावर किती अढळपणें पडला आहे, आणि त्यामुळें मराठीच्या शब्दसंपत्तींत किती बहुमोल स्वकीय शब्दांची भर पडलेली आहे ह्याची कांहीं जाणीव प्रस्तुतच्या पिढीस येण्यासाठीं पूर्वींची अेक दोन अुदाहरणें तरी सांगणें आवश्यक आहे आणि तितकें ह्या प्रस्तावनेपुरतें पर्याप्तहि होणारें आहे.

पहिल्या प्रकारचें उदाहरण 'लायब्ररी' 'आणि' 'रिडींगरूम' ह्या दोन अिंग्रजी शब्दांचें घेअू. अिंग्रजी राज्य चालू झाल्यानंतर आपल्याकडे प्रथम मोठमोठ्या नगरांतून

---

१. पृष्ठ १ ते ५०.

२. पृष्ठ ८३.

आणि नंतर लहानसहान गांवांपर्यंतहि नवीन प्रकारचीं ग्रंथालयें आणि वाचनालयें निघालीं परंतु कांहीं अंशीं ह्या अुपयुक्त संस्थांच्या प्रतिष्ठेस अिंग्लिश नांवेंच यथार्थपणें शोभतात अशा भ्रांत समजुतीमुळें आणि कांहीं अंशीं आवश्यक अशा अिंग्रजी संस्थांचें अनुकरण करतांना अगदीं अनवश्यक अशीं त्यांचीं हीं अिंग्लिश नांवें ठेवलीं गेल्यामुळें त्या बहुतेक ग्रंथालयास नि वाचनालयांना 'नेटीव्ह जनरल लायब्ररी', 'जनरल लायब्ररी' किंवा 'रिडींग रूम' हींच अिंग्लिश नांवें सर्वत्र वापरलीं जात असत. नागपूर विदर्भासुद्धां साऱ्या बृहन् महाराष्ट्रांतील मुम्बअीसारख्या महा नगरापासून तों अगदीं कोंकणातल्या वेंगुर्ल्यासारख्या 'तालुका' गांवांपर्यंत वाचनालय किंवा ग्रंथालय म्हटलें कीं त्यावर 'नेटीव्ह जनरल लायब्ररी' किंवा 'जनरल लायब्ररी' अशा विस्तृत फलकाचें शिरोभूषण हटकून टांगलेलें असे. ह्याचें प्रमाण त्या बहुतेक वाचनालयांच्या १९२४ पर्यन्तच्या प्रतिवृत्तांतून कोणालाहि पहावयास मिळेल. परंतु त्या नंतर जे अनवश्यक परकीय शब्द प्रतिष्ठेच्या खोट्या कल्पनेमुळें वापरले जातात त्यांच्यांत ह्या तिन्हीं अिंग्रजी शब्दांचाहि अंतर्भाव करून त्यावर वीर सावरकरांच्या टीकेचा मारा होअूं लागला. पुढें वीर सावरकरांच्या रत्नागिरीहून झालेल्या सुटकेनंतर त्यांचे दौरे हिंदुस्थानभर चालू झाले. त्या दौऱ्यांतून अनेक ठिकाणीं त्यांना मोठमोठ्या नगरांमधील 'जनरल लायब्ऱ्या' किंवा 'रिडींग रूम्स' ह्या संस्थांचे वतीनें जेव्हां जेव्हां मानपत्रें देण्यांत येत तेव्हां तेव्हां आपल्या लेखी अभिप्रायांत नि व्याख्यानांत हीं नांवें बहिष्कारून त्या संस्थांना 'ग्रंथालयें', 'पुस्तकालयें' किंवा 'वाचनालयें' अशीं स्वकीय नांवें ठेवावीं असें ते आग्रहानें सुचवीत चालले. परंतु पन्नास पन्नास वर्षांच्या जुन्या संस्थांचीं परकीय असलीं तरीं जुनाटपणामुळें अधिरूढ नि अधिकृत वाटणारीं तीं नांवें पालटणें हें अेकादें साहस करण्यासारखें त्या संस्थांना जड वाटे. हळुहळू जनतेच्या मनावर भाषाशुद्धीचा जसजसा प्रभाव पडत गेला तसतसा ह्या तिन्ही शब्दांवर बहिष्कार घालून ठिकठिकाणच्या ग्रंथालयांनीं आणि वाचनालयांनीं आपलीं वरील स्वकीय नांवें वापरण्याचा निश्चय केला. परिणामीं आज नागपूर विदर्भासह साऱ्या बृहन् महाराष्ट्रांतील मुंबअी सारख्या महानगरापासून तों कोकणांतील वेंगुर्ल्या पर्यंतच्या तालुका गांवापर्यंत जिकडे पहाल तिकडे 'ग्रंथालय', 'वाचनालय' अशा संस्कृतनिष्ठ नांवाच्या पाट्या झळकत आहेत. वेंगुर्ल्याचें नांवच निघालें म्हणून हेंहि सांगून टाकतों कीं अलिकडेच साजऱ्या झालेल्या अेका महोत्सवाचे छापील प्रतिवृत्तात वीर सावरकरांच्या आदेशाप्रमाणें ह्या जनरल लायब्ररीचें नांव पालटून नगरवाचनालय असें नांव ठेवलें गेलें असा अुल्लेख केलेला आहे.

## मराठी भाषेच्या शब्दसंपत्तींत भाषाशुद्धीनें टाकलेली बहुमोल भर

भाषाशुद्धीच्या आंदोलनामुळें जो दुसरा लाभ झाला तो म्हणजे नुसते जुने घुसलेले अनेक अनवश्यक परकीय शब्द बहिष्कारले गेले अितकेंच नसून नवीन परकीय शब्द विशेषतः अुर्दू आणि अिंग्रजी ह्यांना, आपल्या भाषेंत सहसा लेखक-वर्गाकडून प्रवेश मिळेनासा झाला. त्या परकीय शब्दांचे ठायीं नवे नवे स्वकिय शब्द पाडून ते वापरण्याची जाणती अहमहमिका चालू झाली. भाषाशुद्धीचे झुंजार धुरंधरत्वास शोभण्यासारखाच विक्रम त्या स्वकीय नवशब्द निर्मितींत वीर सावरकरांनीं पटकाविला आहे हें कांहीं सांगितलें पाहिजे असें नाहीं. तथापि त्याचें अेक स्फुट अुदाहरण म्हणून आपल्या चित्रपटसृष्टींतल्या आजच्या स्वकीय नि संस्कृतनिष्ठ शब्दसंपन्नतेचेंच देअू.

सन १९२४ पर्यंत आपल्याकडे चित्रसृष्टींत मूकपटांचाच काल चालू होता. आणि अिटरव्हलसारख्या शब्दापर्यंतहि बहुधा अिंग्रजी शब्दच वापरण्यांत येत होते.

### ‘सावरकरी टांकसाळ’

नंतर सन १९३७ व्या वर्षी वीर सावरकरांची रत्नागिरीच्या स्थलबद्धतेंतून सुटका झाली. अर्थात् रत्नागिरीला असतांना सन १९२४ व्या वर्षी त्यांनीं भाषाशुद्धीची जी चळवळ प्रकटपणें आरंभिली तिचा सतत प्रचार बारा वर्षे तरी महाराष्ट्रभर तोंपर्यंत होअून गेला होता. प्रथम प्रथम वीर सावरकरांनीं पाडलेल्या शब्दांना विरोधी वर्ग ‘सावरकरी टांकसाळींतला’ म्हणून अुपरोधानें म्हणत असत. परंतु बारा वर्षांत तो विरोधी वर्ग जसजसा हतबल होत गेला तसतसा सावरकरांनीं पाडलेल्या शब्दांनीं लोकांवर आणि लेखकांवर कळत न कळत अितका प्रभाव नि अनेक प्रकरणीं मोहिनी पाडली कीं त्याच ‘सावरकरी टांकसाळी’ची मुद्रा ज्यांवर पडे त्या शब्दांची ती अेक अधिकृत अलंकृतीच समजली जाअू लागली होती. आम्हांला अमुक अेका विचारा-करितां किंवा संस्थेकरितां शब्द काढून द्या म्हणून सावरकरांकडे शतावधि मागण्या येत. भाषाशुद्धीची अितकी पत नि प्रभाव ते रत्नागिरीहून सन १९३७ मध्यें सुटले त्याचे आधींच वाढलेला होता. रत्नागिरीहून सुटका होतांच वीर सावरकर मुंबअीकडे येतांना प्रथमतः कोल्हापूरला अुतरले. त्यांचे समवेत आचार्य अत्रे नि श्री सत्यवादी-कार हेहि होते. आचार्य अत्रे यांची भाषाशुद्धीस अनुकुलता होती. कोल्हापुरांत वीर सावरकरांच्या स्वागतार्थ नागरिकांनीं काढलेल्या मिरवणूकीचा, सभांचा, मानपत्रांचा

अित्यादि कार्यक्रम चाललेला असतांच कोल्हापुरांतील 'हंस पिक्चर्स' ह्या सुप्रसिद्ध चित्रपट संस्थेच्या चालकांच्या विनंतीवरून वीर सावरकरांनीं त्या संस्थेसहि भेट दिली त्या संस्थेच्या भवनांत पाय टाकतांच तेथें जिकडे तिकडे लावलेल्या अिंग्रजी पाट्यां-कडे वीर सावरकरांचें लक्ष गेलें. अन्थातच त्यांनीं चालकांना भाषाशुद्धीच्या दृष्टीनें विचारलें कीं ह्या 'आअुट', 'अिन' पासून तों 'गेस्टरूम'पर्यंत वापरलेल्या पाट्यां-तरील अिंग्रजी शब्द काढून शुद्ध मराठी शब्द वापरल्यास कांही हानि होअील का? तेव्हां चालकांशीं झालेल्या संभाषणांत हें स्पष्ट झालें कीं त्यांतील बहुतेक पाट्या केवळ चित्रपट संस्थांतून पडलेल्या रूढीमुळें आणि अिंग्रजी शब्द वापरण्यांत कांहीं विशेष शिष्टाचार असतो अशा त्यावेळीं हिंदुस्थानभर चोकाळलेल्या सर्वसाधारण लोकभ्रमामुळे अिंग्रजी शब्दांत लावल्या गेलेल्या होत्या आणि कांहीं मात्र अिंग्रजी शब्दांना मराठी प्रतिशब्द कोणी पाडलेले वा सुचविलेले नव्हते म्हणून निरुपायानें लावलेल्या होत्या. ती चर्चा चालत असतां त्या सुविद्य, कलावंत नि स्वभाषाभिमानी चालकवर्गानें शेवटीं वीर सावरकरांनांच अुलट विनंति केली कीं जर आपण स्वतः ह्या सर्व शब्दांना आपल्या स्वकीय भाषेतील नांवें सुचवीत असाल तर आम्हीं तींच नव्या पाट्यांवर अवश्य लावूं आणि त्यांचा प्रचारहि करण्याचा यत्न आनंदानें करूं तेव्हां त्या कोल्हापुरांतील अितर सार्वजनिक सभांच्या नि भाषणांच्या गडबडींतच वीर सावरकरांनीं चित्रपट संस्थांतून त्याकाळीं प्रचलित असलेल्या अशा अनेक अिंग्रजी शब्दांना जे मराठी प्रतिशब्द रत्नागिरीस असतानांच योजले होते ते आणि कांहीं नवीन पाडलेले असे टिपून ती टिपणी 'हंस पिक्चर्स'च्या चालकांना दिली. त्या टिपणींतले बहुतेक मराठी प्रतिशब्द त्या मंडळींना अितके आवडले कीं त्यांनीं ते स्वतःच्या संस्थेत वापरण्याचा तर निश्चय केलाच परंतु कांहीं काळानंतर हिंदुस्थानां-तील सर्व चित्रपट संस्थानांहि त्या शब्दांचा परिचय व्हावा आणि त्या संस्थांतूनहि ते वापरले जावेत म्हणून स्वतः अेक मुद्रित हिंदी पत्रक काढून तें निरनिराळ्या चित्रपट संस्थांत धाडून दिलें. सन १९३७ मधील ह्या हिंदी पत्रकाच्या प्रती आतां दुर्मिळ झाल्या आहेत हें सांगणें नकोच. तथापि अेक जुनी प्रत प्रयत्नांतीं आम्हांस मिळाली तिचा कांहीं महत्त्वाचा भाग आम्हीं येथें साक्षेपानें खालीं अुद्धृत करीत आहोंत. तो अेवढ्याचसाठीं कीं चित्रपट विषयक जे पारिभाषिक शब्द आज मराठी चित्रपटसृष्टींत अगदीं रुळून गेलेले आहेत ते स्वकीय शब्द वीर सावरकरांनीं साधा-रणतः वीस-पंचवीस वर्षांपूर्वींच सुचविलेले आहेत ही गोष्ट त्यावेळच्या मंडळींना अवगत असल्यामुळें जरी आज सिद्ध करून दाखवास नको आहे तरी आजच्या

नवीनच पुढे आलेल्या तरुण पिढीस ती गोष्ट सहाजिकपणेंच पुराव्यासह सांगितल्या-वांचून बहुधा खरीहि वाटणार नाहीं. म्हणून अिथे ह्या घटनेच्या कथनास मूळ आधार असणाऱ्या त्या जुन्या पत्रकाचाच अुतारा देत आहों. वीर सावरकरांचें छाया-चित्र देअून त्या खालीं त्या पत्रकांत लिहिलें आहे कीं:-

" With Compliments Of Huns Pictures Kolhapur "

## अेक विज्ञापन

"महाराष्ट्रीय लोकनेता देशभक्त श्रीयुत तात्याराव सावरकरजी के सामाजिक परिवर्तन अेवम् भाषाशुद्धी की प्रवृत्तियों अेवम् आंग्लआचार विचार से अुत्पन्न मनोवृत्तियों का प्रतिरोध सर्वश्रुत है। ...... आंग्लमिती १९ जून १९३७ को देश भक्त सावरकरने हंस चित्रणसंस्था को जो मिलनावसर दिया अुस समय चित्रीकरण विभाग के दैनिक अुपयोगी आंग्लशब्दों की पर्यायवाची हिंदी शब्दावलि सूचित की वह हंस संस्था को अंतःकरण पूर्वक मान्य अेवं ग्राह्य लगी। ......
...... वह निम्नांकित शब्दावली प्रचलित करने के लिये हम सहव्यवसायी बंधु-संस्थाओं अेवं अितर रसिकवृंदसे हार्दिक प्रार्थना करते है। ........ आशा है कि हिंद की सर्व चित्रणसंस्थाअें अिस शब्दावलि का हृदयसे स्वागत करें।

ह्या पत्रकांत वीर सावरकरांनीं प्रथम सुचविलेल्या चित्रपट विषयक स्वकीय शब्दांची टिपणी छापलेली आहे. Topical : प्रचारपट Newsreel : वृत्तपट, Trailor : परिचयपट, Interval : विश्रांति, मध्यंतर, Studio : कलागृह कलामंदीर अित्यादि जे शब्द त्या टिपणींत आहेत ते आणि त्यानंतर वीर सावरकरांनी नवीन पाडलेले असे बरेच शब्द अेकत्र करून ते आम्हीं या पुस्तकाच्या शेवटीं जो शब्द-कोश दिलेला आहे त्यांतील चित्रपट वर्गांत छापलेले आहेत. त्रिमितिपट (Three Dimention), बाह्यचित्रण ( Out-Door-Shooting ) हे शब्दहि वीर सावरकरांनीच पाडलेले आहेत.

आम्ही वर वीर सावरकरांनीं नव्यानें पाडलेल्या चित्रपटविषयक शब्दांनाच तेवढें अुल्लेखिलेलें आहे. परंतु ह्या वांचून ज्या अत्यंत महत्त्वाच्या विचारांना वा नवीन वस्तूंना मराठी भाषेंत मूळांतच शब्द नव्हते आणि म्हणून अिंग्लिश शब्दच वापरावे लागत अशा कितीतरी शब्दांना वीर सावरकरांनी नवनवीन संस्कृतनिष्ठ शब्द

पाडलेले आहेत. अगदीं त्रोटक अुल्लेखापुरते पुढील दहा पांच शब्द पहा. क्रमांक (Number) दिनांक (Date) अद्ययावत् [Up to date] हुतात्मा [Martyr] सार्वमत [Plebicite] अंतिमोत्तर [Ultimatum] अुपसंधी [Truce] दूरध्वनी [Telephone] ध्वनिक्षेपक [Loudspeaker] दूरमुद्रक [Teleprinter] महापौर [Mayor] अित्यादि शेंकडों शब्द त्यांनीं नुसते सुचविले अितकेंच नव्हे तर ते स्वतः आपल्या सर्व लिखाणांतून वापरून आणि त्याचा महाराष्ट्रभर किंबहुना हिंदुस्थानभर प्रबळ प्रचार करून नि करवून त्यांना मराठी भाषेत आज अितकें रुळवून टाकले आहे कीं ते शब्द पूर्वी कधीं कोणी नवीन म्हणून पाडलेले असावेत याची सर्व सामान्य वाचकांना आज शंका सुद्धां सहसा येअूं नये.

तथापि त्याचा अेक थाअुक पुरावाहि सांगतां येअील. तो हा कीं सन १९२४ च्या म्हणजे भाषाशुद्धीची चळवळ वीर सावरकरांनी चालू करण्याच्या आधींच्या मराठी वाङ्मयात त्या शब्दांचें तदर्थक अस्तित्वच प्रायः आढळणार नाहीं.

## सावरकरीय शब्दकोश

ज्या अशा प्रकारच्या शतावधि संस्कृतनिष्ठ शब्दांना नव्यानें अुद्भावून किंवा जुन्यांना पुन्हां प्रचारांत आणून मराठी भाषेच्या शब्दरत्नाकराची नि साहित्याची श्रीमंती वीर सावरकरांनीं वाढविलेली आहे त्यांची जाणीव सर्वसामान्य वाचकांना व्हावी आणि जिज्ञासूंना बहिष्कार्य अशा परकीय शब्दांना हे सावरकर प्रणीत शब्द झटकन सांपडावेत म्हणून आम्हीं तशा कांहीं सावरकरीय शब्दांचा अेक 'भाषा-शुद्धी शब्दकोश' ह्या पुस्तकांत दिला आहे.

ह्या पुस्तकाच्या शेवटीं अेका परिशिष्टांत भाषाशुद्धीच्या दृष्टीनें रचलेल्या कांहीं लहानमोठ्या शब्दकोशांचा परिचयहि करून दिलेला आहे.

## डॉ. रघुवीरांचा महाकोश हाच आखिल हिंदु-भाषा-संघानें आतां भाषाशुद्धीचा अधिकृत कोश मानावा

वरील परिशिष्टामध्यें जे लघुकोश आम्हीं अुल्लेखिले आहेत ते त्या त्या क्षेत्रांत जरी आजहि अुपयुक्त आहेत तथापि आतां भाषाशुद्धीचें आंदोलन हें आपली राष्ट्रभाषा जी संस्कृतनिष्ठ हिंदी तिच्याशीं निगडित झालें असल्यामुळें आणि म्हणून तेंही अखिल भारतीय महत्व पावलें असल्यामुळें यापुढें आपली संस्कृतनिष्ठ राष्ट्रभाषा

जी हिंदी तिचा सारा भार आपल्या बलिष्ठ स्कंधांवर वाहूं शकेल आणि तिचा सारा जागतिक व्यवहार आपल्या शब्दसंपन्नतेंतून चालवूं शकेल असा जो कोणाचा कोश असेल तोच भाषाशुद्धीच्या दृष्टीनें अधिकृत नि आधारभूत कोश मानला गेला पाहिजे. सुदैवानें आज असा अेक संस्कृतनिष्ठ महाकोश पंडित प्रवर डॉ. रघुवीरांच्या परिश्रमानें सिद्धहि झालेला आहे.

या कोशाच्या महत्वाविषयीं आणि वैशिष्ट्याविषयीं कांहीं चर्चा या पुस्तकातील 'आमची राष्ट्रभाषा आणि भाषाशुद्धी' या लेखांत वीर सावरकरांनीं केलेलीच आहे आणि त्याच लेखांत हेंहि सांगितलें आहे कीं संस्कृतनिष्ठ हिंदी वरील अुर्दुनिष्ठ हिंदीच्या आक्रमणास तोंड देअून तें आक्रमण हाणून पाडण्याचें जें कठीण कार्य आपणांस पार पाडावयाचें आहे त्या कार्यीं ह्या महाकोशाचें आपणांस अमोल साहाय्य होणारें आहे. कारण जगांतील साऱ्या प्रगत भाषांशीं टक्कर देअूं शकेल, आजची सर्व अद्यावत् वैज्ञानिक आणि व्यावहारिक परिभाषा नि भाषा आपल्या शब्दांत व्यक्त करूं शकेल असें सामर्थ्य आपल्या संस्कृतनिष्ठ हिंदी राष्ट्रभाषेंत आणण्याची डॉ. रघुवीरांचीहि महत्वाकांक्षा असल्यामुळें त्यांच्या कोशांत सर्व अनावश्यक विदेशी शब्दांना आणि त्यांतहि अुर्दू नि अिंग्रजी शब्दांना निर्धारानें बहिष्कारून त्यांनीं अिंग्लिश भाषेंतील अगदीं अद्यावत् शब्द समूहाला संस्कृत–प्राकृतनिष्ठ असेच स्वकीय प्रतिशब्द दिलेले आहेत.

ज्या भाषाशुद्धीचे आद्य प्रवर्तक वीर सावरकर गेलीं ४० वर्षें संतत प्रचार करीत आले आहेत त्या भाषाशुद्धीच्या तत्वाचा हा विजय आहे, त्यांच्या परिश्रमांचें हें साफल्य आहे.

तेव्हां आतां डॉ. रघुवीरांच्या महाकोशासच अधिकृत आधार मानून त्यांतील वैज्ञानिक नि व्यावहारिक प्रतिशब्द केवळ राष्ट्रभाषा हिंदीतच नव्हे तर सर्व हिंदुभाषा संघांत निर्धारपूर्वक वापरणें हें प्रत्येक संस्कृतनिष्ठ हिंदुभाषासंघीयांचें कर्तव्य आहे.

ग. म. जोशी

**जानेवारी १९५८ मधील प्रथम आवृत्तीची प्रस्तावना**

# प्रास्ताविक

## (या आवृत्तीचे)

### सावरकर–भाषाशुद्धी

स्वातंत्र्यवीर सावरकर यांचे नाव महाराष्ट्रातील भाषाशुद्धीच्या चळवळीशी कायमचे निगडित आहे. तथापि, भाषाशुद्धीची कल्पना महाराष्ट्रात तरी त्याहूनही जुनी आहे. ती शिवाजी महाराजांच्या प्रेरणेने निर्माण झालेल्या 'राज्यव्यवहार-कोशा' इतकी जुनी आहे. सावरकरांनी आपल्या भाषाशुद्धीविषयक लिखाणात रघुनाथ पंडितांच्या द्वारे महाराजांनी केलेल्या उपक्रमाचा आदरपूर्वक उल्लेखही केला आहे. तथापि शिवाजी महाराजांनी केलेला उपक्रम आणि सावरकरांनी जन्मठेपेतून परत आल्यावर हाती घेतलेली चळवळ यात काही बाबतीत फरक आहे. शिवाजी महाराजांचा उपक्रम मूलतः राज्यकारभारापुरताच मर्यादित होता असे दिसते; म्हणजे तो आजकालच्या सरकारी पदनाम कोशासारखा होता. तर सावरकरांचा उपक्रम राज्यव्यवहारापुरता नसून अखिल सामाजिक व्यवहारांना व्यापणारा आहे.

दोन्हीही उपक्रमांचा उगम अपरिहार्यपणे राजकीयच आहे. कारण भाषाशुद्धीची आवश्यकताच मुळी राजकीय परिस्थितीमुळे निर्माण झालेली होती. वेगवेगळ्या देशांच्या प्रवासादिकातून होणाऱ्या संपर्कात जे परकीय शब्द एखाद्या भाषेत प्रविष्ट होतात, त्यांना निपटून काढण्याच्या मागे सावरकर लागले असते असे वाटत नाही. कारण असा भाषा–संपर्क ही एक अपरिहार्य घटना आहे. तिजमध्ये अनैसर्गिक किंवा उद्वेगजनक असे काही नाही. पण जेव्हा एखादे आक्रमक राष्ट्र आपली सत्ता दुसऱ्या राष्ट्रावर लादते, तेव्हा जो भाषिक संपर्क घडतो तो स्वाभाविक नसतो. तो प्रायः बलात्काररूप असतो. इंग्रजी किंवा अरबी-फारशी शब्द जेव्हा हिंदी-बंगाली-मराठी या सारख्या संस्कृतोद्भव भाषांत गर्दी करतात, तेव्हा तो संपर्क सर्वस्वी अस्वाभाविक असतो. इतकेच नव्हे तर गुलामगिरीची खेदजनक आठवण करून देणारा असतो. शिवाय, परराज्यामुळे जेव्हा परभाषिक शब्द एखाद्या भाषेत घुसतात, तेव्हा त्याचे प्रमाणही इतके मोठे असते की मूळ भाषेतील विभक्ती-प्रत्यय आणि क्रियापदे

या पलीकडे फारच थोडे शिल्लक उरतें! शिवकालीन पत्रव्यवहारातील भाषा अर्वाचीन हिंदीचे उर्दू या नावाने झालेले रूपांतर बाजकडे पाहिल्यास ह्या भाषिक बलात्काराचे स्वरूप लक्षात येईल. या राजकीय बलात्काराची प्रतिक्रिया म्हणून आधुनिक हिंदुस्थानात भाषाशुद्धीची चळवळ प्रथम उत्तर प्रदेश आणि बंगाल या विभागात सुरू झाली.

उत्तर प्रदेशात तर केवळ अरबी-फारशी शब्दच तत्रस्थ भाषेत शिरले होते असे नव्हे; अत्यंत हास्यास्पद आणि संतापजनक गोष्ट म्हणजे तेथे भारतीय लिपीच उच्छेदून अरबी-फारशी लिपीने ठाण मांडले होते. म्हणजे या देशातील ब्राह्मण कायस्थादी विद्योपजीवी जाती आपल्या जगद्‌विख्यात पूर्वजांची लिपी सोडून उर्दू (म्हणजेच अरबी-फारशी) लिपी वापरू लागल्या होत्या. तुळशीदासाच्या वंशातील स्वामी रामतीर्थ, काश्मीरी ब्राह्मणवंशातील पंडित मोतीलाल, जवाहरलाल, ह्यांच्या बाल्यात उत्तर प्रदेशातील ब्राह्मण मुले देखील एखाद्या मौलवीच्या दारी जाऊन 'अलिफ' 'बे' ही मूळाक्षरे गिरवीत असत! म्हणून उत्तर प्रदेशात प्रथम वाडवडिलांची लिपी पुन्हा स्थापित करण्याची चळवळ करावी लागली. 'नागरी प्रचारिणी सभा' म्हणून जी विख्यात झाली, तिला प्रथम नागरी लिपीचा प्रचार हाती घ्यावा लागला. अर्थात उत्तर प्रदेशात भाषाशुद्धीची चळवळ महाराष्ट्रापेक्षाही अधिक अपरिहार्य होती. सिंधमध्ये तर सर्व व्यवहार उर्दू लिपीतूनच होत. म्हणजे सिंधीभाषेची लिपी उर्दू हीच ठरून गेली! ती इतकी की घरेदारे सोडून स्वतःच्या जन्मभूमीतून पाकिस्तानच्या निर्मितीमुळे देशोधडीला लागल्यावरही सिंधी लोक,—निदान त्यांच्यातील बहुसंख्य लोक—आपल्याला देशोधडीला लावणाऱ्या लोकांची, उजवीकडून डावीकडे लिहिली जाणारी लिपी अद्यापही आपली लिपी समजतात!

सावरकरांच्या लेखनावरून असे दिसते की, त्यांना भाषाशुद्धीची अपरिहार्यता उत्तर प्रदेशातील शुद्धी-चळवळीवरूनच मनात भरली. या संग्रहातील पहिल्याच लेखात सावरकरांनी या सत्याचे कथन केले आहे. उत्तर हिंदुस्थानातील लोक जागृत होऊन अरबी-फारशी शब्द खड्यासारखे वेचून काढीत असता, मराठी भाषेत मात्र, शिवाजी महाराजांच्यासारखा मोहरा साडे तीनशे वर्षांपूर्वीच होऊन गेला असूनही अद्याप निदान शेकडा चाळीस तरी अरबी-फारशी शब्द अक्रमपणे राहावेत, याचे सावरकरांना वैषम्य वाटणे अगदी साहजिक होते. त्यातून त्यांना राजकीय कार्यापासून काही काळ सक्तीने अलिप्त रहावे लागल्याने, भाषाशुद्धी आणि अस्पृश्योद्धार या दोन चळवळींवरच लक्ष केंद्रित करता आले.

सावरकरांचा स्वभाव हा जसा क्रान्तीकारकाचा आहे, तसाच तो केमालपाशासारख्या सद्धेतुप्रेरित हुकुमशहाचाही आहे. एखादी गोष्ट त्यांनी हाती घेतली म्हणजे

'शक्याशक्य', 'व्यवहार्य वा अव्यवहार्य' यांचा विचार ते करीत बसत नसत. भाषाशुद्धीच्या बाबतीत काय, की पतितपावन चळवळीच्या बाबतीत काय, 'अशक्य' हा शब्द सावरकरांच्या कोशात नव्हता ! "शब्द वापरा की तो रूढ झालाच !" "अनेक पर्याय प्रचारात आले, तर अखेर चांगले तेच टिकतील"। या सारखी त्यांची आग्रही सूत्रे पाहिली म्हणजे त्यांची अप्रतिहत कार्यपद्धती लक्षात येते. पण भाषा ही नदीच्या प्रवाहाप्रमाणे स्वतःची वाट कापते. पाटबंधाऱ्याप्रमाणे कृत्रिम तटबंदीतून वाहात नाही. त्यामुळे सावरकरांच्या सारख्या, अशक्य हा शब्दच माहित नसलेल्या, नेपोलियन-सदृश वीरालासुद्धा रूढ शब्द काढून लावताना ज्या अनेक अडचणी आल्या त्या पाहाण्यासारख्या आहेत.

सावरकरांच्यापूर्वी भाषाशुद्धीचा झालेला प्रख्यात प्रयत्न जरी शिवाजी महाराजांचा राज्यव्यवहार कोश हा असला, तरी त्या नंतरही कारभाराच्या भाषेकरिता स्वभाषेतील कोश करण्याचे प्रयत्न झालेले आहेत. दुर्दैवाची गोष्ट म्हणजे, महाराजांच्या मंत्रिमंडळातील विख्यात पंडित रघुनाथपंत हणमंते यांचा कोशही आजच्या विद्यालयांतून आणि ग्रंथशाळांतून फारसा आढळत नाही. या प्रस्तावनेकरिता मी एका प्रख्यात ग्रंथालयात राज्यव्यवहार कोशाची चौकशी केली असता, तेथील त्रिपदवीधारी ग्रंथाधिकाऱ्याने माझ्यापुढे अर्वाचीन सरकारने करविलेला 'पदनाम कोश' आणून ठेवला ! राज्यव्यवहार कोशाच्या आतापर्यंत केवळ दोन आवृत्त्याच निघाल्या आहेत ही गोष्टही अशुभसूचक आहे. एक आवृत्ती शके १८०२ मध्ये म्हणजे इ. स. १८८० मध्ये निघालेली आहे; तर दुसरी इ. स. १९५६ मध्ये निघालेली आहे. ही दुसरी आवृत्ती पुण्या-मुंबईच्या एखाद्या प्रसिद्ध विद्वत् संस्थेने काढलेली असेल अशी आपली कल्पना साहजिकच होते, पण ही सुंदर आवृत्ती, उर्दू आणि तेलगू भाषेने वेढलेल्या 'मराठवाडा साहित्य परिषदे'ने काढलेली आहे ! त्यांनी केंद्र सरकारच्या 'शिक्षण मंत्रालयाकडे' या संबंधात विनंती केली होती. परंतु "दिल्ली शिक्षण मंत्रालयाने या कामी आपली असमर्थता प्रकट केली. पत्र क्रमांक D-2772-M-2/23, November 1955", मराठवाडा साहित्य परिषदेने वीस वर्षांपूर्वी काढलेल्या या आवृत्तीला श्री. रामचंद्र गोविंद काटे यांची उपयुक्त प्रस्तावनाही आहे. या नव्या आवृत्तीमुळे तरी हा ऐतिहासिक महत्त्वाचा कोश सर्व विद्यालये आणि विद्यापीठे यांच्या संग्रहात आणि वापरात असावा, अशी सहाजिकच अपेक्षा होते. पण वस्तुस्थिती मात्र दुर्दैवाने तशी नाही.

या नंतरचा असाच राज-पुरस्कृत प्रयत्न म्हणजे विख्यात विद्याप्रेमी नरेश श्रीमंत सयाजीराव गायकवाड यांच्या प्रोत्साहनाने स्थापन झालेल्या कोश मंडळाचा

प्रयत्न होय. हा प्रयत्न केवळ महाराष्ट्रापुरता नसून अखिल भारताला उपयुक्त असा आहे. या कोशाचे नाव 'श्रीसयाजीशासनशब्दकल्पतरु'. यात इंग्रजी, गुजराती, मराठी, संस्कृत, उर्दू, फारसी, हिंदी आणि बंगाली अशा आठ भाषांतील समान-शब्द एकापुढे एक दिले आहेत. या ग्रंथाची उपयुक्तता वेगळी सांगण्याची गरजच नाही. अशा तऱ्हेचा प्रयत्न त्या पूर्वीही झाला नव्हता आणि त्यानंतरही त्या तोडीचा झालेला नाही. रघुनाथपंत हणमंत्यांचा कोश आणि श्री सयाजीमहाराज-पुरस्कृत कोश यांचे मुख्य वैशिष्ट्य म्हणजे दोन्ही कोशांनी सोपेपणाला आणि सुटसुटितपणाला दिलेले प्राधान्य हे होय. सयाजीमहाराज-पुरस्कृत ग्रंथ आकाराने आणि पृष्ठ संख्येने प्रचंड आहे. त्याची प्रस्तावना सहाजिकच गुजरातीत आहे. तीत म्हटले आहे...

"लांबा शब्दोने बदले टूंका शब्दोने पसंदगीनो प्रथम अंक आपवामा आव्यो छे; कारण के व्यवहारमां ते रूढ थवामां सरळ पडे छे." रघुनाथपंडितांच्या कोशामध्येही सुगमतेला प्राधान्य देण्याचे हेच धोरण अवलंबिलेले दिसेल. दुर्दैवाने हिंदी आणि बंगाली भाषांत झालेल्या शुद्धीच्या चळवळीने सुगमतेला प्राधान्य दिले नाही. 'वार्ताहर' या ऐवजी 'संवाददाता', 'सामना' या ऐवजी 'प्रतियोगिता', 'सेना' किंवा 'सैन्य' या ऐवजी 'वाहिनी' हा, (कित्येक संस्कृतज्ञांसही झटकन न समजणारा!) शब्द, या सारखे शेकडों क्लिष्ट शब्द भाषाशुद्धीच्या निमित्ताने बंगाली व हिंदी पंडितांनी आपआपल्या मुळच्या सुगम भाषांत आणून सोडले. त्यांनी जर शिवाजी महाराजांचा राज्यव्यवहार कोश आणि सयाजीराव महाराजांचा 'शासन-शब्दकल्पतरू' डोळ्यापुढे ठेवला असता तर त्या दोन्हीही भाषा सामान्य लोकांच्या तोंडी सहज रुळल्या असत्या. पण ते काहीही असले तरी राज्यव्यवहाराकरिता दोन विख्यात राज्यकर्त्यांनी मुद्दाम करवून घेतलेले हे कोश अव्हेरून आज यांत्रिक पद्धतीने बनविलेले जे क्लिष्ट शब्द रूढ करण्याचा प्रयत्न होत आहे तो अनिष्ट आहे. जे शब्द सुगम नाहीत, ते रूढ होण्याचा संभव नसतो.

सावरकरांच्या डोळ्यांपुढे असलेला दुसरा महान प्रयत्न 'अतातुर्क' कमाल पाशा यांचा होता. सावरकर आणि कमाल पाशा यांच्या व्यक्तिमत्त्वातील आणि पराक्रमातील साम्य शोधणे मनोरंजक होईल. या दोघांपैकी सावरकर हेच अधिक व्युत्पन्न आणि सुसंस्कृत होते. कमाल पाशाच्या विद्याव्यासंगासंबंधी त्याचा चरित्रकार लॉर्ड किनरॉस् म्हणतो, –

"Kemal's own cultural background was scrappy. He had studied subjects ad-hoc, in periodic bursts of concentration-skimming

throgh them, on occasion, to rationalize some intuitive preconceived notion. But he had never acquired the habit of systematic reading."

यातील काही वर्णनच सावरकरांना लागू होण्यासारखे आहे. सावरकरही आपले स्वयंस्फूर्त विचार सर्वमान्य करण्याकरिताच वाचन करीत. पण त्यांची मूळची बुद्धी अत्यंत तीव्र आणि व्यासंगी होती. कमाल पाशा, सम्राट अकबराप्रमाणे, भोवताली पंडित गोळा करून त्यांच्याकडून आपल्याला हवे ते ज्ञान ओरबाडून घेण्यात तरबेज होता! त्याच्या भोवताली गोळा झालेल्या पंडितांत दोन पक्ष होते. एक पक्ष, 'तुर्की भाषा सोपी केली म्हणजे झाले' असे म्हणणारा होता, तर दुसरा पक्ष 'तुर्की भाषेतील अरबी-फारसी शब्द काढून टाकून त्यांच्या जागी नवे तुर्की शब्द तयार करून योजावेत' असे म्हणणारा होता. स्वतः कमाल भाषाशुद्धीच्या बाजूचा होता. पण त्यास अनुभव मात्र वेगळाच आला. त्याचा चरित्रकार लॉर्ड किन्रॉस म्हणतो, –

" In time he realised that his linguistic operations were leading the Turkish language into a blind alley. It threatened to become a 'mandarin' language as artificial and incomprehensible to the ordinary Turk as that of the old Ottoman ruling class. A halt was finally called ... "

पण कमालपुढील समस्या सावरकरांच्या पुढील समस्यांहून फारच विकट होत्या. भारतात भाषाशुद्धीकरणाला संस्कृतचा खजीना पाठीशी आहे. भारतातील सांस्कृतिक वाङ्मय संस्कृतात आहे. आणि नागरी उर्फ बाळबोध लिपी त्या वाङ्मयाची लिपी म्हणून अनेक शतके प्रतिष्ठा पावली आहे. बिचाऱ्या कमालने परकीय शब्द उपटून काढले तरी परकीय लिपीतून त्याची सुटका नव्हती. पण तो सावरकरांच्याप्रमाणे अप्रतिहतपणे स्वतःचा मार्ग चोखाळणारा होता. परक्यांचीच लिपी घ्यावयाची, तर मग रोमन लिपी घ्यावी, असे त्याने ठरविले. कारण त्यायोगे त्याचे मागासलेले तुर्की राष्ट्र अत्यंत पुढारलेल्या म्हणून विख्यात अशा युरोपीय राष्ट्र-कुटुंबात जाऊन दाखल होत होते! कमालने केलेली ही लिपी-सुधारणा महाराष्ट्र, मध्य प्रदेश, आंध्र प्रदेश, यांत तरी करण्याचे कारण नाही. महाराष्ट्राने तर नागरी अथवा बाळबोध लिपी हीच आपली वाङ्मयीन लिपी अनेक शतकांपासून ठरविलेली आहे. पण दाक्षिणात्य भाषांचे काय? राष्ट्रैक्याकरिता देखील जेथे बंगाल आणि गुजरात आपापल्या लिप्या सोडावयास तयार नाहीत, तेथे तमीळ, तेलगू, मल्याळी या भाषा आपल्या लिप्या सोडावयला कशाच्या तयार होतात!

पण लिपी-सुधारणेतही सावरकरांनी लक्ष घातले असले, तरी मुख्य प्रश्न लिपीचा नाही. भाषा-शुद्धीचा प्रश्न हा अखेरीस परकीय शब्द, – विशेषतः परकीय राज्यकर्त्यांचे शब्द, – स्वभाषेतून काढून टाकण्याकरिता नवीन शब्द बनविण्याचा ठरतो. ज्या परकीय शब्दांना स्वकीय शब्द उपलब्ध आहेत, त्यांचा प्रश्नच नाही पण ज्यांना मूळ भाषेत प्रतिशब्द नाहीत, त्यांच्याकरिता नवे शब्द तयार करण्याचा हा मुख्य प्रश्न ठरतो. हे शब्द तयार करताना मराठीचे मराठीपण आणि नित्याच्या भाषेचे सोपेपण नष्ट न करणे हे यातील मुख्य पथ्य होय. नुसता परकीय शब्द घालविला आणि त्याच्या ऐवजी संस्कृत कोश आणि व्याकरण यांच्या बळावर नवीन शब्द बनविला, एवढ्याने शुद्धीकरणाचे पुण्य पदरात पडेल, असे नव्हे! भाषेचे मूळ वळण न सोडता नवे शब्द तयार करणे हे अलबत्या गलबत्यांचे काम नव्हे, हे सत्य विसरल्यास भाषेची स्थिती काय होते, ते आजच्या वर्तमानपत्री भाषेवरून पदोपदी दिसते. प्रत्येक इंग्रजी किंवा फारसी शब्दाला अगदी त्याच स्वरूपाचा, – कधीकधी तर त्याच उच्चाराला जवळचा – शब्द तयार केलाच पाहिजे, हा हिंदी लेखकांचा आग्रह तितकासा ग्राह्य नाही. उदाहरणार्थ, Survey याला 'सर्वेक्षण' हा शब्द तयार करण्यात मूळ इंग्रजी शब्दाच्या जवळ जाण्याच्या हास्यास्पद उद्दिष्टाव्यतिरिक्त कोणतेच उद्दिष्ट दिसत नाही! मराठीत तर साध्या 'पहाणी' शब्दाने या विचित्र 'सर्वेक्षणा'चे काम भागेल. हिंदीतील काही नवीन बनविलेले शब्द तर दुर्बोधही आहेत आणि अशुद्धही आहेत. उदाहरणार्थ 'उप-अभियंता' हा शब्द पहावा. पहिली गोष्ट म्हणजे यात संधी करण्याची जागा असूनही संधी केलेला नाही; आणि शिवाय, शब्द उच्चारल्याबरोबर अर्थ लक्षात येत नाही, हे वेगळेच. आणखी एक चमत्कारिक गोष्ट म्हणजे, कोणताही उपसर्ग कोठेही लावून आपल्याला हव्या त्या अर्थाचा शब्द बनविता येईल ही कल्पना! उदाहरणार्थ 'अधि-नियम' हा हल्ली वापरात असलेला शब्द पाहा. हा शब्द By-laws ह्या अर्थी तयार केलेला दिसतो. पण 'अधि' या उपसर्गाचा अर्थ येथे अपेक्षित असलेल्या अर्थाच्या अगदी विरुद्ध आहे. हिंदी पंडितांनी काहीही केले तरी मराठी वृत्तपत्रांनी ते लगेच उचलण्याचे कारण नाही. पण आज प्रवृत्ती मात्र तशी दिसत आहे. याच्या मुळाशी, किंबहुना या शब्द-निर्मात्यांच्या सुप्त मनात, एक कल्पना आहे; ती म्हणजे निदान सर्व संस्कृतोद्भव भाषांत तेच शब्द चालू करणे! या देशातील प्रादेशिक भाषा या प्रतिष्ठित आणि वाङ्मयसंपन्न भाषा आहेत. त्यांना एकमेकींच्याजवळ ओढण्याच्या प्रयत्नात या सर्वांचेच रूप आणि डौल बिघडणार असेल, तर फायदा संशयित राहील आणि तोटा मात्र पदरात पडेल! अर्वाचीन मराठी गद्याला टिळक, चिपळूणकर, महादेव शिवराम गोळे, गडकरी, केळकर, फडके, अत्रे, खांडेकर यांच्या भाषाप्रभुत्वाने जे स्वाभाविक, पण अर्थवाही रूप आले आहे, ते

हिंदी आणि बंगाली या दोघींनाही नाही. बंगालीत उच्च दर्जाचे ललित आणि वैचारिक साहित्य आहे. पण मराठी गद्याचा नैसर्गिकपणा त्याला नाही. आजच्या हिंदीची स्थितीही तीच आहे. आणि हिंदीतील शब्द उचलण्याच्या प्रवृत्तीमुळे मराठीची शुद्धता आणि 'मराठीपण' नष्ट होत आहे. साधा 'स्वर्गीय' शब्द घ्या. हिंदीत तो 'स्वर्गस्थ' ह्या अर्थाने वापरतात. मराठीत तो तसा वापरणे हास्यास्पद आहे.

नवशब्दनिर्मितीच्या या समस्येत येथे याहून अधिक शिरता येत नाही. पण 'नवे शब्द तयार करणे हे मुळातच पुण्यप्रद आहे आणि ते कोणीही अपक्व लेखक करू शकतो' या कल्पनेने अलिकडच्या मराठी गद्यात थैमान घातले आहे! या धोक्यासंबंधी भाषाशुद्धीच्या दोघा महाबुद्धिमान आणि समर्थ प्रवर्तकांनी परकीय शब्द बहिष्कृत करण्याइतकीच काळजी घेतली असती, तर हा धोका टळला असता.

पण या संदर्भात लेखकांचे आणि भाषा-शुद्धी-प्रवर्तकांचे शैलीसंबंधीचे विचार, आहेत-त्याहून अधिक कडक आणि सूक्ष्म हवेत. हे विचार भाषाशुद्धीच्या काळाच्या पूर्वीपासूनच असावेत तितके शास्त्रशुद्ध नाहीत. "भाषा अलंकारिक आणि संस्कृत प्रचुर असेल, तरच तिला शैली आहे. आणि साधी, सरळ, टोकदार असेल, तर तिला शैली नाही" अशी कल्पना मराठीत निदान गेल्या दोन पिढ्या तरी रूढ आहे. 'टिळकांचे विचार तेजस्वी होते पण केळकरांच्याप्रमाणे त्यांना शैली मात्र नव्हती'* ही समजूत मराठीत कित्येक वर्षे रूढ आहे, आणि पुनःपुनः व्यक्त केली जात आहे. शैलीसंबंधीची ही कल्पना कृत्रिमतेकडेच झुकणारी आहे. आणि तेजस्वितेला कमी महत्त्व देणारी आहे. तेजस्विता आणि डौलदारपणा या दोहोंचे एकत्र वास्तव्य चिपळूणकरांच्या भाषेत आढळे. पण कधीकधी विचारांचे व त्यांच्या मागील कळकळीचे महत्त्व एवढे असते की अलंकारिकता ही त्यांच्या संगतीत विसंगतच ठरते. टिळकांची भाषा अलंकारिक असती तर ती इतकी परिणामकारक राहिलीच नसती, असे देखील म्हणता येईल. साधेपणा, तळमळ आणि टोकदार शब्द योजना यांचे महत्त्व आमच्या टीकाकारांनी तरी घ्यावे तितके लक्षात घेतलेले नाही. या बाबतीतील बेन जॉन्सन[×] याचे सूत्र लक्षात घेण्यासारखे आहे. तो म्हणतो,

"We must not be too frequent with the mint nor fetch

---

*एखाद्या पंडिताने याच्या विरुद्धही मत दिलेले सुदैवाने आढळते टिळक लेख संग्रहाला (अकॅडमी पुरस्कृत) तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी लिहिलेली सुंदर प्रस्तावना हे त्याचे एक उदाहरण होय.*

×*बेन जॉन्सन [१५७२ ते १६३७]*

words from the extreme and utmost ages; but the eldest of the present and newest of the past language is best."

बेन जॉन्सनचे हे सूत्र सुमारे चार शतकांपूर्वीचे व म्हणून कालातीत म्हणावे, तर अगदी अलीकडे अमेरिकेतील असोसिएटेड प्रेसने आपल्या पत्रकारांसाठी जे 'स्टाइल बुक' प्रसिद्ध केले आहे, त्यातही नेमका या सूत्रावरच भर दिला आहे. "सर्वसाधारणपणे जो शब्द सर्वांना समजतो तो मान्य करावा." यावर भाष्य करताना पुण्याच्या 'सकाळ' पत्राने म्हटले आहे, "शब्द क्लिष्ट, बोजड, दुर्बोध नकोत, पण त्यात केवळ नादमाधुर्यही नको. नादमधुर शब्द कानाला गोड लागतात, पण आपल्याला जे सांगावयाचे आहे ते त्यातून प्रभावीपणे व्यक्त होत नसेल, तर थोडा वेळ कानाला आनंद देण्यापलिकडे त्यातून काहीही साध्य होत नाही. बेन जॉन्सन् आणि अमेरिकन असोसिएटेड प्रेसचे अगदी अलिकडचे 'स्टाइल बुक' या दोहोंतही युक्त झालेले तत्त्व लक्षात घेतले, तर टिळकांची भाषा ही आदर्श भाषा ठरते. दोन पिढ्या दुर्लक्षिल्या गेलेल्या या सत्याकडे येथे लक्ष वेधण्याचे मुख्य कारण म्हणजे परकीय शब्द हाकलण्याच्या नादात नेमके या तत्त्वाकडेच दुर्लक्ष होण्याचा धोका आहे. अशा प्रकारचे दुर्लक्ष आजच्या हिंदीने सर्वांत जास्त केले आहे. पण हिंदीतील शब्द जसेच्या तसे उचलण्याकडे आजच्या मराठी लेखकांचा विशेष कल दिसून येतो! आपल्याकडे विष्णुशास्त्र्यांच्या काळापासून 'टीका' हा शब्द 'क्रिटिसिझम्' ह्या अर्थी वापरला गेला आहे. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, नरसिंह चिंतामण केळकर, वामन मल्हार जोशी यांनाही हा शब्द पुरेसा समर्पक वाटत असे. त्याच्या ऐवजी 'समीक्षा' 'विमर्ष' - 'आलोचना' हे शब्द केवळ हिंदीत वापरतात म्हणून आम्ही वापरण्यास सुरुवात केली! 'कादंबरी' हा कर्णमधुर आणि इतिहास-संपन्न शब्द मराठीत रूढ असताना, हिंदीतील 'उपन्यास' हा संशयास्पद शब्द वापरण्याकडे आज कित्येकांचा कल आहे. नवीन शब्द करणे अथवा अन्य भाषेत केलेला दिसताच उचलणे, या प्रवृत्तीकडे भाषाशुद्धीचा आढावा घेताना लक्ष वेधल्याशिवाय गत्यंतर नाही. म्हणूनच, या सूत्राचा एवढा विस्तार करावा लागला. कारण परदेशी शब्द वापरणे एवढाच काय तो भाषेसंबंधीचा गुन्हा होय अशी कल्पना झाल्यानेच वर दर्शविलेले भाषिक दोष वाढत आहेत.

बेन जॉन्सनच्या सूत्राला आजच्या मराठीपुरते पुढील रूप देता येईल. भाषाशुद्धीची समस्या ही केवळ राजकीय प्रतिकाराची समस्या नव्हे की संस्कृत पंडितांकडे सोपविण्याजोगी कामगिरीही नव्हे. ज्याला भाषेच्या नाद-वैशिष्ट्यासंबंधी आणि परंपरेसंबंधी हळुवार जाणीव आहे, तोच अवश्य तेथे योग्य शब्द तयार करू शकेल.

म्हणजे हा विद्वत्तेचा आणि परकीयांच्या प्रतिकाराचा प्रान्त नसून, भाषाविषयक हळुवारपणाचा किंवा Sensitivity चा प्रान्त आहे. परकीय मिशनऱ्यांच्या किंवा अँग्लो-इंडियन अंमलदारांच्या भाषेला आपण हसत होतो, ते त्यांच्या भाषेत परकीय शब्द होते म्हणून नव्हे, तर त्यांच्या भाषेचे वळणच परकीय होते म्हणून होय. मराठीचा मराठीपणा नुसत्या शब्दसंग्रहात नाही; तर एकंदर वळणात आहे, या सत्याचा विचार करणे म्हणजे भाषा-शुद्धीचा निषेध नव्हे, तर भाषाशुद्धीचा विस्तार होय.

भाषा-शुद्धीच्या चळवळीत भाषाशुद्धीखेरीजही काही चळवळी शिरल्या. त्या भाषा-शुद्धीला खरोखरच आवश्यक आहेत की नाहीत, याचाही फेर विचार व्हावयास हवा. हिंदीतील किंवा बंगालीतील शब्द जसेच्या तसेच घेण्याने अखिल भारताची एक भाषा निर्माण करण्यास मदत होईल, ही कल्पना त्यापैकीच होय. आपली मूळ भाषा या चळवळीने क्लिष्ट किंवा 'अमराठी' होत असली तरी अन्य भारतीय भाषांतील शब्द घ्यावेत की काय, हा प्रश्न विचार करण्यासारखा आहे. काही लोकांची कल्पनाशक्ती तर इतकी पुढे धावते की, काही काळाने प्रादेशिक भाषा लुप्त होऊन हिंदुस्थानात एकच भाषा उरेल! अशी त्यांची वेडी आशा असते. हिंदुस्थानसारख्या खंडप्राय देशात प्रादेशिक भाषा राहणारच; नव्हे त्या राहणे इष्टही आहे. 'बारा कोसावर भाषा बदलते' अशी एक जुनी म्हण आहे. आणि ज्यावेळी प्रवास-साधने कमी होती आणि कमी वेगवान होती, त्या वेळीतर या म्हणींतील सत्य आजच्याहून कितीतरी पटींनी अधिक अनुभवास येत असे, हे भाषिक आणि भौगोलिक सत्य आहे. 'एकराष्ट्रीयत्व' कितीही अगत्याचे असले तरी भौगोलिक वस्तुस्थितीवरून ते उड्डाण करू शकणार नाही. या देशात आंतरप्रांतीय व्यवहाराची एक भाषा अवश्य हवी— नव्हे हिंदी ही जशी भाषा अनेक शतके आहेही, पण त्याचा अर्थ ती भाषा प्रादेशिक भाषांची जागा घेऊ शकेल असा नव्हे. युरोपांत आमच्या एक दोन जिल्ह्याएवढे देशही आपल्या भाषा व आपले वाङ्मय जतन करताना दिसतात व ते रास्तही आहे. समजा आपण राजकीय फायद्याकरिता प्रादेशिक भाषेचा बळी देण्याचे ठरविले, तरी त्यात आज आहे त्या वाङ्मयाचे आपण काय करणार! की त्याचाही बळी देणार? अखिल भरतखंडाला राज्यव्यवहाराकरिता किंवा उच्च अध्यापनाकरिता एकच भाषा ठेवण्याची कल्पना 'ॲस्पॅरँटो'सारखी कृत्रिम भाषा निर्माण करण्याइतकीच हास्यास्पद आहे. प्रादेशिक भाषा जिवन्त राहूनही आंतरप्रांतीय व्यवहाराकरिता हिंदीचा उपयोग अपरिहार्य आहे. आज इंग्रजीचे स्थान आणि काही शतकापूर्वी संस्कृतचे स्थान विद्वानांपुरते तरी तेच होते. पण संस्कृत पंडितांनी किंवा इंग्रजी-शिक्षितांनी प्रादेशिक भाषा नष्ट करण्याचे ध्येय कधीच समोर ठेवले नाही. हिंदीच्या अभिमान्यांनीही ते ध्येय समोर ठेवलेले नाही.

या सर्वांच्या मुळाशी एक मूलभूत भाषिक प्रश्न आहे. भाषा ही पंडितांनी घडवायची असते, की नदीच्या प्रवाहाप्रमाणे ती आपोआप वळण घेत असते? डॉ रघुवीर यांनी भाषेकडे केवळ यांत्रिक दृष्टीने पाहिले असे खेदाने म्हणावे लागते. कचेरीच्या एका खोलीत बसून, संस्कृत कोश आणि व्याकरण शेजारी ठेऊन तयार केलेले शब्द कोणत्याच भाषेचे शब्द होणार नाहीत! धड संस्कृतचेही नाहीत, हिंदीचेही नाहीत, आणि मराठी-गुजराथी या सारख्या प्रसिद्ध प्रादेशिक भाषांचेही नाहीत. त्यांच्या क्लिष्टतेमुळे आणि कृत्रिमतेमुळे ते रूढ होण्याचा संभव नसतोच आणि रूढ झालेच तर त्या भाषांचे सौन्दर्य वाढविण्याऐवजी कुरूपताच वाढविण्याचे कार्य ते शब्द करतील.

आणखी एक धोका अनेकदा दाखवून देण्यात आला आहे. मूळ भाषेत सुंदर, रूढ स्वदेशी शब्द असूनही, शब्दनिर्मितीच्या उत्साहात नवीन शब्द तयार करण्याचा वा हिंदीतून उचलण्याचा सोस गेली काही वर्षे वाढत आहे! 'चिरंजीव' शब्द रूढ आणि कर्ण-मधुर असूनही त्याऐवजी 'सुपुत्र'; 'तीर्थरूप' हा काव्यात्मक शब्द अशिक्षीतांसदेखील परिचित असूनही त्याऐवजी 'पिताजी' शब्द वापरणे; परीक्षेच्या प्रश्न-पत्रिकेत 'पुढील शब्दांचे व्याकरण सांगा' म्हणण्या ऐवजी 'निम्न-लिखित शब्दांचे व्याकरण सांगा' असे लिहिणे, 'समारंभ' या ऐवजी 'समारोह', 'साजरा झाला' या ऐवजी 'संपन्न झाला', असल्या नावीन्याने मराठी भाषा सुंदर होत आहे की बिघडत आहे, याचा विचार नाविन्य आणि अनुकरण यांच्या वेडात आपण विसरत चाललो आहोत. अखिल भरत खंडाची भाषा कधी काळी एक होणे शक्य आहे असे गृहीत धरले तरीही, आपल्या इतिहास प्रसिद्ध भाषा क्लिष्ट आणि कुरूप करणे क्षम्य ठरणार नाही.

या भाषा-शुद्धीच्या आढाव्यात भाषाशुद्धीच्या मार्गातील खाचाखळग्यांचाही विचार करणे अपरिहार्य झाले. भाषाशुद्धीचे प्रवर्तक स्वातंत्र्यवीर सावरकर आणि डॉ. माधवराव पटवर्धन हे दोघे जितके बुद्धीमान तितकेच आग्रही होते. अॅलोपथीच्या शास्त्रात ज्या प्रमाणे एक रोग बरा करताना दुसरा एखादा रोग उद्‌भवण्याचा धोका उघड्या डोळ्यांनी पत्करतात, तशीच त्यांची कार्य-पद्धती होती. एक ऐतिहासिक प्रमाद दूर करीत असता इतर काही भाषिक तोटे झाले तरी त्याची हे उभय विद्वान क्षिती बाळगित नसत. त्या त्यांच्या स्वभावात जसा एक पराक्रम होता तसेच अन्य काही धोकेही होते. त्या धोक्यांचा विचार केल्याखेरीज मराठीतील भाषा-शुद्धीचा आढावा पूर्ण होणार नाही. पण म्हणजे त्याचा अर्थ सावरकरांच्या धडाडीने आणि कुशाग्र बुद्धीचे भाषेच्या क्षेत्रातील कार्य कोणी कमी लेखतील

असा नव्हे. या लेख-संग्रहातील एकेक लेख म्हणजे जणू जळता पलीता आहे. त्यातील प्रतिपादनाने कोणाही भाषाभ्यासकाला आपल्या मतांचा आणि समजुतींचा पुनर्विचार करावा लागेल. मराठी भाषेतील, शुद्धी चळवळीला जेवढे झुंजार नेते लाभले तेवढे हिंदुस्थानातील अन्य कोणत्याही भाषेला क्वचितच लाभले असतील. आणि मदनलाल धिंग्रासारख्या निधड्या छातीच्या वीराला स्फूर्ती देणारा, भारतातील अनेक 'धिंग्रांना' पुस्तकांच्या वेष्टणातून पिस्तुले पाठविणारा, काळ्या पाण्यावरील अंधार कोठडीतही भिंतीवर महाकाव्य लिहिणारा हा असामान्य वीर, अंदमानातून सशर्त सुटका होताच एखाद्या भाषेच्या प्राध्यापकाला शोभावी अशी चळवळ तितक्याच एकनिष्ठपणे हाती घेतो, हा एक विलक्षण चमत्कारच मानावा लागेल! शिवाजी महाराज, लेनिन, कमाल पाशा यांच्या सारखे अनेकांगी प्रतिभेचे वीरच सावरकरांच्या तुलनेसाठी आठवावे लागतील, आणि अशा असामान्य क्रान्तीकारकांच्या कर्तृत्वातही सावरकरांचे कर्तृत्व असामान्य ठरेल. भाषाशुद्धीच्या समालोचनाच्या निमित्ताने सावरकरांच्या ऐतिहासिक कर्तृत्वाचेही स्मरण झाल्याशिवाय रहाणार नाही.

सावरकरांच्या भाषा-शुद्धीविषयक लेखांचे पुनर्मुद्रण करून 'साहित्य संस्कृती मंडळा'ने केवळ भाषा-शुद्धीच्या कार्यालाच हातभार लावला आहे असे नव्हे, तर एका असामान्य महाराष्ट्रीय वीराच्या चरित्राचे पुनःस्मरण करून दिले आहे. याबद्दल साहित्य संस्कृती मंडळाचे अभिनंदन करणे जरूर आहे. त्यांच्या ह्या पुण्यकर्मात त्यांच्या हाताला हात लावण्याची संधी मला त्यांनी दिली याबद्दल मी त्यांचा आभारी आहे.

श्रीकृष्ण के. क्षीरसागर

३ नोव्हेंबर १९७७.
पुणे विद्यापीठ परिसर,
पुणे ७.



# मराठी भाषेचें शुद्धीकरण

[पूर्वार्ध]

१. गेल्या अडीचशें–तीनशें वर्षांत म्हणजे मराठी भाषेच्या अैतिहासिक कालांत तिच्यावर बाटून जाण्याचा प्रथम प्रसंग, ती भाषा बोलणाऱ्या लोकांवर बाटून जाण्याचा प्रथम प्रसंग कोसळला तेव्हांच आला होता. अल्लाअुद्दीन खिलजीनें दक्षिण देश जिंकल्यानंतर मुसलमानी धर्म हिंदु लोकांस आपले कह्यांत आणण्याचा तीव्र व प्रसंगीं क्रूर यत्न जेव्हां करीत चालला व जेव्हां त्याच्या अर्धचंद्राच्या अंधुक अुजेडांत हिंदु राज्यश्रीस आपला दिवस मावळला हें स्पष्ट दिसून येअून तिचें मुख म्लान झालें तेव्हांच मुसलमानी भाषा हिंदु भाषेसहि आपले कह्यांत आणण्याचा प्रयत्न करूं लागली.

## मुसलमानांची अशी भाषाच नाहीं

२. मुसलमानांनीं हिंदुस्थानांत स्वतःची अशी कोणतीहि भाषा आणली नाहीं. मुसलमान हे कांहीं अिंग्लिश लोकांसारखे अेकाच राष्ट्राचे लोक नसल्यानें त्यांची सर्वांची मिळून मुळीं अेक भाषा अशी नव्हतीच. पठाण, तुर्क, आरब, अिराणी अित्यादि ज्या अनेक जाति व राष्ट्रें वेळोवेळीं हिंदुस्थानांत स्वाऱ्या करून आलीं त्यांच्या पुश्तु, अिराणी अित्यादि निरनिराळ्या भाषा होत्या. अितकेंच नव्हे तर त्या भाषांत परस्पर द्वेष व तिरस्कार मराठी नि अिंग्रजी भाषांमध्यें वसत आहे त्याहून अधिक वसत होता. असें सांगतात कीं, महंमद पैगंबराकडे अेकदां अेक परदेशीय मनुष्य आला. महंमदानें आरबी भाषेंत विचारलें, 'तूं कोण ?' त्यानें पुश्तु भाषेंत अुत्तर दिलें "मी अेक पठाण आहें. आमचा देश अिराणच्या पलीकडे आहे." महंमदास त्या पठाणाचे ते कठोर व घोगरे शब्द अैकून व ते न समजल्यानें थोडीशी चीड येअून तो म्हणाला, "या अल्ला! हीच ती नरकांतली भाषा!"

३. आरबी, अिराणी, पुश्तु अित्यादि भाषांत अितकें वितुष्ट असतांहि आरबी ही मुसलमानांच्या धर्मग्रंथाची–कुराणाची–भाषा असल्यानें व कुराण केवळ आरबींतच

वाचलें जावें, अन्य न कळला तरी तें आरबींत वाचलें जावें, अितकेंच नव्हे तर त्याचें भाषांतर करणें व तें वाचणें ह्या दोन्ही कुराणवाचनाच्या स्थळीं विकल्प होअूं शकत नाहीं, त्या प्रार्थना देवास पोंचत नाहींत, असें म्हणणारे व कांहीं तर कुराणाचें भाषांतर करणें पाप आहे असें प्रतिपादन करणारे मौलवी अजूनहि शेंकड्यांनीं सहस्रांनीं जिवंत असल्यानें मुसलमानांच्या सर्व भाषांवर आरबीचा पगडा बराच बसलेला होता. अरबस्थानांतून मुसलमान जेव्हां अिराणांत घुसले नि सर्व अिराणभर आपल्या धर्माचा फैलाव कांहीं तलवारीनें, कांहीं आमिषानें नि कांहीं अुपदेशानें करीत, त्यांनीं अिराण मुसलमानमय करून टाकिलें तेव्हां अिराणांतील कमावलेल्या पुरातन नि सुंदर अिराणी भाषेनें आरबी भाषेवर धार्मिक क्षेत्र सोडून अितर सर्व विषयांत आपलें पूर्ण वर्चस्व स्थापित केलें.

## अखिल मुसलमानांची अेक भाषा होणें शक्य दिसत नाहीं

४. पर्शियन व अेरेबियन या दोन भाषा आजकालच्या मुसलमानी राष्ट्रांतील मुख्य भाषा होत. मुसलमानी संस्कृतीचे हे दोन आधारस्तंभ होत. परंतु लॅटिन व ग्रीक या दोन भाषा जरी युरोपीय संस्कृतीच्या मुख्य आधार आहेत तरी युरोपची अेक भाषा आहे असें जसें म्हणतां येत नाहीं तसेंच मुसलमानांची म्हणून अेक भाषा आहे व होती हेंहि आरबी वा पार्शियन भाषेंत त्यांची संस्कृति व्यक्त झालेली आहे म्हणून म्हणतां येत नाहीं. त्यांतहि पूर्वीची धर्मवेडी भावना संपून आतां राष्ट्रीय भावनेचा अुदय जसजसा होत जात आहे तसतसा ज्या त्या मुसलमानी राष्ट्रास आपआपल्या राष्ट्रीय भाषेचा अभिमान आरबीपेक्षांहि अधिक वाटत आहे. तुर्कस्थानानें तर तुर्की भाषेवरील आरबी भाषेचें वर्चस्व झुगारण्याची अुघड प्रतिज्ञा केली असून शाळेंतून आरबी शिकविणें बऱ्याच अंशीं बंद केलें आहे. अफगाणिस्थानानेंहि आपलें राजकीय लिखित पर्शियन वा आरबींत ठेवण्याचें बंद करून पुश्तूंत ठेवण्यास सुरवात केली आहे. अशा रीतीनें सर्व मुसलमानांची अेक भाषा अशी कधींच नव्हती हें जितकें खरें आहे तितकेंच हेंहि खरें आहे कीं, ती तशी होअून सर्व मुसलमान आरबीसच आपली अेक भाषा करतील हें शक्य नाहीं. ही 'पॅन अिस्लामी' धर्मवेडी आशा सफळ होण्याचें यापुढें तर मुळींच चिन्ह दिसत नाहीं.

## अुर्दूची अुत्पत्ति

५. मुसलमानांस त्यांची अशी कोणतीच अेक भाषा नसल्यानें त्यांच्या टोळ्या व सैन्य जेव्हां हिंदुस्थानांत स्थिर होअूं लागले व राज्यें स्थापूं लागले तेव्हां तेथील लोकांच्या भाषांशीं त्यांच्या टोळ्यांच्या भिन्न भाषा भेसळ होअूं लागल्या. कोणत्याहि

राष्ट्रास जित राष्ट्रांत राज्य चालविण्यासाठीं अवश्य असणारें विचारांचे दळणवळण दोन रीतींनीं करितां येते. एक तर जित राष्ट्रावर आपली भाषा लादून किंवा आपण त्यांची भाषा शिकून. मुसलमानांसारख्या मूठभर लोकांनीं या देशांत पिढ्यानुपिढ्या स्थिर वसाहती केल्यानें, त्यांच्यांत मुख्य भरणा येथील हिंदु समाजांतील धर्मभ्रष्टांचाच असल्यानें व त्यांच्या संस्कृतींत व भाषेंत हिंदु संस्कृतीवर वा भाषेवर पृथ्य वर्चस्व स्थापण्याअितकें बळ वा श्रेष्ठत्व मुळांतच नसल्यानें त्यांस हिंदु लोकांचीच भाषा शिकून येथें राज्य करावें लागलें.

परंतु आज अिंग्लिश लोकांचे घरीं चाकरी करणाऱ्या बबर्चींची भाषेच्याविषयीं जी स्थिती होते अशीच स्थिति मुसलमानांनीं शिकलेल्या हिंदूंच्या भाषेची झाली. बबर्जी लोकांशीं बोलतांना साहेब हिंदींतच बोलतात, पण नामें विशेषणें तेवढीं अिंग्रजी दडपून देतात, तसेंच मुसलमानांनीं हिंदु नोकरांशीं बोलतांना हिंदी भाषेंत आपल्या आरबी, पर्शियन व तुर्की भाषेंतील नामें व विशेषणें घुसडून दिलीं. त्यायोगानें जशी अिंग्रजीपासून 'बबर्जी अिंग्लीश' अुत्पन्न झाली त्याचप्रमाणें हिंदी भाषेपासून अुर्दू भाषा अुत्पन्न झाली. अुर्दू या शब्दावरूनच त्या भाषेच्या खेचरी प्रकृतीचा बोध होतो. मुसलमान लोक, प्रथम मुसलमानी सैनिक संघ, हिंदुस्थानांत घुसल्यानें त्यांच्या सैन्यशिबिरांत हजारों हिंदु नोकरचाकर दासदासी यांच्या संघटनानें हिंदी भाषेचा प्रचार होअून आणि त्यांतच बोलतां बोलतां अरबी व पर्शियन प्रयोगांची, नामांची वा विशेषणांची भर पडून विकृत हिंदी अस्तित्वांत आली; ती "छावणींतील हिंदी," म्हणजेच अुर्दू हे नांव पावली. कारण अुर्दू या शब्दाचा तुर्की अर्थ लष्कर–सेना असा आहे. अिंग्लिशमध्यें 'होर्ड' हा शब्दहि त्यांचेंच रूपांतर होअून घुसला आहे

मुसलमान लोक प्रथमतः पंजाबच्या वा सिंधच्या बाजूस घुसून दिल्लीपाशीं स्थिरावल्यानें त्यांना तिकडे अत्यंत साधारण असलेली हिंदी भाषा अर्थात् हिंदीच्या त्या काळच्या पूर्वस्वरूपांतच शिकावी लागली. म्हणून आजकाल मुसलमान हिंदुस्थानांत जी भाषा बोलतात ती वास्तविक हिंदीच आहे. अुत्तर हिंदुस्थानांत काशीपासून वर मोठमोठ्या ब्राह्मण पंडितांचे घरींहि बायकापोरांपर्यंत हिंदु लोकांची हिंदीच मातृभाषा असल्यानें त्यांना हें सांगावें लागत नाहीं कीं मुसलमान जी भाषा बोलतात ती हिंदीच, हिंदु लोकांचीच, होय. परंतु आपल्या दक्षिणेकडे हिंदु लोक मराठी व कानडी आदि भाषा बोलत असल्यानें अेकादा मुसलमान केव्हां केव्हां हिंदी बोलूं लागला तर आपल्यांतील शेंकडों लोकांना वाटतें कीं हीच "मुसलमानी भाषा" होय. पण ही फार मोठी चूक आहे. "अिधर आओ, अुधर जाओ" ही मुसलमानी भाषा नसून हिंदूंची हिंदी भाषा होय.

## अुर्दू म्हणजे विकृत आणि म्लेंछीकृत हिंदी

६. खरें पाहतां अुर्दू ही वेगळी भाषा नसून हिंदी भाषेचें तें अेक विकृत रूप आहे. अुर्दूचे सर्व विभक्ति प्रत्यय, बहुतेक नामें विशेषणें, सर्व धातुसाधितें, लिंगविचार, म्हणी, वाक्य रचना, सर्व व्याकरण अगदीं हिंदी आहे. केवळ तिच्यांत सूर्याला 'आफताब' म्हणतील, राज्यक्रांतीला 'अिन्कलाब' म्हणतील, गुरूला 'अुस्ताद' म्हणतील. म्हणजे नामें नि कांहीं विशेषणें तेवढीं परकीय आरबी वा पर्शियन आहेत. तींहि अगदीं अलिकडे मुसलमानांत हिंदु संस्कृतीच्या विरुद्ध जेव्हां दुराग्रह अुत्पन्न होअूं लागला तेव्हांपासून जाणूनबुजून घुसडण्यांत येअूं लागलीं. आतां निजामशाहींतील मुसलमानी विश्वविद्यालयांत तर अुर्दूला हिंदी भाषेपासून जितकी दूर नेववेल तितकी नेण्याचा भगीरथ प्रयत्न सुरू झालेला आहे! परंतु हिंदी आंब्याच्या बीजापासून झालेल्या झाडाला अरेबियांतील रेतीचे कितीहि खत घालतें तरी तें झाड जिवंत राहील तोपर्यंत हिंदी आंब्यांचेंच राहणार हें अुघड आहे.

## हिंदीची दुःस्थिती

७. तथापि हिंदी भाषेच्या बुडाशीं हें अरेबियन रेतीचें खत घालीत जाण्याचा हा क्रम अेकसारखा चालूच राहिला तर ती हिंदी भाषा लवकरच मरणोन्मुख होअील हें अुघड आहे. पंजाबांत, अुत्तर हिंदुस्थानांत वा सिंधमध्यें हें संकट त्या त्या भाषांचा गळा कसें व किती घट्ट दाबतें झालें हें त्या त्या भाषांतून शेंकडा ५० वर शब्द अरेबियन वा पर्शियन वा तुर्की पडतात व त्या शब्दांच्या तडाख्यांतून सुटण्याचा प्रयत्न करितांनाहि तिकडील पुढाऱ्यांस तो साधत नाहीं ह्यावरूनच अुघड होतें. असे कित्येक आर्यसमाजी पुढारी आहेत कीं, ज्यांच्या मनांतून पंजाबी व हिंदी भाषेस या अरेबियन भाषेच्या हल्ल्यांतून वांचवावें व हिंदु भाषा पुनः 'शुद्धीकरणानें', शुद्ध करून घ्यावी असें आहे. परंतु हे शुद्धीकरणाचे विचारही ते प्रकट करावयास गेले कीं त्याच अरेबियन शब्दांस शरण गेल्याविना त्यांस अेक वाक्यहि लिहितां येत नाहीं नि तेंहि पर्शियन अुलट्या लिपींत! तिकडे हिंदु लिपी तर ठार मारली गेली! सिंधमध्यें रामायणसार धार्मिक लोक वाचतात व गीतेची सिंधी टीका पठण करितात, पण ती पर्शियन 'अलेफ, बे, ते' च्या लिपींत!! नागरी व अन्य हिंदु लिपि सुशिक्षितांच्या सहस्रांत अेकाद्यालाच ओळखितां येअील, लिहितां तर अेकाद्यालाहि येणार नाहीं.

## मराठीवरील प्रथम संकट आणि त्याचा प्रथम प्रतिकार

८. हीच स्थिती अल्लाअुद्दीन खिलजी दक्षिणेंत आल्यानंतर दाक्षिणात्य हिंदु

भाषेची झाली असती, जवळ जवळ होतहि आली होती. परंतु श्रीशिवरायांच्या स्वराज्यस्थापनेच्या प्रयत्नानें जी हिंदु जनतेंत नवजीवनाची लाट अुत्पन्न झाली तींत व त्यायोगें ही दुःसह स्थिती संपून मराठीवरचें पहिलें संकट टळलें. महाराजांनींहि रघुनाथ पंडिताकरवीं राज्यव्यवहार कोश रचवून, राजलिखित मराठींत ठेवावयास प्रारंभ करवून नि संस्कृत भाषेच्या अभ्यासास अुत्तेजन देअून मराठीस मुसलमानी कचाटींतून सोडविण्याचा प्रयत्न केला. त्याचा परिणामहि हळू हळू होअून नानासाहेब पेशव्यांच्या अुत्तर हिंदुस्थानांतील पत्रांत वा अंतीं मोरोपंताच्या शुद्ध, सरळ व म्लेंच्छ शब्दसंपर्कानें अकलुषित असलेल्या सुंदर कवितेंत दिसून येणारें शुद्ध स्वरूप मराठीस लाभूं लागलें. परंतु स्वराज्यक्षयानंतर ही भाषाशुद्धीची चळवळहि पुन्हा बंद पडली. श्रीशिवरायापासून मोरोपंतापर्यंत मराठींतून मुसलमानी शब्दांची अुचलबांगडी करण्याचे प्रयत्न चाललेले असतांहि तींत राजकीय व व्यावहारिक विषयांवरील अनेक शब्द अितस्ततः लपून-छपून राहून गेले ते तेव्हांपासून आजपर्यंत तसेच राहिले आहेत.

## मराठीवर दुसरें संकट आणि त्याचा दुसरा प्रतिकार

९. मराठी भाषेवर मुसलमानी हल्ल्यानंतर परकी भाषेचा हल्ला अिंग्रजी भाषेचा झाला. परंतु पहिला मुसलमानी हल्ला परतविण्याचें श्रेय जसें श्रीशिवाजी महाराज व त्यांचे अुत्तराधिकारी यांनीं संपादन केलें, त्याचप्रमाणें मराठी भाषेवरील हा हल्ला परतविण्याचें श्रेय घेअून निबंधमालाकारांनीं स्वतःच मराठी भाषेचे शिवाजी ही अन्वर्थक पदवी संपादिली. शास्त्रीबोवांनीं जागृत केलेल्या स्वराष्ट्राभिमानाचें पाणी महाराष्ट्रीय लेखणीस लागतांच प्रत्येक वाक्यांत अिंग्रजी शब्द घुसडून देण्यांतच ज्ञानाची व सुधारणेची परमावधि मानणाऱ्या छचोर लोकांच्या विटाळापासून ती बरीच अलिप्त राहिली व ती परंपरा पुढें चालत आज अुभ्या हिंदुस्थानभर व्यावहारिक तर काय, परंतु शास्त्रीय परिभाषेंतील शब्दहि शक्य तों अिंग्रजी न आणतां स्वभाषेंतीलच असले पाहिजेत असा पक्का निर्धार नि त्याप्रमाणें थोडीबहुत कृतीहि हळू हळू होअूं लागली आहे.

अिंग्रजी भाषेचा हल्ला येतांच तो परतविण्याची व्यवस्था केली गेली असल्यानें वास्तविक पहातां मराठी भाषेचें हें दुसरें शुद्धीकरण करण्यास फारसे प्रयास पडले नाहींत. परंतु मुसलमानी शब्दांचें वर्चस्व मराठीवर अितकें भयंकर व अितकें दीर्घकालपर्यंत टिकलें कीं त्यांची हकालपट्टी करण्याचे प्रयत्न पूर्वी झालेले असतांहि मध्ये ते अगदीं शिथिल होअून पडल्यानें आज पुनः तेंच करणें अपरिहार्य होअून

असलेलें आहे. आज मराठी भाषेच्या शुद्धीकरणाची खटपट आम्हीं करावी म्हणून म्हणतों तें शुद्धीकरण विशेषतः या मुसलमानी शब्दांपासून होय. हे मुसलमानी शब्द आपल्या घरादारांत चोरांसारखे शिरून धन्यासारखे शिरजोर होऊन बसलेले आहेत.

## परकीय शब्दांची स्वकीय शब्दांवर होत असलेली कुरघोडी

१०. अुदाहरणार्थ 'मालक' हा शब्द घ्या. घराचा मालक, दाराचा मालक, अशा रीतीनें बायकापोरांपर्यंत 'मालक' हा शब्द तोंडी खिळलेला आहे. अितकेंच नव्हे तर तो परकी आहे व तो टाळावा अशी अिच्छा असूनसुद्धां तो पटकन् तोंडांतून निघून जातो.

आम्हीं कित्येक लोक असे पाहिले आहेत कीं, ज्यांस 'मालक' हा शब्द जर वापरावाचा नाहीं तर तदर्थक दुसरा स्वकीय शब्द कोणता घालावा हेंच समजत नाहीं. अितका शिरजोरपणा त्या शब्दाचा आपल्यावर चालत आहे. गुजराथेंत व अुत्तर हिंदुस्थानांत विचारावयालाच नको. तिकडे देवाला देखील 'मालिक' म्हणतात व प्रभु देव–अीश्वर हे शब्द वापरण्याची प्रतिज्ञा आम्हांसमक्ष केली असताहि त्यांतील शेंकडों लोक पुनः हे "मालिक" 'मालिक' करेगा सो सच!" अित्यादि प्रयोग झटकन करून जातांना आम्हीं पाहिले आहेत. आपण 'हे भगवन्', हें जितकें सहज म्हणतों तितकेंच तिकडचा वेदशास्त्रसंपन्न ब्राह्मण त्या अर्थी पटकन् 'हे मालिक' म्हणून बसतो. मालिक म्हणजे धनी, स्वामी प्रभु. ह्याअर्थी असे सोपे, आटोपसर व सुंदर स्वकीय शब्द असून मग या परकीय शब्दांची अितकी शिरजोरी आम्हीं काय म्हणून चालूं द्यावी!

तीच स्थिती 'जखमी' शब्दाची होय. अमुक लोक जखमी झाले या वाक्यांत जखमी शब्द काढावयाचा म्हटला तर त्याला प्रतिशब्द पटकन् सुचत नाही! जखमी म्हणजे घायाळ, विक्षत. जखम म्हणजे घाव, क्षत, व्रण हें सांगितल्यावरहि तो शब्द तोंडांतूनच नव्हे तर लेखणींतूनहि जात नाहीं. रामायणासारख्या धर्मग्रंथाच्या भाषांतरांतूनही "श्रीरामचंद्राच्या धनुष्यापासून सुटलेल्या अमोघ शरानें त्या दैत्येंद्राला जबरदस्त जखम झाली!" असलीं धेडगुजरी वाक्यें सर्रास येत असतात. अितकी या जखमेची जखम मराठीच्या मांसांत खोल गेलेली आहे. तिसरें अुदाहरण "हवा" या शब्दाचें! या हवेनें मराठीचें सर्व वातावरण अगदीं दूषित करून टाकिलें आहे. वातावरणच नव्हे पण पाणी देखील! कारण कुठलेंही पाणी कसें आहे हा प्रश्न निघाला कीं, हवा हात धुवून त्याचे पाठीस लागलीच म्हणून समजावें! काशीक्षेत्राचें

हवापाणी कसें आहे म्हणून धन्ममार्तंडहि विचारतांना अैकूं येतात, नि 'हवापालट करण्यासाठी वा हवा खाण्यासाठीं' अशीं वाक्यें धन्माचार्यांच्या मठींतूनच नव्हे तर मुखांतूनही बिळें करून बसलेलीं दिसतात. या हवापाण्याचा परिणाम आपल्या मराठीच्या आरोग्यावर अितका वाअीट झाला आहे कीं, 'हवा' या शब्दाचे स्थळीं 'वायु' हा शब्द घालतांच तिचें पाणी अुतरून जातें. हवा खाण्यास ती गेली असतां तिचा श्वासोच्छ्वास ठीक चालतो, पण वायु खाण्यास चल असें म्हटलें कीं श्वासोच्छ्वासाची क्रिया आश्चर्यानें स्तंभित होअून जाते!

## काव्यांत नड

११. असे शेंकडों मुसलमानी शब्द आजपर्यंत आपल्या मराठी भाषेत अितके प्रबळ होऊन बसले आहेत कीं, त्याच अर्थाचे जे आपले पूर्वीचे शब्द होते त्यांना त्यांनीं मागमूस देखील अुरूं दिला नाहीं. बरें हे जे नवीन पण परकीय शब्द भाषेंत रूढ होऊ बसले ते बहुधा आपल्या भाषेच्या प्रौढपणास व स्वभावास अितके अपरिचित व अयोग्य आहेत कीं, व्यवहारांतून साहित्यांत पाय ठेवतांच त्यांची विक्षिप्तता अुघडकीस येते. ज्यांनीं ज्यांनीं प्रचलित विषयांवर कविता करण्याचा प्रयत्न केला असेल त्यांस ही अडचण कशी नडते हें ठाअूक असेल. कवितेंत 'हवा' शब्द कितीहि रेंधून घेतला तरी कांहीं केल्या बसत नाहीं. 'रजा' घेतली हा विचार प्रदर्शित करूं लागावें तर रजेचा मूळ शब्द लुप्त झालेला व अगांतुक पण धनी होऊन बसलेला रजा शब्द कांहीं केल्या कवितेच्या कोमल प्रकृतीस न मानणारा असल्यानें चूप बसून त्या विचाराचीच 'रजा' घ्यावी लागते! गीतारहस्यासारख्या वेदांताच्या पुस्तकांत जरी "ब्रह्मशिवाय" हा शब्द आपण अुघडपणें वापरूं शकतों तरी कवितेंत ती शब्द-युति किती अप्रौढ व खेडगुजरी दिसेल हें सांगावयास नकोच. आम्हांला असा अनुभव आहे कीं, अनेक वेळां व्यवहारांत "यादी, हजर" अित्यादि मुसलमानी शब्द ज्या अर्थी रूढ झालेले आहेत तो अर्थ कवितेंत व्यक्त करणें अगदीं कठीण होअून बसतें. मुसलमानी व्यवहृत शब्द कवितेस मानवत नाहीं; तदर्थक स्वकीय संस्कृत शब्द घातला तरी मल्लिनाथीविना वाचकांस समजत नाहीं.

## आजचें कर्त्तव्य आणि त्याकडे होणारें लोकांचें दुर्लक्ष

१२. अशा स्थितींत हें पंगुपण घालविण्यास मराठी भाषेच्या शुद्धीकरणाचें श्रीशिवाजी महाराजांनीं आरंभिलेलें, मोरोपंतादिकांनीं समर्थिलेलें मालाकारांनीं पुनरुज्जीविलेलें तेंच हें कार्य पुढें चालवून स्वभाषेंतील राहिलीसाहिली घाण धुवून काढण्यासाठीं

झटणें हें प्रत्येक स्वभाषेवर प्रेम करणाऱ्या पुरुषाचें कर्तव्य आहे. पण आश्चर्याची गोष्ट अशी कीं, आजकाल मराठी भाषेंत अिंग्रजी शब्द घुसडून देण्याचा प्रयत्न जरी बराच सुसंगतपणें चालला आहे तरी निष्कारण घुसलेल्या व आतां अगदी शिरजोर होअून बसलेल्या मुसलमानी शब्दांची घाण झुडून काढण्याकडे कोणाचेंच लक्ष जात नाहीं. अितकेंच नव्हे तर त्या शब्दांत जणुं काय कांहीं अद्‌भुत मंत्रशक्ति भरलेली आहे असें समजून त्यांचा अुपयोग करण्यांत कित्येक भूषण मानूं लागले आहेत.

## जुन्या मराठीची विपर्यस्त कल्पना आणि 'शाहिरी' कविता

१३. पूर्वी मुसलमानी राजसत्तेंत घुसलेले जे म्लेंच्छ शब्द पेशवाअींत आढळत होते, परंतु सुदैवानें जे त्यानंतर लुप्तप्राय होअून गेले व तदन्थक मूळचे वा नवे सुंदर शब्द पुनः रूढ झाले, ते म्लेंच्छ शब्दहि जाणूनबुजून "जुनी मराठी" म्हणून अुकरून काढून आजच्या मराठींत घुसडण्याचा कांहीं लोक जो प्रयत्न करीत आहेत तो पाहून हंसावें कीं रडावें हें समजत नाहीं. याच विपर्यस्त कल्पनेनें प्रेरित झालेलें 'शाहिरी कविता' म्हणून अेक नवें बंड माजूं पहात आहे. जुन्या पोवाड्यांच्या धर्तीचेंच, नव्हे-तें क्षम्य, क्वचित् युक्तहि होतें-तर त्यांतील म्लेंच्छशब्ददूषित भाषेचेंहि अनुकरण करण्याची हांव धरून त्यांत आपण कांहीं अद्वितीय करीत आहों असा समज जो आजकाल कित्येक टिकाणीं पसरत चाललेला आहे, तो जितका शीघ्र सोडण्यांत येअील तितका बरा.

"शाहिरी" कवितेंत जी अेक प्रकारची अैट व जिवंतपणा दिसून येतो तो तींतील म्लेंच्छ शब्दांचे प्रयोगानें आलेला नाहीं. तो त्या वेळच्या राजकीय आयुष्याच्या जिवंतपणाने आलेला आहे. ती अैट त्या शब्दांत नसून त्यांतील वर्णनीय असलेल्या अर्थांत आहे. त्यांत जे पुरुष जो पराक्रम गाजवितात त्यांची स्मृतिचित्रें तीं कवनें अैकतांनां मनास अुत्तेजित व अुत्स्फूर्त करीत जातात. त्यायोगें तीं कवनें सुरुवतेंकरून रसभरीत वाटूं लागतात, जिवंत दिसतात. त्यांतील म्लेंछ शब्दांनीं तीं तशीं दिसत नाहींत. अुलट हे म्लेंछ शब्द त्यांतील स्वातंत्र्यरसाचा नि वीररसाचा केव्हां केव्हां तर थोडासा भंगच करितात. कारण खर्ड्याच्या लढाअीचे पोवाड्यांत भर विजयाचे कडाक्यांत जेव्हां मुसलमानी शब्दांचा मारा कानांवर होअूं लागतो तेव्हां मुसलमानी तोफांचा मारा मराठी धारकऱ्यानीं बंद केल्यानें वाटणारी कृतार्थता थोडी अपुरीच वाटूं लागते.

तरीहि त्या जिवंत काळास तें सत्व शोभत होतें. पण आतां तें जिवंत राजकारण मेल्यानें तो वीररस केवळ त्या शब्दांच्या जोरावर पुष्पपणानें आणूं पहाणें वेडेपणाचें होईल. जेव्हां जनकोजीनें चढत्या तरवारीसह रणांत चालून घेतलें तेव्हां त्याचे अंगावरील आघातप्रत्याघातांनी रक्तबंबाळ व खड्गजीर्ण झालेलीं वस्त्रेंहि शोभा पावत होतीं; पण म्हणून जर अेकाद्या मेणाच्या पुतळ्यावर तीं वा तशींच आपण चढवीत बसूं तर तो जानकोजी न होतां केवळ त्याचा निर्जीव पुतळाच काय तो होईल. तरीहि जुन्या मराठीचा शक्य तितका सुटसुटितपणा, सकसपणा व सडेतोड-पणा आपण अनुकरण्याचा प्रयत्न करूंच करूं. पण तो जुन्या मराठीचा; मुसलमानी मराठीचा नव्हे.

जुन्या "शाहिरी" कवितेंत असलेले मुसलमानी शब्द शक्य तितके निवडून काढून टाकण्याचे स्थलीं, तें त्या कवितेचें लांछन–जरी तिच्या तेजांत लुप्त होअून जातें तरी पुसून टाकण्याचे स्थलीं, जणूं काय ते शब्दच तिचें भूषण, मर्म, नव्हे जीवित आहे, असें समजून त्याचें अनुकरण करणें व त्या मेलेल्या शब्दांस पुनः जिवंत करणें हें मराठी भाषेवर गेलेलें संकट फिरून आणिल्यासारखें होणार आहे.

"शाहिरी" हा शब्दहि त्याज्यच आहे. शाहिर म्हणजे कवि. तेव्हां शाहिरी कविता याचा अर्थ कवींची कविता! शाहिरी म्हणून ज्या विशिष्ट संप्रदायाचा बोध करण्यांत येतो तोच बोध भाट व गोंधळी या शब्दांत पूर्णपणें व्यक्त होतो. जर तो अर्थ कोणास व्यक्त होत नाहींसा वाटला तर तो केवळ संवयीचा परिणाम आहे. दोनचार वर्षांत या जुन्या शब्दांनीं तोच बोध प्रत्येकास होअूं लागेल.

## हा प्रश्न अेखाददुसऱ्या शब्दाचा नाहीं तर प्रवृत्तीचा आहे

१४. हा प्रश्न ज्या प्रवृत्तीनें शेंकडों म्लेंच्छ शब्द मराठींत शिरजोर होअून राहिले आहेत व "शाहिरी" कवितेच्या मूढ अनुकरणाचे भरांत मेलेले जिवंत होअूं पहात आहेत, त्या चुकलेल्या "प्रवृत्तीचा" होय. ही प्रवृत्ति जोंवर अजून नवीनच आहे तोंच तिच्या दुष्परिणामापासून मराठीचें संरक्षण करण्यासाठीं ही जुनी शुद्धीकरणाची चळवळ सुरू करणें पुनः प्राप्त आहे.

## मुसलमानांची घातक महत्वाकांक्षा

१५. आणखी अेका कारणाकरितां मराठीच्या शुद्धीची चळवळ आज अगदीं अवश्य होअून बसली आहे. मागें आम्हीं सांगितलेंच आहे कीं, ज्या भाषेस दक्षिणेंत

आपण 'मुसलमानी' भाषा म्हणून म्हणतों ती मुसलमानी नसून 'हिंदी' म्हणजे या हिंदुस्थानांतच निपजलेली, वाढलेली व मुसलमानांनीं हिंदूंपासून शिकलेली अेक हिंदु भाषा होय. परंतु तीच भाषा देवनागरी लिपींत लिहिण्याचे स्थलीं परक्या पर्शियन लिपींत लिहिण्याची भयंकर पद्धत मुसलमानी राज्यांत पडल्यानें व त्या पद्धतीला राजा तोडरमलसारख्या पुरातन हिंदु कारभाऱ्यापासून तों लाला लजपतरायासारख्या अर्वाचीन लेखकांपर्यंत अुत्तर हिंदुस्थानांतील हजारों हिंदु लेखकांनीं हेतुपूर्वक वा निरुपाय म्हणून अुचलून धरल्यानें व मुसलमानांच्या सहवासानें तिच्यांत अरेबी, फारसी व तुर्की शब्द घालणें म्हणजे लेखकाच्या मोठ्या विद्वत्तेचें प्रदर्शन करणें होय, ही कल्पना व रूढी बळावत गेल्यानें आज अुत्तर हिंदुस्थानांत हिंदी भाषेच्या अुदरातच वाढविलेली असली तरी आतां तिच्या प्राणाशीं गांठ घालूं पहाणारी ही तिची विकृति अुर्दू भाषेच्या रूपानें तिचा गळा घोटण्याचा प्रयत्न करूं लागली आहे.

हिंदुस्थानांतील सर्व मुसलमान लोकांची अेक भाषा व अेक लिपी असावी, अशी अिच्छा मुसलमान समाजास असणें हें साहजिक आहे. सर्व हिंदुस्थानी राष्ट्रास अेक भाषा व अेक लिपी असावी म्हणून ज्या आम्हीं आमच्या स्वतःच्या महाराष्ट्र भाषेचा आम्हांस वाटत असलेला यथार्थ अभिमानहि सोडून देअून हिंदी भाषेस राष्ट्रीय भाषा करण्याचा आज वीस वर्षे अहोरात्र प्रयत्न केलेला आहे त्या आम्हांस सर्व मुसलमानांची अेक भाषा झाल्यास आनंदच वाटणार आहे. परंतु ती भाषा स्वदेशी मात्र पाहिजे. परंतु मुसलमानांच्या आकांक्षा राजकारणांत आजकाल जशा राष्ट्रविरोधी स्वरूपें धारण करूं लागल्या आहेत तशाच भाषेच्या विषयांतहि परभार्जिण्या होत आहेत. ज्या देशाचें ते अन्न खात आले व पाणी पीत आले त्या देशाच्या भाषेपेक्षां अरेबियन, पर्शियन, तुर्क यांच्यासारख्या परदेशी भाषेस हिंदुस्थानांत आणून हिंदी भाषेसच अरेबियन भाषा करून टाकण्याचा आटोकाट प्रयत्न त्यांनीं ठिकठिकाणीं सुरू केला आहे.

## लाजिरवाणी गोष्ट – हिंदु लेखकहि अुर्दूसच परिपुष्ट करीत आहेत

१६. अलिगड कॉलेज व निजामी युनिव्हर्सिटी यांनीं तर अुर्दू भाषेस हिंदी भाषेपासून शक्य तितकें दूर हिसडून अरेबियनांचे व पर्शियनांचे घरांत बांधून टाकण्याचा विडाच अुचलला आहे. पंजाब, सिंध, अयोध्या व अलाहाबाद या प्रांतांत शेंकडों मुसलमान लेखक व अत्यंत लाजिरवाणी गोष्ट की, हजारों मोठमोठे हिंदु भाषाभिमानी व वस्तुतः संबंधीच्या कैचींत सांपडलेले हिंदु लेखक अुर्दूमधले अेकूणअेक संस्कृतोत्पन्न शब्द खड्यासारखे निवडून काढून तदर्थक अरेबियन शब्द

घुसडून देत आहेत! 'खंभा' (खांब) हा शब्द मुसलमानी बाबकापोरांपर्यंत रूढ आहे. पण जाणूनबुजून ते "मसतूल" म्हणून म्हणतील. "रक्षक"च्या स्थलीं "मुहाफिज" म्हणतील. "निर्धन" वा "कंगाल" या अर्थी "मुफलिस" म्हणतील ! या साऱ्या स्वदेशी शब्दांस परदेशी अगडबंब शब्द योजण्याची ही राष्ट्रघातक प्रवृत्ति अितकी परमावधीस पोंचत आहे कीं, त्यायोगें आजकालच्या मुसलमानी मासिकांतील व पुस्तकांतील भाषा मुसलमानांची मुसलमानांसच कळेनाशी झाली आहे !

परंतु हिंदुभाषाद्वेषी लेखकांप्रमाणें हिंदुभाषाविद्वेषी वाचकवर्गहि उत्पन्न व्हावा म्हणून अलिगड व निजामी युनिव्हर्सिटी त्यांतील हजारों विद्यार्थ्यांस प्रतिवर्षी हेंच बाळकडू पाजीत आहे. अितकेंच नव्हे तर प्रत्येक शास्त्राचें शिक्षण अुर्दूमध्येंच द्याव-याचें ठरवून त्यांत आवश्यक पडणाऱ्या हजारों पारिभाषिक शब्दांस अेरेबियन शब्द शोधून काढण्यासाठीं मोठमोठ्या मंडळ्या नेमून लाखों रुपये खर्च करीत आहेत. हे अरेबियनादि परदेशी शब्द हिंदी मुसलमानांत लाखांतून अेकास देखील कळत नाहींत. बंगाली, मराठी मुसलमानांस तर ते अरेबी शब्द संस्कृत परिभाषिक शब्दांहून अधिक अपरिचित भासतात. तरीहि नवीन परिभाषिक शब्द संस्कृतोत्पन्न न घेतां अुर्दूस हिंदी भाषेचा व हिंदी स्वरूपाचा गंध शक्य तितका अुरूं द्यावयाचा नाहीं, तिला बाटवून अरेबीच करावयाचें या राष्ट्रघातकी हट्टानें मुसलमानांचे अुत्तरेंतील पुढारी पारिभाषिक शब्द बनविणेस अरेबी, संस्कृत भाषेहून कमी क्षम असतांहि, तींतूनच घेतात.

## अुर्दूसच राष्ट्रीय भाषा आणि पर्शियन लिपीसच राष्ट्रीय लिपी करा म्हणणारा मुसलमानांचा दुरभिमान

१७. जर ते अरेबियन पारिभाषिक शब्द शिकविण्याचे स्थलीं संस्कृतोत्पन्न शब्द शिकवितील तर बंगालपासून रामेश्वरापर्यंत स्वदेशी भाषा बोलणाऱ्या मुसलमानांस ते अरेबी परिभाषेपेक्षां अधिक सुलभ होअून सर्व हिंदुस्थानची राष्ट्रीय भाषा अेक कर-ण्याच्या प्रयत्नास फार महत्त्वाचें साह्य करूं शकतील. पण हिंदुस्थानची कोणतीहि संस्कृतोत्पन्न वा स्वदेशी भाषा हिंदुस्थानची राष्ट्रभाषा होअूं नये म्हणूनच तर हे अुत्तरेचे मुसलमानी धर्मवेडे अुर्दूचें घोडें अरेबियाकडे अितक्या जोरानें दामटीत चालले आहेत! व आतां तर हिंदीस राष्ट्रभाषा करूं नका–अुर्दूसच करा–असें साहसाचें बोलणें ते अुघड बोलूं लागले आहेत. हिंदुस्थानच्या सिंहासनावर काबूलच्या अमिराला आणवून पुनः मुसलमानी सुलतान स्थापावयाचा हें जसें त्यांचें राजकीय ध्येय ठरलेलें आहे, दहा वर्षांचे आंत हिंदुधर्मासच बाटवून हिंदुस्थानचे देवालयांत

निमाज पढावयाचा, हा जसा त्यांचा धार्मिक निर्धार झालेला आहे, तसाच हिंदु जिव्हेनें बिटाळलेल्या भाषांस पायाखालीं चेंदून हिंदुस्थानचे वाक्पीठावर परदेशी भाषेचा झेंडा शक्य तितका बळकट रोवावा हें त्यांचें वाङ्मयिक ध्येय आहे.

या ध्येयाच्या कचाट्यांत हिंदूंच्या कांहीं भाषा तर जवळजवळ चेंदामेंदा होअून गेल्या आहेत. वर सांगितलेंच आहे कीं सिंधमध्यें हिंदु लिपी तर ठार मारली जाअून स्वतः हिंदूंनाच मुसलमानी लिपिविना कांहींअेक लिहितां येत नाहीं. वाङ्मयांत तर विचारूं नका. गुरु शिष्य अशा अगदीं साध्या शब्दांसहि मोठ्या प्रेमानें सिंधी लेखांत अरेबी शब्द घातले जातात. मोठमोठे अेम्.अे. व बी.अे. सिंधी विद्वान्-पण त्यांना प्रकाश, मिश्रण, व्याख्या, गंभीर, अभ्युदय अित्यादि आपल्याकडे बायका-पोरांपर्यंत रूढ असलेले संस्कृत शब्द आम्हांस शिकवावे लागत! पंजाबमध्येंहि अितकी बाअीट नसली तरी हिंदु साहित्याची जवळ जवळ हीच स्थिति आहे. अरेबियन-अुर्दूविना कोणास लिहितां येत नाहीं, बोलतां येत नाहीं. वर्तमानपत्र म्हणजे काय हें थोड्यांसच कळतें, पण "अखबार" बायकापोरांपर्यंत ठाअुक! हीच स्थिति आग्रा अयोध्येकडे झालेली होती. मोठमोठे हिंदु लेखक, पण अरेबिन पर्शियन चिखलांत त्यांच्या लेखण्या रुतून बसलेल्या.

## शुद्ध हिंदी भाषेचें पुनरुज्जीवन

१८. अशा स्थितींत मुसलमानी अुर्दूच्या या अरेरावीस रोधून तिच्या कचाटीं-तून हिंदु भाषेस मुक्त करण्याचे महत्कार्य झालें याहून अुशीरां सुरू होतें तर—वा अजूनहि चाललें आहे याहून अत्यधिक वेगानें व नेटानें चालविलें गेलें नाहीं तर—अुत्तरेकडे तरी हिंदुस्थानाला मुसलमानी अुर्दूविना दुसरी राष्ट्रभाषा लाभूं देण्याची शक्यताच ठेवावयाची नाहीं ही मुसलमानी दुराकांक्षा फळलीहि असती. पण सुदैवानें हिंदी भाषेचें पुनरुज्जीवन करण्याचे प्रयत्न अेकाअेकी सर्व दिशांनीं असे नेटानें सुरू झाले आहेत कीं या वेळेस हिंदु हिंदी लेखांत अेकाददुसराहि अरेबियन अित्यादि विदेशी शब्द येअूं न देण्याचे कामांत बरीच अहमहमिका चाललेली आहे. अशा अविश्रांत परिश्रमानें आजची हिंदी पुष्कळशी शुद्ध व परदेशी शब्दांच्या कचाट्यांतून निर्मुक्त झालेली दिसत असल्यानें, तिच्या त्या निर्मल रूपास पाहून मराठीसहि आपल्या अंगावर अुडालेल्या शितोड्यांस आपण अजूनहि धुतलें नाहीं याची लाज वाटूं लागावी हें साहजिकच आहे. बंगालची हीच गोष्ट आहे. अगदीं घरादारांत घुसलेल्या मुसलमानी शब्दांसहि निवडून बाहेर फेंकण्यांत येत आहे. मुसलमानी "हवा" जरी आमचे श्वासांत अजून खिळून राहिली आहे तरी हिंदींतून तिचें

स्थलीं 'वाशु' हा शब्द रुळून गेला आहे. या ठिकाणचें "जल वायु कसें आहे", "या ठिकाणी वायु फार कोंदट आहे", "चला वायु ध्यावयास चला" हे प्रयोग आमच्या मुसलमानी "हवेनें" दूषित झालेल्या अिंद्रियांस जरी कसेसेच वाटले तरी ते हिंदी व बंगाली लिखित भाषेंत तरी अगदीं रूढ होअून गेलेले आहेत. हवे-प्रमाणेंच हजारों वाऱ्या शब्दांची अुचलबांगडी होअून आज बंगाली व हिंदी गद्य अितकें प्रौढ, शुद्ध व सबळ झालेलें आहे कीं, मुसलमानी अुर्दूचें वर्चस्व त्यावर पुनः पडणें हें अधिकाधिक अशक्य होत चाललें आहे.

अुर्दू शब्दांच्या प्राणघातक मुसलमानी सर्पशापासून स्वभाषेस मुक्त व शुद्ध करून घेण्याच्या चळवळीची हीच लाट वर पंजाबमध्येंही शिरत आहे. अेका बाजूला आर्य समाजाची स्वदेशभाषेच्या अुत्कर्षार्थ झालेली अविश्रांत खटपट व दुसरीकडे शीखांच्या जागृतीनें त्यांच्या शुद्ध "गुरुमुखी" पंजाबीच्या शुद्धीकरणाचे प्रयत्न या दोनही चळवळींनीं पंजाबांतहि अरेबियनादि परभाषेच्या लचक्यांनीं जीर्ण झालेल्या पंजाबीय हिंदु वाङ्मयाचे हृदयाचे घाव पुनः संस्कृत वाणीच्या जीवनदस्पर्शानें भरून येत आहेत. अशा रीतीनें अुत्तरेंतील मुसलमानांच्या अतिरेकी महत्वाकांक्षेची तित-कीच प्रबळ प्रतिक्रिया अुत्पन्न होअून हिमालयापासून गंगासंगमापर्यंत पंजाबी, हिंदी अित्यादि वाटलेल्या भाषांच्या शुद्धीकरणाचें कार्य तिकडच्या बाटलेल्या मलकाना रजपूतांच्या शुद्धीकरणाअितकेंच जोमानें चाललेलें आहे. सिंधमध्येंहि या आंदोलनाच्या दुंदुभीवर टिपरूं पडलें आहे.

## महाराष्ट्रानें मागें राहतां कामा नये

१९. अशा वेळच्या त्यांच्या त्या स्वाभिमानपूरित प्रयत्नास महाराष्ट्रीयांनीं सहाय्य देणें हें महाराष्ट्राचें कर्तव्य आहे. त्यानें त्यांच्या वाङ्मयांतून हुसकून दिलेल्या पर-देशी शब्दोच्चारास आपण आपल्या मराठीच्या घरांत शिरून दबा धरून बसण्यास संधि देतां कामा नये. त्यांच्या भाषा जेव्हां म्लेंच्छ भाषेच्या दास्याच्या बेड्या भूषण-भूत नूपुर समजून पायांत वागवीत होत्या, तेव्हां ज्या मराठीनें शिवरायादिकांच्या स्फूर्तीनें त्या बेड्या आपल्या पायांतून तोडून काढून टाकण्यासाठीं त्यावर शुद्धी-करणाच्या घणाचे घाव घातले तीच मराठी आतां तिकडील सर्व हिंदु भाषा संस्कृततेच्या गंगेंत न्हाअून परदेशी भाषेचा कलंक धुवून सुस्नात होअून, निष्कलंक वाङ्मयाच्या घाटावर चढत असतां तीच मराठी तिच्या अंगावर पुनः अुडालेला व सांचत आलेला परदेशी शब्दांचा चिखल न धुतां अशी पारोशी व गदळवाणीच राहून त्यांत मिसळूं पाहील तर ते तिचा यथार्थ अुपहास कां करणार नाहींत ?

अेतदर्थ अुत्तरीय प्रगतिशील अशा बंगाली व हिंदी भाषांशीं अुत्तमत्वांत, शुद्धत्वांत व सुसंस्कृतत्वांत जर मराठीस हार जावयाचें नसेल तर तिला त्यांच्या-प्रमाणेंच आपल्या वाङ्मयांत घुसलेले व ज्यांस निवडून नष्ट करण्यासाठीं मागें शिवाजीपासून मोरोपंतापर्यंत आपले सर्व स्वाभिमानी पूर्वज प्रयत्न करीत आले, ते मुसलमानी परदेशी शब्द शक्य तितके आपल्या लेखणीस वा वाचेस न बिटाळतील अशी सावधानता (खबरदारी नव्हे) ठेविली पाहिजे—असा पण केला पाहिजे. शिवाजी महाराजादिकांच्या राजव्यवहारकोशादि आघातांतूनहि जीव बचावून आपल्या वाङ्मयांत धुमाकूळ घालीत असणाऱ्या शेंकडों मुसलमानी परदेशी शब्दांस आपण वापरण्याचें सर्वस्वीं सोडून दिलें पाहिजे. म्हणजे आपल्या मराठीचें गद्य व पद्य अुत्तर हिंदुस्थानांतील हिंदी नि बंगालीमध्यें आजकाल प्रौढ दशेत पोंचत चाललेल्या आपल्या अितर बंधूंच्या गद्याशीं समकक्ष नि समरूप होअून नि संस्कृतोद्भव अशा अनेक हिंदु भाषा अेकजीव होअून त्यांची पुढें-मागें अेकच हिंदु भाषा करण्याच्या ध्येयाकडे अेक पाअूल पुढें टाकिल्यासारखें होणार आहे.

## मराठी वाङ्मय योग्यतेंत बंगाली वा हिंदी वाङ्मयाहून हीनतर नाहीं

२०. येथें अितकें स्पष्टपणें सांगणें अवश्य आहे कीं, प्रस्तुतचा निबंध केवळ शुद्धीकरणाचाच असल्यानें मराठी भाषेची अितर अुत्तरीय भाषांशीं तुलना केवळ अुर्दू शब्दांच्या भेसळीपुरतीच नि त्या अर्थींच केलेली आहे. बंगालींतून वा अर्वाचीन हिंदींतून अुर्दू वा तत्सम परदेशी म्लेंच्छ शब्द पार धुडकावून देण्यांत येत आहेत नि आपल्याकडे आज काल ती दृष्टी सुटल्यामुळें मुसलमानी शब्दांस वेदांतासारख्या विषयांतहि सर्रास वावरूं देण्यांत येतें अितक्यापुरतीच मराठी गद्याची न्यूनता वा अप्रौढता आम्ही मान्य करीत आहोत. तद्विरहित कोणत्याहि दृष्टीनें मराठीस किंवा तिच्या वाङ्मयसंपत्तीला आम्ही अितर हिंदी भाषासंपत्तिपेक्षां अुणी लेखीत नाहीं. आम्हांस त्या त्या भाषांच्या पुष्कळ अध्ययनानंतर असेंच वाटतें कीं, आजही हिंदु-स्थानांत प्रगतिशील असणाऱ्या हिंदी भाषांत मराठी व तिचें वाङ्मय हें कोणांच्याहि मागें नाहीं, अुलट अनेकांच्यापुढें आहे. हिंदी वाङ्मय तर अजून बनत आहे, पण बंगाली वाङ्मयहि मराठीचे पुढें नव्हतें आजहि नाहीं. अेखाद्या विषयांत तें पुढें असेल तर अितिहासादि विषयांत महाराष्ट्र वाङ्मय पुढें आहे. तो विषय प्रस्तुत नसल्यानें अुर्दू शब्द वापरण्यांत जो मराठीचा गयाळपणा होत आहे तो घालविण्या-साठीं त्या गोष्टींत अितर वाङ्मयाचे प्रयत्न ग्राह्य आहेत हें सिद्ध करण्यापुरतेंच त्यांचे प्रौढत्व सूचक शब्द योजिल्यानें त्या शब्दांचा विपर्यास होअून मराठीपेक्षां तीं वाङ्मयें सर्वतोपरींनीं श्रेष्ठ आहेत असा अर्थ त्यांतून काढण्याचा कोणीहि प्रयत्न

करील तर तो अन्याय्य, अतथ्य नि निष्फळ होअील अितकेंत सुचवून ठेवणें येथें पुरे आहे.

## म्हणूनच त्यांच्याप्रमाणेंच आपणाहि शुद्धीकरणाकडे लक्ष पोचविलें पाहिजे

२१. आतांपर्यंत अुल्लेखित केलेल्या अनेक कारणांसाठीं मराठीच्या परकीय शब्दांच्या शिरजोरपणानें झालेल्या अशुद्धीकरणाचा निषेध नि प्रतिरोध करून तिचें शुद्धीकरणाचें कार्य पुनः चालविणें हें आज आपलें कर्तव्य झालेलें आहे. श्रीशिवरायादि पूर्वजांच्या कृपेनें मराठीवर पडूं पाहणारी म्लेंच्छ भाषांची धाड आपल्या अुत्तरेकडील भाषाभगिनींवर जितकी वेगानें नि भयंकर प्रकारें पडली तितकी पडूं शकली नाहीं. म्हणून हिंदीचें वा पंजाबीचें वा सिंधीचें शुद्धीकरण करणें हें जितकें अवघड होअून बसलेलें आहे तितकें मराठीस शुद्ध करणें कठीण नाहीं, नि कठीण नव्हतें म्हणूनच तें काम तसेंच पडून राहिलें होतें. परंतु अुत्तरेस तें शुद्धीकरण कठीण झालेलें असतांहि हिंदी नी बंगाली गद्यपद्यांत तें त्यांनीं अितक्या पूर्णपणें करून दाखविलें आहे कीं आतां मराठींतली म्लेंछ शब्दांची अुरलेली थोडी घाणहि कोणास सहन होणारी नाहीं. आपणांसहि ती आतां ध्यानांत आल्याविना राहणार नाहीं. म्हणून प्रत्येक लेखकानें यापुढें लिहितांना अरेबियनादि परदेशी शब्द शक्य तितके आपल्या मराठींतून वर्ज्य करण्याचा विडा अुचलला पाहिजे.

## प्रत्येक भाषेंत कांहीं परकीय शब्द असावयाचेच

२२. प्रत्येक जिवंत नि सकस भाषेत अितर भाषांतील शब्द हे थोड्या बहुत प्रमाणांत यावयाचेच. त्यांतहि अिंग्रजी सारख्या साम्राज्याच्या भाषेंत त्यांचे अस्तित्व हें त्या भाषाभाषीयांच्या सम्राटपणाची कथा सांगणारे अेक गमकच असतें. मराठीसहि अेकदां या अखिल भारतवर्षाच्या साम्राज्याची अुलाढाल करावी लागल्यामुळें तींत अितर आकुंचित जनपदाच्या भाषेचें आकुंचन न राहून ती प्रसरणशील नि प्रसरणक्षम बनत गेली व तींत अनेक प्रदेशांचे अनेक शब्द मिसळून गेले, हें अेकपरी महाराष्ट्र-भाषीयांच्या पूर्व वैभवाचेंच गमक आहे. परंतु प्रत्येक प्रसरणशील भाषेमध्यें परदेशी शब्द असणें हें जरी अपमानास्पद असतेंच असें नाहीं—अिंग्रजी भाषेंत शेंकडा पन्नासांहून अधिक शब्द तदितर भाषेचे आहेत—तरी ते शब्द त्या भाषेचे घरांत दास म्हणून असावेत. पण जेव्हां ते धनीपणा गाजवावयास लागतात किंवा नारायणराव पेशव्यांच्या गारद्यां-प्रमाणेंच वाटेल तेव्हां माडीवर चढून धन्यासच ठार मारण्याअितके प्रबल व बहुसंख्य होतात तेव्हां देखील जर त्यांस हाकलून न दिलें तर त्या भाषेसच ते आपली दासी करावयास सोडीत नाहींत. भाषेंत परकी शब्द कोठपर्यंत असावेत, पारिभाषिक शब्द

कसे करावेत अित्यादि भाषाविषयक प्रश्न हे या लेखांत येत नसल्यानें केवळ दिग्दर्शनार्थ अितकें सांगणें पुरें आहे कीं –

**दशोदेशींचे भिन्नभिन्न नि विशिष्टपदार्थबोधक शब्द परदेशी असल्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं**

२३. अुदाहरणार्थ नवीन फुलास तद्देशीय नांव असेल तर कांहीं प्रत्यवाय नाहीं. अेखादा विशिष्ट प्रकारचा पशुपक्षी तद्देशीय नांवानेंच संबोधिला जाणें योग्य आहे. अशानें भाषेंतील शब्दसंपत्तीहि वाढेल.

**परंतु ज्या वस्तूस वा कल्पनेस अुत्तम प्रकारें निर्दिष्ट करणारे अेकाहून अधिक शब्द आपल्या पूर्वजव्यवहृत प्रिय मातृभाषेंत आधींच विद्यमान आहेत तेथें त्या वस्तूस वा भावनेस संबोधण्यासाठीं ते सर्व स्वदेशी शब्द सोडून केवळ गबाळग्रंथीप्रमाणें परदेशी शब्दाचा व्यवहार करणें हें मात्र निषिद्ध असावें**

२४. आपल्या मराठींत वा कोणत्याहि हिंदु भाषेंत जर अेखादा शब्द लागल तर तो अितर संस्कृतोद्भव हिंदु भाषांतून घ्यावा. कारण त्या सर्व आपल्याच भाषा आहेत. तो त्या सर्व हिंदु भाषांत न मिळाला वा अेखादा शब्द नवीनच निर्माण करावा लागला तर शब्दसमृद्धीनें नवीन शब्द निर्मित करण्याच्या क्षमतेनें नि अर्थांचे सूक्ष्म भेदाभेद व्यक्त करण्याच्या शक्तीनें अत्यंत संपन्न असलेली ही देववाणी, ही आपली संस्कृत भाषा आपल्या पाठीशीं वरदहस्त अुभारून अुभीच आहे, तिच्या अखंड निधींतून तो अुचलून घ्यावा. अितकें करूनहि जर वाण पडेल वा विशिष्ट पदार्थाचें तें विशिष्ट नांव असेल तरच काय तो परदेशी भाषेचा शब्द अुपयोगांत आणवा.

**परकी शब्दांचीं अुदाहरणें**

२५. ह्या संक्षेपतः निर्दिष्ट केलेल्या नियमांचा प्रकाश आपण मराठीच्या आजच्या स्वरूपावर जर पाडिला तर शेंकडों परकीय शब्द आपल्या गबाळपणाच्या अंधकारांत चोरासारखे शिरून धन्यासारखे वावरत असलेले अुघडकीस येतात. अुदाहरणार्थ "शिवाय" शब्द घ्या. 'ब्रह्माशिवाय सर्व असत्य!' अशीं धेडगुजरी वाक्यें आपल्या गंभीर वाङ्मयांतहि खुशाल मिरवीत असतात. ब्रह्माविना, ब्रह्मव्यतिरिक्त अित्यादि अनेक प्रतिशब्द असतांना हा "शिवाय" अितका बोकळला आहे कीं तो तदर्थक आमच्या 'व्यतिरिक्त' अित्यादि शब्दांस धुडकावून देअून त्यांचेच छातीवर चढून बसला आहे. 'मुलूख' शब्दाची तीच गोष्ट. जुन्या मराठींत हा शब्द खिळून गेल्यानें तो आज गद्यांतून येतो, हें तर राहोच. पण आतां तर 'शाहिरी' कवितेचा पुनरुद्धार

करण्याच्या वेडांत हा शब्द मराठी पद्यांतही घुसडून देण्यांत येत आहे. मुलुख म्हणजे देश, प्रदेश. जगन् दिग्विजयाचीं वर्णनें कांहीं मुसलमानी सत्तेंतच हिंदु भाषांत करण्याला आरंभ झाला नाहीं. मुसलमानांच्या महंमदाच्या जन्मापूर्वींहि हिंदूंनीं व त्यांच्या भाषांनीं दिग्विजय केलेले आहेत. असें असतां मराठ्यांच्या दिग्विजयाचीं वर्णनें मुलुख, मुलुखगिरी अित्यादि शब्द न घालतां या 'शाहिरांना' करितां येअूं नयेत हा त्यांच्या विपर्यस्त कल्पनेचा दोष आहे, गुण नव्हे. 'तयार' शब्दाचें स्तोम तर औरच. विटाळ होअूं नये म्हणून तुणतुण अुड्या मारीत येणारे सोंवळे भटजी-सुद्धां अगदीं देवघरांतून विचारितांना अैकूं येतात कीं, गंध, पुष्प, अक्षता वगैरे सर्व पूजासाहित्य 'तयार' आहे ना ? 'भात तयार आहे' अित्यादि वाक्यांत तर या तयार शब्दाला काढून टाकून तेथें आपले सिद्ध, सज्ज, पूर्ण अित्यादि अनेक प्रतिशब्द घालणें हें जवळजवळ अशक्य होत चाललें आहे, अितकी या 'तयारानें' त्याच्या विरुद्ध कोणीं बंड केलें तर तें मोडण्याची जय्यत 'तयारी' करून ठेविली आहे. स्वयंपाक सिद्ध आहे, पूजासाहित्य सिद्ध आहे, आम्ही लढावयास सन्नद्ध आहों, ते सज्ज आहेत, हें काम पूर्ण झालें आहे, अशीं वाक्यें काय कानास रुचत नाहींत? मग अितके शब्द आपले असूनहि केवळ संवयीनें "तयार" शब्दच रूढ लागून हे जुने शब्द मरणोन्मुख होअून बसावेत हें "शाहिरी" कवितेच्या "फंदीस" हि लाजिरवाणें वाटेल यांत आम्हांस कांहीं शंका वाटत नाहीं.

परंतु "आजतागाअीत"चा डौल अगदीं निराळा. या शब्दाविना आपल्या पत्रास शोभाच येत नाहीं अशी सर्वसाधारण समजूत दिसते. आम्हाला अलिकडेच अेका थोर धर्माधिकाऱ्याचें अेक पत्र आलें; त्यांत त्यांच्या "चिटणिसांनीं" प्रथम अति पुरातन व शुद्ध असा अेक अर्धा अधिक छेदक (पॅरिग्राफ) निर्मळ संस्कृतांत धर्माधिकाऱ्यांच्या ठरीव पद्धतीचा लिहून खालीं झटकन लिहिलें की "आजतागाअीत सुखरूप आहों." येथें आजपावेतों म्हटलें असतां काय हानि होत होती ? पण अशा शब्दांत कांहीं विशिष्ट प्रौढी आहे अशी संवयीनें विकृत कल्पना आम्हां सगळ्यांची लहानपणापासून झाल्यानें हे शब्द नसले म्हणजे चुकल्यासारखें होतें ! या 'आज-तागाअिता'चें स्तोम 'आजतागाअित' झालें तें पुरवलें. यापुढें या धेडगुजरी शब्दास निरर्थक आपल्या वाङ्मयांत वावरूं देणें लज्जास्पद मानिलें पाहिजे त्याप्रमाणें खालीं सही केलेली आहे. चिटणीस – निसबत – श्रीमत् अित्यादि अित्यादि. आतां हा 'निसबत' शब्द येथें या शुद्ध व सुंदर संस्कृत शब्दांभोवतीं नैवेद्याभोवतालच्या अेकाद्या झुरळासारखा कां घोटाळत आहे? श्रीमंत अमक्याच्या सेवेंतील कार्यवाह वा लेखक अशी सही केली तर काय या पत्राची शोभा राहणार नाही ? "मालक", "जखमी",

"फौज", "लष्कर", "शहर" नि जुन्या मराठींतून घुसलेल्या अशाच अितर शेंकडों शब्दांस आपण निष्कारण आपल्या डोक्यावर नाचवीत फिरतों. शिवाजी महाराजांचें राज्य आणखी कांहीं काळ टिकतें तर ज्या म्लेंच्छ शब्दांस त्यांनीं कादकाढून भाषेंतून हुसकून दिलें असतें त्याच फौज, लष्कर अित्यादि परकीय शब्दांस अेकाद्या अभिजात शब्दाप्रमाणें "शाहिरी" कवितेंत अप्रौढ लेखक अुपयोजितांना पाहून नि तीच आपल्या कवितेची विशिष्ट शोभा म्हणून समजतांना बघून हंसावें कीं रडावें हें समजत नाहीं. मराठी सैन्य, सेना, या स्थलीं मराठी फौजा, लष्कर हे शब्द घालण्यांत कांहीं अेक विशेष डौल येतो अशी जी कित्येक नवशिक्यांची समज आहे त्यांनीं, ती केवळ आपल्या विपन्वस्त नि अज्ञ संवयीचा परिणाम आहे असें पक्कें समजावें नि हे म्लेंच्छ शब्द शक्य तितके टाळावेत. आपणास जुन्या मराठीचें पुनरुज्जीवन अवश्य करावयाचें आहे. पण तें मुसलमानी मराठीचें नव्हे.

## कांहीं शब्द पर्शियन भासले तरी स्वदेशी आहेत

२६. आतां असे अनेक शब्द आहेत कीं जे पर्शियन वाटत असले तरी संस्कृत धातूपासूनच साधलेले आहेत. वास्तविक पाहतां जुनी पर्शियन भाषा ही मराठी बंगालीप्रमाणेंच शुद्ध संस्कृतोत्पन्न अशी अेक प्राकृतच आहे. तिच्यांतील शब्द मराठींत जे आतां अगदीं रूढ होअून बसलेले आहेत, ते जर अगदी संस्कृतोद्भव नि सहज साध्य असतील तर खुशाल अुपयोजावेत, त्यावर आपला अधिकार आहे. अुदाहरणार्थ सुरू हा शब्द "सरणें, चालू होणें" या धातूपासून अुत्पन्न आहे. हक्क हा स्वक् शब्दापासून आहे. पंजाब हा पंचआप शब्दापासून आहे. जर ते शब्द आपल्यांत अत्यंत रूढ असलेले दिसून येतील तर ते पर्शियनच आहेत हें कशावरून समजावें ? संस्कृतचीं रूपें पर्शियनमध्यें जशीं विकृत होतात तशींच प्राकृतांत होतात. तेव्हां ती आमच्या अिकडेच प्रचलित झालेलीं नसतील म्हणून कशावरून ? असे शब्द खुशाल राहूं द्यावेत.

## दृष्टिकोन बदलला पाहिजे

२७. कोणते शब्द ठेवावेत आणि किती ठेवावेत हे स्फुट प्रश्न येथें प्रस्तुत नसून परकी भाषेंतून आपल्या भाषेंत निष्कारण घुसलेले शब्द काढून तीस शुद्ध करण्याचें पूर्वजांनी आरंभिलेलें कार्य, की ज्याच्या बळानेंच मराठी मुसलमानांच्या तावडींत अुत्तरेकडील सिंधी, पंजाबी वाङ्मयाप्रमाणें पूर्णपणें गवसूं शकली नाहीं — तें कार्य पुढेंहि चालवावें अितका निश्चय, अितकी जाणीव, अितका निर्धार, मराठी

भाषाभागीयांत अुत्पन्न करावा नि अुत्तरेकडे हिंदी नि बंगाली गद्यपद्यांत अुन्दू शब्द वापरणें हें जसें कमीपणाचें, ढिलेपणाचें, दोषास्पद समजलें जातें तसें तें अिकडेहि समजलें जावें अेवढ्या हेतूनें हा विषय पुढें आणीत आहों. यामुळें या दिशेकडे महाराष्ट्र लेखकांची दृष्टि रागानें म्हणा, त्रासानें म्हणा वा केवळ थट्टेनें म्हणा पण वळली म्हणजे पुरे. बाकी कोणता शब्द परकी आहे हें पुढें वेळोवेळीं होणाऱ्या चर्चेनें ठरेल. वर आम्ही सामान्यतः दिलेल्या नियमांस अनुसरून आवश्यक असेल तेथेंच काय ते नवीन परकी शब्द घ्यावेत व कोणताहि प्रकारची आवश्यकता नसतां व तदर्थक आपले संस्कृतोद्भव सुंदर शब्द विद्यमान असतां केवळ ढिलाअीनें मराठीत शिरोजोर होअून बसलेले जुने परकी शब्द वेंचून वेंचून कांट्यासारखे दूर दूर फेंकून द्यावेत अितका निर्धार, जर निदान लेखकांची नि वाचकांची नवीन पिढी तरी करील तर या लेखाचा तात्कालिक हेतु सिद्धीस गेला असें होअील. विष्णु-शास्त्र्यांच्या सावधानतेनें अिंग्लिश शब्द मराठी गद्यांत क्वचितच नि पद्यांत मुळींच येअीनासे झाले आहेत. तशीच मुसलमानी शब्दांचीहि स्थिति झाली म्हणजे झालें. हें अगदींच सहज नसलें तरी सुलभ आहे हें ज्यांना हिंदी नि बंगाली गद्य-पद्य किती थोडे दिवसांत व किती पूर्ण रीतीनें सुसंस्कृत नि म्लेंछशब्दस्पर्शानें अगदीं अकलुषित होअूं शकलें हें माहीत आहे त्यांच्या तेव्हांच लक्षांत येअील.

## त्रास होअील पण म्हणूनच निर्धार दुणावला पाहिजे

२८. हजर, गरज अित्यादि तोंडांत, हाडामासांतून रुळलेल्या शब्दांस परकी म्हणून सोडण्याचा प्रयत्न करितांना, बोलतांना नि लिहितांना प्रत्येकास फार नि पदोपदीं त्रास होअील हें आम्हीं स्वतःचे अनुभवावरून जाणून आहों. परंतु ह्या त्रासानें हे शब्द टाळण्याचा आपला निर्धार मात्र अधिक दुणावला पाहिजे. त्रासाचा दोष ज्यांनीं आपल्या भाषेंतील ही घाण अुधड करून दाखविली त्यांचा नसून ज्यांनीं ती काढतां काढिली जाअूं नये अितकीं वाढूं दिली त्यांचा–आपणा सर्वांचा–आहे. म्हणून त्या त्रासामुळे वैतागून, 'जाअूं द्या ! हे शब्द बहिष्कृत करणें मूर्खपणा आहे, हा अभिमानाचा अतिरेक आहे !' असें न म्हणतां अुलट प्रत्येकानें आपल्याशीं असेंच म्हटलें पाहिजे कीं, 'काय बुवा! खरेंच ही केवढी लज्जेची गोष्ट ! हजर शब्दाला आपल्याला आपला प्रतिशब्द देखील देतां येअूं नये अितकें या म्लेंच्छ शब्दानें आम्हांस परवश करून टाकिलें अं ! 'टिळक सभेंत विद्यमान होते, वर्तमान होते, किंवा हिंदी वा बंगाली म्हणतात त्याप्रमाणें अुपस्थित होते' असा वाक्यप्रयोग केला असतांहि नवखा नि ओढूनताणून केल्यासारखा वाटावा नि 'टिळक हजर होते' हें वाक्य बायकापोरांपर्यंत आपलें असें वाटावें ही केवढी लज्जेची गोष्ट ?

असा विचार जर प्रत्येकजण करील तर तो हा प्रश्न अुपस्थित केला म्हणून आम्हांस दोष न देतां त्या रागाचे भरांत अुलट शक्य तितके अुन्द्र शब्द न वापरण्याचा निश्चय करील. आम्हीं व्यवहारांत अगदीं अनावश्यक पण शिरजोर झालेल्या कांहीं अुन्द्र शब्दांची नामें या लेखांत दिलीच आहेत. प्रस्तुत तितके शब्द सर्वांनीं टाळण्याचा निर्धार केला तरी पुरे. पुढें या विषयाची जशीजशी चर्चा वाढून आक्षेप-प्रत्याक्षेप होत जातील तसतसे आणखी शब्द अुजेडांत येअू लागतील. सध्यां मराठीं भाषेच्या शुद्धीकरणाचें 'सूत अुवाच' जरी झालें तरी पुरे आहे.

२९. या विषयावर केसरींत आम्हीं जे लेख प्रसिद्ध केले त्यांच्या अुपसंहारांत असें लिहिलें होतें कीं, "कोणते शब्द ठेवावेत आणि कोणते परकी शब्द मराठींतून काढण्याचा प्रयत्न करावा हे फुटकळ प्रश्न येथें सोडवीत बसण्याचा हेतु नसून परकी भार्षेतून आपल्या भार्षेत निष्कारण घुसलेले शब्द काढून तिला शुद्ध करण्याचें पूर्वजांनीं आरंभिलेलें कार्य कीं ज्याच्या बळानेंच मराठी भाषा मुसलमानी भाषेच्या तावडींत, अुत्तरेकडील सिंधी, पंजाबी, हिंदी अित्यादि भाषांप्रमाणें पूर्णपणें सांपडूं शकली नाहीं–तें कार्य पुढें चालवावें अितका निश्चय, अितकी जाणीव मराठीभाषा-भाषीयांत अुत्पन्न करावी नि अुत्तरेकडे हिंदी आणि बंगाली गद्यपद्यांत अुन्द्र शब्द वापरणें हें जसें कमीपणाचे आणि ढिलेपणाचे द्योतक नि दोषास्पद मानिलें जातें तसें तें अिकडेहि समजलें जावें अेवढ्या हेतूनें हा लेख लिहिलेला आहे. या लेखामुळें या दिशेकडे महाराष्ट्र लेखकाची विचारी दृष्टी रागानें म्हणा त्रासानें म्हणा वा केवळ थट्टेनें म्हणा, पण वळली म्हणजे पुरे."

ही सुदैवाची गोष्ट आहे कीं, यापैकी कोणत्या ना कोणत्या तरी भावनेनें प्रेरित होअून या विषयाकडे आम्हांस वाटलें होतें त्याहून पुष्कळच अधिक तीव्रतेनें महाराष्ट्र लेखकांचे आणि लोकांचें लक्ष वेधलें गेलें. अितकेंच नव्हें तर त्या चळवळीचा प्रतिध्वनि मुंबअीच्या 'टाअिम्समध्यें' सुद्धां घुमण्याचे बाकी राहिले नाहीं. बहुतेक मराठी पत्रांतून या विषयावर अनुकूल–प्रतिकूल लेख येअून गेले त्या सर्व लेखांचा सांगोपांग विचार करावयास पाहिजे होता. त्यांतील पुष्कळ आक्षेप मूळ लेख संपूर्ण न वाचल्यानेंच अुत्पन्न झालेले होते. कांहीं विचारजन्य होते, कांहीं विकारजन्य होते. त्या अुत्तरपक्षीय चर्चेस जर वेळींच अुत्तर देतां आलें असते तर त्याची जी अेक-सारखी पुनरावृत्ती अितर टीकाकारांकडून करण्यांत येत आहे ती न होतां पुष्कळांचें सहज समाधान होअू शकलें असतें. परंतु या भाषाविषयक प्रश्नापेक्षांहि आज आपल्या हिंदु समाजाची आणि राष्ट्राची अमर्याद हानि करीत असलेल्या अस्पृश्य-तेच्या निवारणाचा प्रश्न निकडीनें हातीं घेअून निदान रत्नागिरीस तरी त्याचा

पिच्छा पुरविणें हें अधिक महत्त्वाचें कर्तव्य प्रथम करावें लागल्यानें आजवर या भाषाशुद्धीच्या क्षेत्रांवर आलेले आक्षेप अैकत बसण्यापलिकडे आम्हांस कांहीं अधिक करितां आलें नाहीं. परंतु आतां तो स्थानिक प्रश्न समाधानकारक रीतीनें जवळ जवळ सुटला असल्यानें मराठी भाषेच्या शुद्धीकरणाचे प्रयत्नावर आलेल्या आक्षेपांचें निरसन आणि झालेल्या चर्चेची समालोचना थोडक्यांत करण्याचें योजिलें आहे.

**प्रेमद्वेषाचा गोंधळ**

२०. या आक्षेपांतील जे विकारजन्य आहेत त्यांची वास्तविकपणें पाहतां अुत्तर देण्याअितकीहि योग्यता नाहीं. तथापि त्यांतील अेकातरी आक्षेपाविषयीं कांहींच अुल्लेख न करणें म्हणजे त्या हेत्वाभासास सात्विक भावड्या मनांचा बळी दिल्यासारखें होणार असल्यानें त्याचा थोडासा समाचार घेणें प्राप्त आहे हा आक्षेप म्हणजे शुद्धीकरणाची—भाषेच्या शुद्धीकरणाची—ही चळवळ द्वेषमूलक असल्यानें अत्यंत निंद्य आहे, हा होय. गेल्या कांहीं वर्षांत हा प्रेमद्वेषाचा गोंधळ अितका बोकाळला आहे कीं, त्या त्या शब्दांनीं व्यक्त होणाऱ्या भावनांतील गंभीरपणा नाहींसा होअून त्यांना गावंढळपणाचें स्वरूप येत चाललें आहे. जेथें पहावें तेथें प्रेम आणि अहिंसा अेकाद्या प्रेतासारखी मार्गांत आडवी पडलेली ! मराठी भाषेत अनावश्यक असलेल्या आणि तिच्या स्वरूपास विसंगत दिसणाऱ्या परदेशी शब्दांस न स्वीकारणें हा म्हणे त्या शब्दांचा द्वेष होय ! अुद्यां माझ्या पायास न बसणारा जोडा मीं टाकून दिला म्हणजे तो त्या जोड्याचाहि द्वेष होअील—निदान ज्या चांभारानें तो जोडा शिवला त्याचा तरीं होअीलच होअील. घरांतील कचरा फेकूं लागलें कीं तो झाला त्या कचऱ्याचा द्वेष—निदान ज्यानें तो कचरा टाकला त्याचा तरी !

परंतु अेका अर्थीं आपल्या भाषेत परभाषेतील शब्दांचा डोअीजड सुळसुळाट होअून तिची श्रुतिमंजुलता, स्वाभाविक शुद्धी आणि अैतिहासिक पारंपर्य बिघडूं नये म्हणून कांहीं अरेबी शब्द काढून टाकणें किंवा आजकाल गबाळ लोक फादर, मदर अित्यादि अिंग्लिश शब्द त्यांत कांहीं विशेष विद्वत्ता दिसते अशा समजुतीनें—मराठींत वापरतात तसे वापरणें हें निंद्य आहे म्हणून म्हणणें हें अरेबीचा किंवा अिंग्लिशचा द्वेष करणें का होअूं नये ! प्रेमाची पूर्णता म्हटली म्हणजे मराठी भाषाच सोडून देअून अरेबीचा, निदान मुसलमानी अुर्दूचा, स्वीकार करणें हीच होय ! या दृष्टीनें पाहतां परदेशी कपडे वापरूं नका, स्वदेशीच वापरा, आपल्या मुलाचें नांव अिब्राहिम किंवा अरुंडेल न ठेवितां अनंतच ठेवा असें सांगणेंहि द्वेषमूलकच ठरतें.

कोणतीहि गोष्ट द्वेषमूलक आहे हें त्या गोष्टीच्या मुळाशीं द्वेषपूर्ण भावना होती – ती गोष्ट कोणास विनाकारण चीड आणण्यासाठीं केली होती कीं काय या प्रश्नावर वास्तविक पाहतां अवलंबून आहे. मराठींत अनावश्यक अुर्दू वा अिंग्रजी वा जर्मन शब्द घुसूं देअूं नयेत या न्याय्य आणि स्वाभाविक अिच्छेच्या आणि प्रयत्नाच्या मुळाशीं कोणास चिडविण्याचा अुद्देश आहे हें या आक्षेपकांस कोणी सांगितलें ? सिंधमध्ये आपल्या हिंदु बांधवांची लिपी ही मुसलमानी सत्ताकालांत नामशेष झालेली आणि भाषा अरेबी शब्दांच्या आघाताखालीं अितकी चिरडून गेलेली कीं बाप, आअी अित्यादी अत्यंत घरगुती शब्दांस देखील आरबी अथवा अुर्दू शब्द व्यवहृत करणें सभ्यपणाचें लक्षण समजलें जाअूं लागलें. अशा स्थितींत तेथील हिंदूंत आपल्या भाषेच्या आणि लिपीच्या पुनरुज्जीवनाची चळवळ सुरू करण्याचा आम्ही प्रयत्न करूं लागलों तेव्हां हाच द्वेषाचा आक्षेप आमचेवर तत्रस्थ हिंदूंकडूनहि करण्यांत आला. पुढें ही चळवळ जशी जोरावली आणि सिंधी पत्रें, शाळा व वाङ्मय हीं जसजशी हिंदी लिपींत आणि शुद्ध सिंधींत आविर्भूत होअूं लागलीं तशीतशी मुसलमानांची समता ढळूं लागून आतां त्यांनीं सरकारास अर्ज करून शिक्षणविभागाचा अेक ठरावहि करून घेतला आहे कीं सिंधमधील शाळांतील क्रमिक पुस्तकांत जुनेच नव्हत तर जे जे नवीन पारिभाषिक शब्द योजावयाचे ते संस्कृतोत्पन्न नसून अरबीपासूनच साधित असले पाहिजेत ! निदान हिंदु मुलांना तरी शुद्ध सिंधींत अथवा हिंदींत शिक्षण दिलें जावें आणि नागरी लिपी शिकविली जावी ही अत्यंत न्याय्य मागणी करावी – हैद्राबाद येथील हिंदूंच्या मोठमोठ्या संस्था आणि नगरपालिका करीत असतांहि, हिंदूंनीं अलेफ बे, पे, या अुलट्या लिपीसच शाळांतून शिकलें पाहिजे म्हणून मुसलमान खटाटोप करीत आहेत. पण हिंदु मुलांनीं तरी आपली पूर्वजांची लिपी व भाषा शिकावी ही आमची चळवळ ज्यांस द्वेषमूलक वाटली ते प्रेमाचे आणि भूतदयेचे मोक्ते हिंदु मुलांनींहि आमचीच लिपी शिकली पाहिजे म्हणून म्हणणाऱ्या अरेबीच्या अुपासकांसहि तुम्हीं संस्कृतचा द्वेष करीत आहां म्हणून तुमची ही चळवळ द्वेषमूलक आहे असें सांगण्यास मात्र धजत नाहींत.

## शिवाजी आणि चिपळूणकर

आपल्या मराठींत विसदृश्य आणि विसंगत असे अशुद्ध परकी शब्द नकोत असें कांहीं आम्हींच म्हणत नाहीं. श्रीशिवाजीमहाराजांनीं रूढ झालेलीं अष्ट प्रधानांचीं नांवें बदलून तीं सहेतुकतः संस्कृतमध्ये भाषांतरित केलीं आणि स्वराष्ट्रास पारतंत्र्याच्या पंकांतून जसें अुद्धरिलें, स्वधर्मास परधर्माच्या छायेंतून जसें वांचविलें, तसेंच स्वभाषेचेहि परकीय भाषेच्या बलात्कारापासून संरक्षण करण्यासाठीं स्वतः राजव्यवहारकोश रचना

करवून राजाज्ञा सोडल्या; तो त्यांचा प्रयत्नहि द्वेषमूलकच होता का ? चिपळूणकरांनीं अिंग्लिश शब्दांच्या आक्रमणाचा तीव्र विरोध करून मराठी लिहिण्यांत नि बोलण्यांत अिंग्रजी शब्द घुसडणाऱ्यांवर कोरडे ओढिले तो त्यांचा प्रयत्नहि द्वेषमूलक होता काय? यावरहि 'होय' म्हणण्याचें धार्ष्ट्य कराल तर अितकेंच सांगणें पुरे आहे कीं, मराठी भाषा, हिंदु भाषा आणि हिंदु राष्ट्र हीं ज्यांच्या योगानें या जगांत अितरांप्रमाणेंच आपलेंहि अस्तित्व अिष्टकाल पावेतों अक्षुण्ण राखण्याचें न्याय्य कर्तव्य यथाविण्यास समर्थ झालीं तो शिवाजी विष्णुशास्त्र्यादिकांचा द्वेषमूलक प्रयत्नच या गोमागणेशांच्या घरबुडव्या भाबडेपणाहून अधिक श्रेयस्कर आणि म्हणूनच अधिकच अनुकरणीय असा सद्गुण होय असें आम्हांस वाटत आहे. आम्हीं त्याचें काळांत असतों तर त्यासहि आम्हीं दोष दिला असता असें म्हणणारांस आम्ही असें सांगतों कीं, खरोखरच जर आपण आजच्या काळांत जन्मास न येतां त्याच काळांत जन्मास आला असतां तर आजच्या काळावर आपले कितो तरी अुपकार होते आणि शिवाजीच्या काळाची हानि तुमच्या वायफळ तोंडच्या वाऱ्यानें व्हावी असा तो काळ आजच्या काळासारखा कांहीं अेखाद्या पत्याचा तट्ट नव्हता.

## अुंटाचें पिलूं

आणखी 'हुजर', 'यादी' अित्यादि ज्या अुर्दू शब्दांनीं आपले पूर्वज-व्यवहृत मराठी शब्द पार नाहींसे करून टाकिले आहेत त्यांस वापरण्याचें टाळून ते आपले जुने शब्द वापरूं लागावे म्हणून अुपदेश करणें हें जर त्या अुर्दू शब्दांचा द्वेष करणें म्हणून निंद्य होय, तर आपल्या 'विद्यमान', 'अुपस्थित', अित्यादि तदर्थक स्वकीय शब्दांस पुनः जवळ न करितां तसेंच बहिष्कृत ठेवणें हाहि त्या जुन्या आणि स्वकीय शब्दांचा द्वेषच नव्हे काय ? दुसऱ्याच्या अुंटाचें पिलूं घरांत शिरल्यानें घरांतून बाहेर पळालेल्या मुलास परत बोलावून तें पिलूं बाहेर घालविण्याचा प्रयत्न करीत असतां जर कोणी म्हणेल कीं, अरे त्या पिल्लास बाहेर घालविण्याची तुझी चळवळ द्वेषमूलक आहे तर त्यास असें सांगणें प्राप्त आहे कीं, "सद्गृहस्था, पण माझ्या त्या स्वतःच्या मुलास तसेंच बाहेर तिष्ठत ठेवणें आणि घरांत अुंटाचें पिलूं पोशीत बसणें हें त्याहून द्वेषमूलक आणि तिरस्काराऱ्ह होणारें आहे !"

विकारजन्य आक्षेपांपैकीं ज्या दुसऱ्यास थोडेसें अुत्तर दिलें पाहिजे असा आक्षेप म्हणजे –

## अभिमानाचा अतिरेक

३१. अथवा 'मनाचें प्रांतिक आकुंचितपण' होय. मराठीचा आम्हांस अभिमान आहे यांत शंकाच नाहीं. परंतु त्या अभिमानाची मर्यादा जर आम्हीं सांगूं लागलों तर आमच्या अभिमानास अतिरेक म्हणणाऱ्या नवख्या आणि अजाण भूतदयेच्या भक्तांस हुडहुडी भरूं पाहील. अखिल हिंदुस्थानांत अेकच राष्ट्रभाषा प्रचलित व्हावी म्हणून मराठीचें नांव न सुचवितां हिंदीचाच तो अधिकार आहे असें आम्हीं आज वीस पंचवीस वर्षांपासून प्रतिपादीत आलों असून हिंदीच्या प्रचारार्थ अेकसारखें झटत आहोंत. इतकेंच नव्हे तर सर्व प्रांतिक भाषा इतर सर्व प्रांत सोडण्यास सिद्ध असतील आणि त्यांतील अुत्तम वाङ्मय हिंदीमध्यें रूपांतरित झाल्यानें राष्ट्रीय वाङ्मयास हानि होण्याचें भय न अुरेल तर सर्व प्रांतिक भाषांस अेका मळसूत्रास दाबल्याबरोबर समुद्रांत बुडविणारें अेकादें यंत्र आज जरी कोणी शोधून काढीत असेल तरी आजहि तें मळसूत्र दाबून राष्ट्रीय भाषेस मराठीचा अेकदम बळी देण्यास आम्ही सिद्ध आहोंत. हेंच काय परंतु सर्व मनुष्यजातीची अेक भाषा जर आज होत असेल किंवा जेव्हां केव्हां होईल आणि ती स्वीकारून इतर सर्व देश आपआपल्या भाषांस त्यागपत्र देण्यास सिद्ध असतील तर आम्हीं आमच्या मराठीचाच नव्हे तर सर्व हिंदु राष्ट्रीय भाषांचाहि त्याग करण्यास अनमान करणार नाहीं. परंतु तुमची भाषा तेवढी तुम्ही मारून टाका आणि भूतदयेसाठीं म्हणून आमची तेवढी जगाची भाषा म्हणून स्वीकार करा या 'अेस्पेरँटो'च्या बकसाधुत्वास भाळण्याइतकी मात्र आमची भूतदया भोळसट नाहीं.

## एस्पेरँटोचा मायावीपणा

अेस्पेरँटोच्या कल्पनेंत युरोपीय रोमन लिपी आणि युरोपिअन भाषा यांचेंच अस्तित्व तेवढें गृहीत धरून अखिल आशियाच्या भाषासंघास नामशेष करून टाकण्याचा जो मायावीपणा होता त्यामुळें आम्ही त्या चळवळीस विलायतेंत असतांना विरोध करीत होतों आणि त्या अेस्पेरँटोच्या केवळ युरोपीय खुळासाठीं आमच्या संस्थानांतून हजारों हजार रुपये अुकळले जात हें न साहून तो द्रव्यशोष थांबविण्यासाठीं आम्हीं तीव्र टीका करीत असूं. त्याच दृष्टीनें मराठीकडे आम्ही आजहि पहात आहोंत. राष्ट्रीय भाषेच्या अुन्नतीस बाधक होअील तर मराठीचें नांव काढणें आम्हीं या क्षणीं सोडून देअूं. परंतु सद्यःस्थितींत प्रांतिक भाषांचें अस्तित्व हें अपरिहार्य म्हणून त्या मारून टाकण्याचा प्रयत्न केल्यानें राष्ट्रीय वाङ्मयाच्या होणाऱ्या लाभापेक्षां हानीच अधिक होण्याचा संभव आहे. म्हणून प्रांतिक भाषा आणखीं कांहीं शतकें दुय्यम

म्हणून अस्तित्वांत असें देणें हें सर्वच प्रांतांतील विचारवंत लोकांस अभिप्रेत आहे. आणि जोंवर इतर प्रांतीय हिंदु भाषा जिवंत आहेत तोंपर्यंत राष्ट्रीय भाषेस साधनीभूत म्हणूनच मराठीसहि जिवंत आणि वर्धमान राहणें प्राप्त आहे. मराठीचा आम्हांला अभिमान आहेच आहे; परंतु आमची **राष्ट्रीय भाषा हिंदी हिचा आम्हांस मराठीहून अधिक अभिमान आहे.**

त्याप्रमाणेंच बंगाली, नेपाळी, पंजाबी, सिंधी, कानडी, तामील, तेलगु अि. आमच्या हिंदु राष्ट्रांत प्रचलित असलेल्या सर्व हिंदु भाषांविषयीं आम्हांस ममत्व आणि प्रेम वाटत आहे. त्या सर्व आमच्याच भाषा आहेत. मग मराठीस आणि त्या सर्व भाषांस जी मातृस्थानीं आहे, जीस आमचें 'गुरूणामपि गुरुः' देखील देववाणी म्हणून समजतें झालें आणि जिच्या संपन्नतेच्या बलावर आम्हीं कोणत्याहि परकया भाषेच्या दाराशीं भीक मागण्यास जाणें अपमानाचें समजतों त्या संस्कृत भाषेची गोष्टच बोलावयास नको! आमच्या पहिल्या लेखामधून कानडी, तामीळ ते पंजाबी, बंगालपर्यंत सर्व हिंदु भाषा आम्हांस मराठीच्या सख्या बहिणीप्रमाणें स्वतःच्याच वाटत असून त्यांमधून आणि या सर्व हिंदु भाषासंघास मातृस्थानीं असलेल्या संस्कृत भाषेंतून वाटेल ते शब्द घेण्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं असें स्पष्ट सांगितलें असूनहि कित्येकांनी प्रश्न केला आहे कीं;

### 'संस्कृतमधून शब्द घेण्याच्याहि आपण विरुध्द आहांत कीं काय?

२२. संस्कृत सोडून मराठी भाषा म्हणून कांहीं अुरतें कीं काय याची आम्हांस वानवाच आहे. शुद्धीकरणाचा अर्थ मराठींतून कानडीपासून संस्कृतपर्यंत सर्वच भाषांतील शब्द काढणें असा जे समजतात त्यांना या शुद्धीकरणाच्या चळवळीचें अंतरंग आणि अर्थ कळलाच नाहीं असें म्हणावें लागतें. हिंदु भाषासंघ सोडून अहिंदु भाषेंतील शब्द जुने असोत वा नवे असोत, विनाकारण आणि शक्य तोंवर आपल्या भाषेंत डोअीजड होअू देअू नयेत ही शुद्धीकरणाची संक्षिप्त व्याख्या आहे. अेका सद्‌गृहस्थानें तर आम्हांस बजावून सांगितलें आहे कीं–

### 'उर्दू भाषा ही मर्द आहे'

२३. असेल. आमचें तितकेंच निक्षून सांगणें आहे कीं शिवाजी बाजीरावांची आमची मराठी भाषाहि कांहीं कमी 'मर्द' नाहीं कीं अुर्दूचें पौरुष आपल्या अंगांत टोंचून घेतल्याविना तिला बलवान् राहतांच येअू नये! आपल्या कांहीं लेखकांत ही जी अेक

कल्पनाच रूढ झाली आहे कीं, मराठीस यावनी म्हणजे मुसलमानांनीं आणिलेल्या शब्दांनीं जोम आणि डौल आणिला ती बव्हंशीं निर्मूल असून ती आपल्या स्वाभिमानाअितकीच अैतिहासिक सत्यासहि घातक आहे. हा अेकदोन शब्दांचा किंवा वाक्प्रचारांचा प्रश्न नाहीं.

## ज्यांना यावनी संपर्कानेंच मराठी जोरदार झाली

३४. असें वाटत असेल त्यांनीं अेकवार ज्ञानेश्वरीकडे कीं जी या संपर्काचे पूर्वी आणि "माझा मऱ्हाटीचि बोल कौतुकें। परि अमृतातें पैजा जिंके। अैसीं अक्षरें रसिकें मेळवीन" अशा प्रतिज्ञेनें लिहिली गेली तिकडे बघावें किंवा 'सरसा सालंकारा सुपदन्यासा सुवर्णमय मूर्ती।' अशी आर्या रचून 'धन्य श्रीराम पिता धन्या त्रक्ष्मी प्रसू जगीं झाली। आली सत्यवतीची कीं, भारत कीर्ति मुतमुखीं आली' अशी यथार्थ गर्वोक्ति जो करूं शकला त्या मोरोपंताचे महाभारताकडे, निदान कर्णपर्वाकडे तरी, क्षणभर दृष्टि टाकावी ? यावनी संपर्कानें मराठींत जोर, जोम किंवा प्रबळपणा आला हें म्हणणारांनीं यावनी संपर्कापूर्वी दुर्बळ मराठी ती कोणती तें दाखविलें पाहिजे. यावनी संपर्कापूर्वी मराठी भाषा महाराष्ट्री किंवा संस्कृतावर अवलंबून असे. तेव्हां जोराचे, जोमाचे व डौलाचे शब्द आणि वाक्प्रचार बहुशः यावनी भाषेतून आले असें म्हणणारे, नकळतच अेका पर्यायानें म्हणत असतात कीं, महाराष्ट्रींत आणि संस्कृतमध्येंहि असले जोरदार जोमदार नि डौलदार वा वीररसाचे पोषक शब्द आणि वाक्प्रचार नव्हते. जर संस्कृतमध्येंहि यावनी भाषेअितके तरी ते आहेत असें म्हणाल, तर मग त्या वाक्प्रचारांच्या आणि शब्दांच्या संपत्तीनें आपणास घरच्या घरीं सबळ आणि संपन्न करूं शकणाऱ्या मराठीस या यावनी परक्या भाषेच्या दारीं भीक मागण्याचे कांहीं अेक कारण नसून त्या अनावश्यक परकीय शब्दांचा संबंध सोडून देणें हें तिचें कर्तव्य आहे, निदान तसें करणें तिला शक्य आहे असें मानावें लागेल.

यावनी भाषेनें मराठीस सबळ आणि डौलदार केली असें जें कित्येकांस प्रामाणिकपणें वाटतें त्याचें खरें कारण असें आहे की, यावनी संपर्कापूर्वीची मराठी वा महाराष्ट्री आज आपल्यापुढें प्रामुख्यानें अुभी नाहीं आणि मुसलमानी राज्यांत सर्व सैनिक आणि राजव्यवहारांतील शब्द आणि वाक्प्रचार हे तदर्थक असणाऱ्या आपल्या पूर्वीच्या संस्कृतोत्पन्न वाक्प्रचारांस आणि शब्दांस बाजूस सारून परकी सत्तेच्या बळावर मराठींत जे घुसले ते अजून तसेच राहिल्यानें आपणांस ती ती भावना त्याच शब्दांत लहानपणापासून व्यक्त करण्याची संवय जडली; त्यायोगें तदर्थक मूळचे संस्कृत प्रयोग केले असतां त्यांनीं ती व्यक्त झालीसा आपणास वाटत नाही.



परंतु हा दोष मराठीचा किंवा संस्कृतोत्पन्न हिंदु भाषांचा नसून आपल्या विकृत संवयीचा आहे.

**चंद्रगुप्ताचें साम्राज्य आणि विक्रमाचा पराक्रम यांचें वैभव, यांचा थाट आणि यांचें पौरुष, ज्या भाषांतून व्यक्त होत होतें त्या आमच्या हिंदु भाषा यावनी संपर्कानेंच काय त्या प्रबल आणि डौलदार बनल्या हें म्हणणें हास्यास्पद आहे.**

राष्ट्रकूटांचा गोविंद, श्रीमान् अमोघवर्ष किंवा दिग्विजयी पुलकेशी आणि त्यांचें तें अप्रतिहत प्रतापी सैन्य ज्या भाषेंत बोलत होतें ती भाषा बेंगरूळ, ढिली आणि गबाळ असणें शक्यच नव्हतें. तिच्याच आजच्या रुपाचें नांव मराठी होय. आज सैनिक आणि राजकीय डामडौलाचे शब्द कांहीं अंशीं मुसलमानी भाषांतून घेतलेले जरी दिसत असले तरी तेवढ्यावरून तदर्थक शब्दांचा वाक्यप्रचार मराठींत वा हिंदु भाषांत पूर्वी नसून तो यावनी संपर्काचा परिणाम आहे असें म्हणणें म्हणजे आज जिल्हा, तालुका, अिलाखा अित्यादि भूविभागीय शब्द परके आहेत म्हणून या परसंपर्कापूर्वी आपल्याला व्यवस्थित भूविभाग करण्याची रीति माहीतच नव्हती. असें म्हणण्याअितकेंच अतथ्य होय. यावनी संपर्कानें सत्तेच्या बळावर आपले जुने सैनिकी नि राजकीय शब्द, आपल्या जुन्या सेनेसमवेत आणि राज्याबरोबरच नामशेष करून त्यांच्या ठिकाणीं यावनी भाषेचा संचार सुरु केला; आणि लहानपणापासून हेच शब्द त्या त्या अर्थी आपणांस माहीत असल्यानें आम्हांस आमच्या स्वतःच्या जुन्या शब्दांचें अस्तित्व कधींच नव्हतें अशी भ्रांति पडली, हेंच काय तें या भ्रमोत्पादक समजुतीचें खरें कारण होय. आणि मराठीचेंच काय परंतु सर्व हिंदु भाषांचे शुद्धीकरण करण्याची आवश्यकता अुभ्या हिंदुस्थानांत जी भासूं लागली आहे तिच्या मुख्य कारणांतील अेक कारण हीच आत्मनिंदक भ्रांति दूर करणें हें होय. अेकदोन लेखकांनी आपली अशी जी समजूत करून घेतली आहे कीं, आम्हीं मराठीचें शुद्धीकरण म्हणून जें म्हणतों तें केवळ—

## मुसलमानी शब्दांची अुचलबांगडी

३५. करण्याचा प्रयत्न असून आमच्या भाषेंत अिंग्रजी भाषेतील येत असलेल्या शब्दांचीच आम्हांस तितकी चीड येत नाहीं, ती त्यांची समजूत आमचा लेख नीट न वाचल्याचा आणि आमच्याविषयीं अधिक कांहीं माहिती नसल्याचा परिणाम होय. अेका लेखकानें तर असें भय प्रदर्शित केलें आहे कीं, न जाणों क्वचित्

आमची लहर अुद्यां अिंग्रजी भाषेंतील शब्दांकडेहि वळेल, त्या लेखकास ही बातमी अैकून दुःख वाटेल कीं,

## अिंग्रजी शब्द मराठींत शक्य तर आणि हितकारक असेल तर नांवालसुद्धां अुरूं देअूं नये

ही आमची पुढें कधीं तरी वरळण्यासारखी लहर नसून हें आमचें आजन्म अंगीकारलेलें व्रतच आहे. मालाकारांचे अिंग्रजीमिश्रित मराठीविषयींचे कठोर शब्द लहानपणापासून आमच्या कानांत गुंगत होते. आमच्या संस्थांतून, मंडळींतून आणि व्याख्यानांतून तर काय, पण घरच्या व शाळेच्या बोलण्यांतून अिंग्रजी शब्द मराठींत निष्कारण घुसूं देणें ही अत्यंत अपमानाची गोष्ट समजली जाअी. अितकेंच नव्हे पण प्रत्यक्ष विलायतेंत असतांनाहि—कीं जेथे अेक दोन वर्षे राहून परत येतांच आपली मातृभाषाच मी पण विसरलों म्हणून म्हणणें अेक प्रौढीचें लक्षण समजलें जात असे तेथेंहि—आमच्या संस्थेंतील सर्व हिंदी, पंजाबी, बंगाली, तामील अित्यादि सभासदांचा असा परिपाठ असे कीं, आपसांत हिंदी बोलत असतांहि व्यर्थ अिंग्रजी शब्द ज्याच्या तोंडांतून निघेल त्यास त्या दिवशींच्या चहास मुकावें लागे! या पूर्व वर्षांतील परिपाठाचा परिणाम आमच्या पिढीवर जो झाला तो नित्याचाच झाला. नुकतेंच अेका पंजाबी पत्रांत वाचलें कीं स्वीडनमधून

## लाला हरदयाळजी

सर्व पत्रें शुद्ध हिंदींत लिहितात आणि त्यांस युरोपमध्यें आज पंचवीस वर्षें सारखीं काढावीं लागलीं असूनहि पत्रावरचा पत्ता सुद्धां देवनागरींत लिहून केवळ 'अिंडिया' अितकें नांव मात्र रोमन लिपींत निरुपाय म्हणून घालतात. पंजाबांतील हिंदु भाषेस अुर्दूच्या तावडींतून सोडवून पुनरुज्जीवित करावी म्हणून आम्हीं जे लेख तत्रस्थ पत्रांतून लिहिले आहेत त्यांतील विधानें आपणांस पूर्ण संमत असल्याचेंहि हरदयाळजींनीं प्रसिद्धपणें पंजाबी पत्रांतून कळविलें आहे.

या प्रमाणें आमच्या लेखांवर आलेल्या आक्षेपांपैकीं कांहीं आक्षेपांविषयीं आमचें मत प्रदर्शित करून बाकीच्या आक्षेपांचा स्वतंत्र विचार न करितां या विषयासंबंधीं आमच्या मताची रूपरेखा पुनः अेकदां सुसंगतपणें आणि सोदाहरण आंखून त्या त्या आक्षेपांची अवश्य तर चर्चा करीत या विषयाचा आतां आमच्यापुरता तरी समारोप करण्याचें आम्हीं योजिलें आहे.

३६. झालेल्या सन्व चर्चेंत अेक गोष्ट जी प्रामुख्यानें दिसून येते ती ही की, चर्चेत भाग घेतलेल्या बहुतेक गृहस्थांचे मतानें यापुढें तरी मराठींत नवीन नवीन आरबी शब्द वा अहिंदु शब्द निष्कारण म्हणजे तद्‌र्थक आपले शब्द असून वा हिंदु भाषांतून ते घेतां येण्यासारखे असतां – घेअूं नयेत. अितकी जरी जागृति आणि जाणीव सन्व महाराष्ट्रीय लेखकांत आली तरी सुद्धां या चर्चेनें बरेंच कार्य झालें असें म्हणतां येअील.

**निजामी राज्यांत जे मराठी लोक आहेत आणि वऱ्हाडाकडे अुर्दूच्या सावलींत ज्या मराठी लेखकांस रहावें लागतें त्यांनीं ही सावधगिरी ठेविलीच पाहिजे.**

मराठींत तिकडे मुसलमानी संपर्कान्वयें नवीन परके शब्द घुसण्याचा संभव थोडा नसून तो दिवसेंदिवस वाढत जात आहे. निजाम युनिव्हर्सिटींत त्यांच्या अिस्लामी विद्यापीठांतून आणि सरकारी लिखाणांतून तत्रस्थ हिंदु भाषांस नामशेष नसले तरी तेजोहीन करून अुर्दूचा सन्वत्र प्रसार करण्याचा सहेतुक आणि आटोकाट प्रयत्न चाललेला आहे हें मागें सांगितलेंच आहे.

वास्तविक निजामचे राज्यांत मराठी, कानडी, तामील व तेलगु या हिंदु प्रमुख भाषाच प्रचलित असून हिंदुच नव्हे तर मुसलमानहि त्याच मातृभाषेप्रमाणे बोलतात, तथापि त्यांच्या करांचें द्रव्य त्यांना परक्या आणि अपरचित असणाऱ्या अुर्दू भाषेवरच व्यय करण्यांत येत आहे. अुर्दूमधूनच विद्यापीठाचें सन्व शिक्षण चालणार. सन्व शास्त्रीय शब्द अिंग्लिशमधून संस्कृतोत्पन्न हिंदु भाषांत भाषांतरित न करितां तत्रस्थ लोकांस अगदीं अपरिचित अशा अगडबंब अरेबी शब्दांत करण्याचा ठाम नियम पाळण्यांत येणार. अशा स्थितींत निजामी राज्यांतील सहस्रावधि मराठी लोकांत त्यांच्यांतील सुशिक्षितांच्या तोंडून आणि वाङ्मयांतून हे परकी शब्द घुसण्याचा आणि त्यांच्या संपर्कानें मराठी भाषेंत आपलें नित्याचेंच ठाणें घालून बसण्याचा संभवच नव्हे तर अुत्कट भय आहे. तेव्हां असा प्रकार शिवपूर्वकालीन दिलाअीप्रमाणें पुनः घडूं नये म्हणून निजामी आणि वऱ्हाडी मराठी लेखकांनीं अगदीं डोळ्यांत तेल घालून बसलें पाहिजे. अुगीच कोठला तरी नवा अुर्दू शब्द आपल्या लेखांत घालणे म्हणजेच विद्वत्तेचें दर्शक होय अशी समजूत अजूनहि तिकडच्या लेखकांत आढळून येते हें आम्ही पुनः अेकदां त्यांस प्रेमपूर्वक पण दुःखानें बजावून ठेवितों. तेव्हां यापुढे तरी शक्य तितकें करून अुर्दू शब्द मराठींत कधींहि न वापरण्याचा निश्चय आणि असे शब्द मराठींत अुगीच घुसविणें म्हणजे विद्वत्तेचें नसून स्वाभिमानशून्यतेचें दर्शक आहे अशीं निग्रही समजूत त्यांनीं धारण केली पाहिजे.

३७. यापुढें तरी नवीन मुसलमानी शब्द मराठींत घुसूं देऊं नयेत किंवा जे पूर्वी घुसलेले बखरींतून किंवा पोवाड्यांतून आढळतात ते विस्मरणाच्या थडग्यांतून उकरून काढण्याचा "शाहिरी" वेडेपणा तरी करूं नये. याविषयीं जसें जवळजवळ ऐकमत्य दिसून आलें त्याचप्रमाणें या चर्चेत आणखी अेका महत्त्वाच्या विषयाविषयींहि तें तसेंच आढळून आलें ही समाधानाची गोष्ट होय. अिंग्रजी भाषेंतील शास्त्रीय आणि पारिभाषिक शब्द मुद्धां संस्कृतांतून किंवा तदुत्पन्न हिंदु भाषासंघांतूनच बनवून घ्यावेत, परंतु अिंग्रजींतील व्यवहारूं नयेत. **मराठी बोलतांना नि लिहितांना मध्येंच अिंग्रजी शब्द वापरण्याची दुष्ट संवय निंद्य समजून सोडावी**

आणि विष्णुशास्त्र्यांनीं अिंग्रजीच्या बलात्कारापासून मराठीस वांचविण्याचा जो स्तुत्य अुपक्रम केला त्याचा अेकसारखा नेटानें पुरस्कार करीत रहावें याविषयीं बहुतेकांचे अनुकूल मत दिसून आलें.

तथापि अेक गोष्ट आम्हांस प्रमुखपणें सांगितल्याविना राहवत नाहीं ती ही कीं या मताचा

**सक्रिय अवलंब करण्याचा यत्न जसा पूर्वी होत असे तसा आजकाल मुळींच होत नसून शाळा आणि विद्यापीठें यांतील होतकरू तरुण पिढीची स्थिति तर या दृष्टीनें अत्यंत शोचनीय होत चाललेली आहे.**

या दहाबारा वर्षांत या विषयावर कटाक्ष ठेवून भेंडगुजरी मराठी बोलण्यावर कोरडे ओढणारा अेकादा विष्णुशास्त्र्यांचा शिष्य अुत्पन्न न झाल्यानें तरुण नव्या पिढीस मराठी बोलतांना घरीदारीं, बाजारीं, सहजासहजीं अिंग्रजी शब्द घुसडण्याची घातक खोड अितकी जडली आहे कीं, अिंग्रजी चवथ्यापांचव्या यत्तेंतील मुलांसहि ती सोडतां सोडणें कठीण झाल्याचें आम्ही पहात आहों. लाला हरदयाळांसारखे अिंग्रजी भाषेतील पारंगत स्वीडनमधून सुद्धां पत्रें शुद्ध हिंदींतच लिहितात आणि येथील शाळांतील पांचशे अिंग्रजी शब्दहि पुरे न येणारीं सहावीसातवींतील मुलें "मीं पेपर जेव्हां हँड ओव्हर केला तेव्हां माझें हेड अेक होत होतें!" म्हणून अवाच्य भकतांना अैकूं येतात. फादर मदर, वाअिफ हे शब्द अगदी नियमानें विद्यार्थी आपसांत किंवा श्रेष्ठांशीं बोलत असतांना प्रौढपणाचें निदर्शक समजून वापरतात आणि त्यांचे श्रोते त्यांस यत्किंचित् दूषण न देतां ते अैकून घेतात. मोठ्या माणसांची गोष्ट तर याहूनहि तिरस्करणीय झाली आहे. आम्हीं अक्षरशः अेका प्रमुख गृहस्थास असें बोलतांना आजकालच अैकिलें आहे कीं "त्यानें जी पोझिशन अॅझ्यूम केली ती

ओरिजिनलीच फॉल्स होतो!" अशी आणि याहून हास्यास्पद शेंकडों उदाहरणें देतां येतील.

या अेकंदर प्रकारावरून या विषयाकडे आजकाल लोकांचें अगदीं अपराधी दुर्लक्ष होत आहे यांत आम्हांस कांहींच शंका उरली नाहीं. लेखांतून आणि व्याख्यानांतून मात्र सुदैवानें बरीच सावधानता ठेवण्यांत येते. त्यावरूनहि हेंच सिद्ध होतें कीं, बोलण्यामध्यें जी ढिलाअी होते ती भाषेंत ते ते भाव व्यक्त करण्याची शक्ति नाहीं म्हणून होत नसून लिहिण्यांत वा व्याख्यानांत जपून बोलण्याची जी आपणांस संवय झाली आहे तितकेंच जपून घरगुती संवादांतहि शुद्ध मराठी बोलण्याची आपण संवय करून घेत नाहीं म्हणून होय. तेव्हां बोलतांना मराठींत अिंग्रजी शब्द विनाकारण घुसडून देणें हें लज्जास्पद आहे अशी भावना संचरवून मंडळांतून शाळांतून नि घरांतुन अिंग्रजी शब्द मराठींत येतांच प्रेमळ टीकेचा आणि अुपहासाचा भडिमार करीत गेलें पाहिजे.

## पारिभाषिक शब्द

३८. त्याचप्रमाणें पारिभाषिक शब्द आणि शास्त्रीय शब्द अिंग्रजींतुन मराठींत भाषांतरित केले जाण्याची सदोदित खटपट करीत राहिलें पाहिजे. बडोद्यास कांहीं शास्त्रांतील पारिभाषिक शब्द नियत करण्यासाठीं मंडळें नेमून राजाश्रयानें तीं तीं पुस्तकेंहि प्रसिद्ध झालीं आहेत. अितर प्रांतांतूनहि अशी व्यवस्था होत आहे. आतां या वैयक्तिक किंवा अल्पसंख्याक प्रयत्नांचे आधारावर हिंदु भाषांच्या निरनिराळ्या साहित्यपरिषदांचें अेक संयुक्त मंडळ नेमून त्याकडून मान्य झालेले पारिभाषिक शब्द तामील ते पंजाबीपर्यंत अुभ्या हिंदु वाङ्मयांत रूढ करण्याची खटपट सुरू करण्याची वेळ आली आहे, आणि त्या दिशेनें लवकरच प्रयत्न होअील अशी आशाहि आहे.

जोंपर्यंत अशी सर्वसंग्राहक सामान्य परिभाषा ठरली नाहीं तोंपर्यंत चाल-चलाअू कामासाठीं नवीन कल्पना आणि विचार प्रदर्शित करण्यास जे शब्द आपण योजितों ते योजितांनाच

**प्रथमपासूनच ते संस्कृतोद्भव किंवा हिंदुभाषोद्भव असून श्रुतिसुखद असे योजण्याची सावधानता प्रत्येक लेखकानें ठेविली पाहिजे**

या कामांत आपला मराठी लेखकवर्ग फार निष्काळजीपणा दाखवित आहे हें, याविषयीं हिंदी आणि बंगाली वर्तमानपत्रकारांसह, किती कसोशीनें नवीन शब्द

काढतात हें पाहिलें असतां, दुःखानें मान्य करावें लागतें. आणि याचें कारण त्यांची विशेष विद्वत्ता किंवा अुद्भावक शक्ति नसून भाषेंत अुर्दू किंवा अिंग्रजी शब्द अुर्दू–संस्कृत वा अुर्दू–प्राकृत कण्कटु खेडगुजरी समास करणें हें लांछनास्पद आणि अज्ञानीपणाचें द्योतक आहे असा तिकडे शिष्टाचारच पडून गेला आहे हें होय. "सोसायटीचे तहह्यात मेंबर" किंवा आतां बडोद्यास नेमल्या गेल्या "पदवी–पदकें–बक्षीस कमिटी" चें कण्कटु नांव, असलीं कितीतरी अुदाहरणें मराठी वर्तमानपत्रांत नित्य पाहण्यांत येतात. तेंच हिंदी वा बंगाली पत्र हातीं घेतलें कीं, हा प्रकार फारच थोड्या प्रमाणांत आढळून येअून त्यांतील शुद्ध आणि सुसंवादी नवीन शब्द वाचीत असतां मनास समाधान वाटूं लागतें. वरील बडोद्याच्या मंडळाचें नांव हिंदींत "पदक–पदवी पारितोषिक मंडळ" असेंच लिहिलें जातें आणि तहहयात शब्दाचे स्थलीं यावज्जीवन सभासद हा शब्दप्रयोग तिकडे अगदीं रूढच झालेला आहे. व्याकरणाच्या अगदीं चवथ्या-पांचव्या यत्तेंत शिकविला जाणारा नियम कीं समास हे खेडगुजरी न व्हावेत, तर संस्कृत शब्दाशीं संस्कृत–प्राकृत असावेत, हा अेवढा जरी नियम आमचे पत्रकार आणि लेखक ध्यानांत ठेवतील आणि अुर्दू–संस्कृत वा अिंग्रजी–संस्कृत समास करण्याचें शक्य तों संपूर्ण टाळतील तर आतां यापुढें तरी मराठींत "कायदेकौन्सिल" सारखे अुनाड शब्द प्रचलित होणार नाहींत. बंगाली आणि हिंदी पत्रांतून यास "व्यवस्थापिका सभा" म्हणून प्रथमपासून शुद्ध आणि सान्थ अन्वर्थक शब्द योजण्यांत आल्यानें आज तो शाळेंतील विद्यार्थ्यापर्यंत तिकडे रूढ आहे.

जे अिंग्रजी शब्द आधींच आणि वर वर्णन केलेल्या प्रारंभिक ढिलाअीनें घुसले त्यालहि निदान लेखांतून आणि व्याख्यानांतून तरी आपले प्रतिशब्द योजण्याची रूढि शक्य ती पाडण्यांत कांहीं अेक वावगें होणार नाहीं. हॉस्पिटल शब्द घेअूं या. या शब्दास अलीकडे रुग्णालय हा प्रतिशब्द आपण योजतों तो ठीकच आहे. तो रूढहि होत आहे. ज्यांच्या वशांत हॉस्पिटल शब्द गटकन गिळला जातो, पण रुग्णालय शब्द तेवढा लेखांत व व्याख्यानांतुनहि अडकून बसतो अशा विकृत शरीररचनेच्या कांही माणसांसाठी भाषेची प्रकृतीच विकृत करून घेणें अिष्ट नाहीं. जर हॉस्पिटल शब्द योजतां योजतां गांवढळापर्यंत रूढ झाला तर काय रुग्णालय शब्द योजितच गेलें तर रूढ होणार नाहीं? तीच स्थिती (डिस्पेन्सरी) औषधालय, (नर्स) दाअी वा शुश्रु, (सिनेमा) चलचित्रें वा चित्रपट, (लायब्ररी) ग्रंथालय अित्यादि शब्दांची आहे. कांहीं दिवस हे परकी शब्द तोंडी बसलेच आहेत म्हणून राहतील. पण त्यांच्या जोडीनेंच स्वकीय प्रतिशब्द प्रचारांत येतांयेतां त्या परकी शब्दांच्या

मागच्या सत्तेचा आश्रय नाहींसा झाला म्हणजे नामशेष होऊन स्वकीयच मागें उरतील. आतां आपण भाषेत शिरलेल्या

**जुन्या उर्दू शब्दांचें काय करावयाचें ?**

३९. तें सारांशरूपानें निर्देशूं. नवीन उर्दू शब्द आणूं नयेत आणि इंग्रजींतील शब्दांस मराठींत एव्हांपासूनच घरगुती बोलण्यांत देखील थारा शक्य तोंवर देऊं नये, याविषयीं या चर्चेत जवळजवळ एक मत झाल्याचें आम्हीं वर सांगितलेंच आहे. परंतु जुन्या उर्दू शब्दांस आपल्या भाषेंतून काढून टाकण्याचा प्रयत्न करावा कीं नाहीं याविषयीं मात्र या चर्चेत बराच मतभेद आढळून आला. आणि तो येणें साहजिकच होतें. कारण एकदां एखादी संवय जडली म्हणजे ती सोडणें इतकें कठीण होऊन जातें कीं ती संवय अहितकारक नसून हितकारक आहे असें सिद्ध करण्याच्या बुद्धीला चकवून देखील मन एकसारखा प्रयत्न करीत असतें.

**रामदासांच्या ग्रंथांत उर्दू शब्द भरपूर आढळतात म्हणून एकानें असें विधान ठोकून दिलें आहे कीं**

'छत्रपतींचे काळांत उर्दू शब्द मराठींतून शक्य तों काढून आपल्या जुन्या शुद्ध स्वकीय शब्दांचें पुनरुज्जीवन करण्याचा प्रयत्न झाला ही गोष्टच मुळांत खोटी आहे.' अशांस काय उत्तर द्यावें ? लाला लजपतराय हिंदीचे पुरस्कर्ते आहेत आणि हिंदीसच सर्व हिंदुस्थानची राष्ट्रभाषा करावी म्हणून प्रत्येक आर्यसमाजी खटपट करीत आहे. परंतु लिहिण्याची वेळ आली म्हणजे लालाजींस उर्दूच लिहिल्याविना गत्यंतर नाहींसें होतें आणि आर्य समाजीयांच्या भाषेंत शेंकडा पन्नास उर्दू शब्द नको नको म्हणतां येतात. पण म्हणून लालाजींस वा आर्यसमाजीयांस हिंदी शुद्धीकरण मान्य नाहीं असें कोणी म्हणू शकेल काय ? तीच स्थिति समर्थांची होती. लहानपणा-पासून सैनिक, राजकीय, व्यावहारिक इत्यादि हजारों उर्दू शब्द तोंडांत व मज्जांत रुळून बसले ! ते जावेत असें वाटलें तरी जाऊं शकत नाहींत त्यांतहि थोर विभूतीस आपलें जीवन भाषाशुद्धीहून फारच निकडीच्या असणाऱ्या राष्ट्रीय आत्मशुद्धीकडे वहावें लागलेलें. पण हें उघड दिसत असूनहि लहानपणासून रूढ झालेले उर्दू शब्द तोंडांतून वा लेखणींतून कांहीं केल्या काढून टाकण्याचें कठीण जातें म्हणून त्रासून

**रामदास उर्दू वापरीत म्हणून मीहि वापरतों असें म्हणणें म्हणजे रामदास कौपीन किंवा रामकृष्ण परमहंस उलिंग हिंडत म्हणूनच मीहि उलिंगच हिंडेन असें म्हणण्यासारखें हास्यास्पद आहे**

४०. अितका वेळपर्यंत आम्हीं आपल्या भाषेंतून जुने असोत नवे असोत, परकी शब्द शक्य तों हितकारक असेल तर काढून टाकावेत असे प्रयोग करीत आलों परंतु आतां

शक्य तो म्हणजे कोठवर

याविषयीं आमचें मत थोडक्यांत सांगून आणि शब्दांची कांहीं अुदाहरणें आणि प्रतिशब्द देअून आम्ही ही लांबलेली लेखमाला पुरी करणार आहोंत.

घरांत बाहेरचा वायु आणि प्रकाश येण्यानेंच प्रकृति ठीक राहील हें खरें ना? असें या विषयावर संवाद चालत असतां अेका गृहस्थानें आम्हांस विचारलें. तेव्हां आम्हीं अुत्तर दिलें कीं अन्थात्. परंतु घरास बाहेरच्या प्रकाशास्तव खिडक्या वा दारें न ठेवणें हा जसा अेक आकुंचनाचा अत्याचार होअील, तद्वतच घराच्या सन्व भिंती प्रकाश यावा म्हणून पाडून टाकणें किंवा पडूं देणें आणि घराचें घरपणच नष्ट करणें हा प्रसरणाचाहि अत्याचारच होअील! त्याचप्रमाणें जोंवर मराठी भाषा म्हणून कांहीं विशिष्ट आणि स्वतंत्र पदार्थ अस्तित्वांत ठेवणें आहे तोंवर तीमध्यें बाहेरचे शब्द नि वाक्प्रचार घेणें हें कांहीं अंशीं जरी अवश्य आहे तथापि ते विनाकारण घुसूं देणें किंवा घरांतल्या कोळीष्टकाप्रमाणें अेकदां लागलें म्हणून तसेंच लोंबकळूं देणें हेंहि अनिष्टच समजलें पाहिजे. कोठपर्यंत परकी शब्द घ्यावेत किंवा घेअूं नयेत याची मर्यादा आमच्या पहिल्या लेखांत दिलेली असल्यानें तिची पुनरुक्ति येथें करीत नाहीं. थोडक्यांत अितकें सांगितलें म्हणजे पुरे आहे कीं, बाहेरचे शब्द तरच स्वभाषेंत घेअूं द्यावेत कीं जर त्या शब्दांनीं व्यक्त होणारी कल्पना कांहीं केल्या आपल्या शब्दांनीं व्यक्त होअूं शकत नसेल. म्हणूनच नवीन प्रकारच्या विशिष्ट वस्तु, प्राणी वा पदार्थ यांची तत्तद्देशीय नांवें भाषेंत रूढ झाल्यास चिंता नाहीं. अशा शब्दांनीं मात्र भाषेची संपत्ति खरोखरच वाढते. अुदाहरणार्थ, अेकादें विलायती झाड वा फळ, आफ्रिकेंतील किंवा अुत्तर ध्रुवावरील नवीन शोध लावलेल्या अेकाद्या जातीचें नांव. ही मर्यादाहि पहिल्या लेखांतून स्पष्ट सांगितलेली असूनहि "गुलाब" या शब्दासहि आपणास मुकावें लागतें कीं काय म्हणून निष्कारण धडकी भरल्याचा आव कित्येकांनीं आणावा याचें आश्चर्य वाटतें!

नवीन आणि ज्यांस आपणाकडे मूळचें विशिष्ट नांवच नाहीं अशा पदार्थांस त्यांचीं मूळचीं नांवें जर तीं अिकडे आपल्या भाषेंतून साधित होअूं शकत नसतील

तर व्यावयास जसा प्रत्यवाय नाहीं तशीच स्थिति जे जुनें परकी शब्द आपल्या भाषांतून अगदीं मिळूनमिसळून गेले आहेत त्यांचीहि असावी.

**या जुन्या अुर्दू वा अिंग्रजी शब्दांत जे आपणांत पूर्वी रूढ नसलेल्या वस्तूंचे वा कल्पनांचें निदर्शक असतील आणि ज्यांस आपले जुने वा नवे शब्द नसतील ते सुखेनैव राहू द्यावेत**

अुदाहरणार्थ, खुर्ची, टेबल, बूट, मेज, सदरा, कोट, जाकीट, ट्रंक, कॉलर अित्यादि. या प्रत्येक शब्दानें अेक विशिष्ट नवीन वस्तु निदर्शित होत आहे. त्या पदार्थास आपली जुनीं नांवें नाहींत आणि ते शब्दहि सुटसुटीत आणि आपल्या भाषेशीं फारसे विसदृश नाहींत. जोडा, वाहणा, चपल, खडावा अित्यादि अुपानहाच्या किंवा पादत्राणाच्या जातीहून विशिष्ट असा अेक पायतणाचा नवीन प्रकार बूट शब्दानें व्यक्त होतो म्हणून बूट शब्द ठेवावा. पण तेवढ्यासाठीं जोडा, पादत्राण, पायतण, अुपानह अित्यादि. जुने शब्द असतांहि वा नवीन तदुत्पन्न काढणें शक्य असतांहि अिंग्रजी "शू" शब्द मात्र सामान्यार्थी मराठींत योजणें मूर्खपणा असल्यानें निषिद्ध असावें. ह्याच अुदाहरणानें सर्वसाधारण नियम लक्षांत घेतां येण्यासारखा आहे.

## शब्दसंपत्तीचें खूळ

४१. आपल्यांतील जुन्या शब्दांनीं शक्य तितकें काम भागवावें या म्हणण्यावर पुष्कळदां असें विचारण्यांत येतें कीं, अुपानह, जोडा अित्यादि जुने शब्द असतांहि "शू" शब्द वापरण्यांत आल्यानें हानि कोणती ? त्यानें शब्दसंपत्ति वाढते. पण ह्याच दृष्टीनें पाहिलें तर मग आजकाल अिंग्रजी शिकलेले लोक शिष्टपणाची भाषा समजून "वाअिफ सिक आहे" म्हणून जें पाहुण्यास सांगतात तेंहि क्षम्यच म्हणावें लागेल कारण पत्नी, अर्धांगी, बायको, मंडळी, कुटुंब अित्यादि वाटेल तितके संस्कृत-प्राकृत शब्द मराठींत असतांहि तो कुटुंबास वाअिफ म्हणून जें नवीन नांव देतो त्यानें तदर्थक शब्दसंपत्ति वाढते असेंच म्हटलें पाहिजे. अितकेंच काय पण बाप, पिता, वडील, जनक अित्यादि शब्दांस सोडून "फादरनीं गेस्टनां रिसीव्ह केलें" म्हणून सांगणारीं पोरेंहि फादर, मदर, सिस्टर अित्यादि शब्द भाषेत आणून मराठीची शब्दसंपत्ति वाढविण्याचें महत्कार्य करीत आहेत असें म्हणावें लागेल. त्याही पुढें अेक पाअूल टाकून असेंहि म्हणतां येअील कीं, अुत्तरेकडचे हिंदु, बापास सभ्यपणाचा शब्द म्हणून अुर्दू 'वालिद' शब्द लावितात; अीश्वरास मालिक म्हणून लिहितात; तेहि शब्दसंपत्ति वाढवीत आहेत. तर मग पिता, बाप, वडील, जनक आणि संस्कृतांतील

अनेक तदर्थक शब्दांस सोडून शब्दसंपत्ति वाढविण्यासाठीं अुर्दू वालिद वा अिंग्रजी फादर शब्द वापरूनच कां थांबा ? आपल्या मराठींत जर्मन, फ्रेंच, रुशियन, अंदमानीज अित्यादि सर्व भाषांतून बापास जितके शब्द असतील तितके सर्व पाळीपाळीनें वा लहरीलहरीनें अुपयोगांत आणून आपल्या पितृचरणीं त्यांची माला अर्पण कां करूं नये ? असला दिग्विजय करून तो करभार जर आपण अेखाद्या रघुप्रमाणें आपल्या भाषेच्या भांडारांत ओतूं लागलों तर त्यानें शब्दसंपत्ति वाढेल, परंतु तो शब्दरत्नाकर आपल्या भाषेचा न राहतां जगाच्या भाषेचा अेक नवा धेडगुजरी कोश काय तो होअील ! घराची मर्यादा वाढविण्याकरितां सर्व भिंती पाडून टाकून तें खूप विस्तृत होत आहे म्हणून स्वतःचें अभिनंदन करून घेणाऱ्या वेड्या धन्यासारखेंच भाषेंत भरमसाट अुर्दू वा अिंग्रजी शब्द घुसडणाऱ्या शब्दसंपत्तिवर्धकांचें समाधान फारच हास्यास्पद आहे !

अगदीं नवीन आणि ज्यांना भाषेंत शब्द नाहींत किंवा शोधितां येणें अशक्य आहे तेवढ्या पदार्थांचें वाचक शब्द मात्र परक्या भाषेंतून घ्यावेत नि घेतलेले तसेच ठेवावेत. बाकी केवळ शब्दसंपत्ति वाढविण्याकरितां म्हणून आपले जुने शब्द असतांहि, वा साधित होण्यासारखे असूनहि परकी शब्द भाषेंत घुसूं देणें वा घुसलेले टिकूं देणें चुकीचें आणि भाषेच्या प्रकृतीस आणि स्वाभिमानास हानिकारक आहे.

## कांहीं अुदाहरणें : पहिला वर्ग

या कसोटीनें आतां आपल्या भाषेंत घुसून बसलेल्या अुर्दू शब्दांची थोडीशी परीक्षा करूं. प्रथमतः ज्या शब्दाला आपल्या भाषेंत यथार्थ प्रतिशब्द असूनहि ते लुप्त होत चाललेले आहेत आणि म्हणून ज्यांचा अुपयोग आपण व्यवहारांत नसला तरी लेखांत आणि व्याख्यानांत त्वरित बंद केला पाहिजे त्यांतील कांहीं (प्रतिशब्दांसह) खालीं दिले आहेत. मजलिस-अि-आम=लोकसभा (ही केवढी खेदाची गोष्ट आहे कीं, ग्वाल्हेरसारख्या मराठी संस्थानांत नुकतीच जी प्रातिनिधिक सभा स्थापन झाली आहे तिचें नांव हिंदी वा मराठी प्रजेस तर काय पण तत्रस्थ मुसलमानी प्रजेसहि कळणें कठीण अशा अगडबंब परकी शब्दानें ठेवलें जावें ! अुर्दू शब्दांत कांहीं विशेष डौल वा गांभीर्य आहे ही खुळी कल्पना या चुकीचे मुळाशीं आहे. मराठी शुद्धीकरणानें अुर्दू शब्दांकडे परकीय दृष्टीनें पाहण्याची संवय मराठी लोकांस लाविली तरीहि पुष्कळच कार्य झालें असें म्हणावयास प्रत्यवाय नाहीं. लोकसभा, प्रजासभा हीं नांवें सोडून मजलिस-अि-आम हें नांव ठेवणें स्वाभिमानशून्यतेची पराकाष्ठा आहे !) रजा=निरोप, अवधि, सुट्टी; कैफियत–बयाण=आत्मसमर्थन, वक्तव्य; जबरीसंभोग=बलात्कार, बलसंभोग; अिसम=मनुष्य; कोम=भ्रतार (अुदाहरणार्थ पार्वती कोम

महादेव नारकर, अशीं स्त्रियांचीं नांवें लिहिण्याची पद्धत निंदनीय आहे. पार्वतीबाअी भ्रतार महादेव नारकर असें लिहावें.) मालक=धनी; जमीनअस्मान=आकाशपाताळ; हवामान=ऋतुमान वा वायुमान (ही आनंदाची गोष्ट आहे कीं, कित्येक पत्रकारांनीं हवामान शब्द सोडून ऋतुमान शब्द व्यवहृत करण्यास आरंभ केला आहे.) शिवाय=विना, व्यतिरिक्त, आणखी; खबरदारी=सावधानता.

वर दिलेलीं कांहीं अुदाहरणें अशा परकी शब्दांची आहेत कीं, ज्या अर्थाचे आपले जुने शब्द अजून अगदीं मृत झालेले नाहींत किंवा व्यवहारांत आणिले तर सहज समजण्यासारखे आहेत. म्हणून या आणि असल्या अुर्दू वा अिंग्रजी परकीय शब्दांच्या ठिकाणीं निदान लेखांतून वा व्याख्यानांतून हे आपले प्रतिशब्द किंवा याहून यथार्थ कोणास सुचत असतील तर ते आपण अेकसारखे निग्रहानें वापरीत राहिलें असतां ते मरणासन्न स्वकीय शब्द पुनः सहज रूढ होतील. याप्रकारचे अुर्दू शब्द काढून टाकिले असतां मराठीची "मोठी हानि" होअील म्हणून भलतीच भीति वाटण्याचेंहि कांहीं कारण नाहीं. कारण या अेकेका अर्थी आपल्या भाषाभांडारांत चारचार शब्द मिळूं शकतील. क्वचित् अेकाद्या शब्दांत विशिष्ट खोंच असेल तर ती संवयीनें आपल्या शब्दांतहि लवकरच व्यक्त होअूं शकेल.

## दुसरा वर्ग

आतां दुसरा वर्ग अशा अुर्दू वा परकीय शब्दांचा आहे कीं, ज्यांनीं आपले तदर्थक जुने शब्द पार मारून टाकिले; अशा शब्दांचें पुनरुज्जीवन वरील शब्दांच्या पुनरुद्धाराहून कठीण आहे. परंतु म्हणूनच तें अगदीं अवश्य केलें पाहिजे. याप्रकारच्या परकीय शब्दांना कांहींअेक विशेष जोर किंवा खोंच नसून ते आपल्या अजागळपणाचें स्मारक म्हणूनच काय ते रूढ झालेले आहेत! अशापैकीं कांहीं देतों : हजर=विद्यमान, अुपस्थित; हवा=वायु; हवापाणी=वारापाणी, जलवायु; यादी=टिपण, टिपणी, टांचण किंवा तालिका; जखम=घाव, व्रण, क्षत; जखमी=घायाळ, विक्षत; तयार=सिद्ध, सज्जता, सिद्धता; पूर्वतयारी (हा अजागळ शब्द किती कटु आहे!)=पूर्वव्यवस्था, पूर्वसज्जता; अुमेदवार=प्रार्थी, अिच्छुक, प्रवेशेच्छु; कारकीर्द=राज्यकाल, सत्ताकाल, आयुकाल; शिफारस=अनुरोध, प्रशंसा; जाहीर=प्रसिद्ध; जाहिरात=विज्ञापन, प्रासिद्धक, प्रसिद्धिपत्र; खात्री=निश्चिति, प्रतीति, प्रत्यय; पारिग्राफ=छेदक; हवामान=ऋतुमान; हवापालट=वायुपालट; जबाबदारी=अुत्तरदायित्व; जबाबदार=अुत्तरदायी, दायी; सर्टिफिकेट=प्रमाणपत्र.

असे आणखी बरेच परकी शब्द सुचवितां येतील कीं, ज्यांना दिलेले प्रतिशब्द बहुतेक मराठी वाचकांस गंमत वाटेल अितके नवखे आहेत. हवामान हा शब्द

रुचतो. जशी व्यसनी मनुष्यास अफू कडू लागत नाहीं; परंतु ऋतुमान किंवा वायु-मान शब्द नवखा वाटतो. पण तो वापरूं लागण्याचा अवकाश कीं, महिना दोन महिन्यांचे आंत तो महाराष्ट्रभर शिक्षितांतून नि अशिक्षितांतूनहि प्रसृत झालाच म्हणून समजावें.

## हें फार कठीण आहे अशी शंका असणारांनीं केवळ अितकेंच ध्यानांत ठेवावें कीं

हेच अुर्दू आणि परकी शब्द हिंदी व बंगालींत प्रचलित होते. परंतु चारपांच वर्षांचे आंत तिकडील लेखकांनीं निग्रहानें स्वकीय शब्द वापरण्याचें व्रत धरितांच आज त्या दोनहि वाङ्मयांत आम्ही वर दिलेले प्रतिशब्द अगदीं रूढ होअून आतां लोकांच्या बोलण्यांतहि रुळूं लागले आहेत. वरील अुर्दू शब्दांस आम्हीं आपल्या हिंदी, बंगाली बांधवांनीं व्यवहार केलेले प्रतिशब्दच सहेतुकतः दिले आहेत. कारण कीं, अेका अर्थीं अेकाच शब्दाचा व्यवहार हिंदु भाषांतून जितका वाढेल तितका राष्ट्र-भाषेच्या प्रचारास अुपकारक होअील. दुसरी गोष्ट ही कीं, आम्ही अुर्दू शब्दांस वा परकी शब्दांस मराठींतून काढून टाकण्याची चळवळ नुसती सांप्रतच्या लेखांतूनच करीत नसून बंदिवासांत होतों तेव्हांपासून आजपर्यंत शेंकडों लोकांस तशी संवय लावीत आलों आहोंत. विद्यार्थ्यांपासून तो विद्वानांपर्यंत

## ज्या शेंकडों स्त्रीपुरुषांनीं हें व्रत अंगीकारिलें आहे त्या सर्वांचा हाच अनुभव आहे कीं

पहिल्या महिन्यांत सरासरी त्रास वा कठीणपणा वाटतो, पण पुढें या स्वकीय शब्दांचा अितका परिचय होअून जातो आणि विदेशी शब्द मराठींत घातले असतां कानास अितके कडू लागतात कीं ते योजूं म्हटले असतां योजवत नाहींत. कठिणते-विषयीं अितकी आठवणसुद्धां शंकानिवृत्ति करील कीं ज्या आमच्या तोंडीं हे परकी शब्द अितक्या सहज आणि अितक्या पक्केपणीं रुळले त्या आम्हांस स्वकीय शब्दहि संवयीनें तितकेच परिचित व्हावयास कठीण कां जावें? निदान अितकें झालें म्हणजे पुरे आहे कीं, हे परकी शब्द त्या भावनांस व्यक्त करणारें जें अेकमेव साधन होअून बसले आहेत ते तसें न राहतां आमचे जुने, स्वकीय आणि भाषाप्रकृतीशीं सुसंवादी असलेले शब्दहि त्यांसह व्यवहारांत आणि लेखांत रूढ व्हावेत.

## अुर्दूचा डोअीजडपणा

४४. या अुर्दू शब्दांचा डोअीजडपणा आज भाषेस किती नडत आहे याचा अुल्लेख मागें केलाच आहे. तरीहि विशेषतः कवितेंत तो किती नडतो याचें आणखी

स्पष्टीकरण करूं. तयार किंवा हवा हा शब्द कांहीं केल्या अभिजात मराठी कवितेंत बसत नाहीं; सुसहशपणें शोभत नाहीं. भीमसेन रणांगणांत हजर होता हें वाक्य गद्यांत जरी कोणाचे कानास खटकत नसलें–आमच्या खटकतें–तथापि अेखाद्या अभिजात वृत्तांत घालितां येणें अशक्य होतें. अुदाहरणार्थ "फौजेची यादी कर कृष्ण म्हणे ठेव त्यावरी नजर। दोस्ता! भीम बहादुर येअुनि होअील शीघ्रची हजर ॥" ही आर्या पहा! बरें हजर, यादी, तयार हे शब्द गाळून जर तो भाव व्यक्त करूं म्हटलें तर तदर्थक संस्कृतोत्पन्न जुने शब्द पार ठार झाल्यानें तो व्यक्त करणें सोडून द्यावें लागतें, वा पर्यायानें व्यक्त करणें भाग पडतें. अितकी भाषेची परावलंबिता असणें केवळ लज्जास्पद आहे. आणि जर हिंदी आणि बंगालीमध्यें या शब्दांचें बंड मोडून काढून वर दिलेले प्रतिशब्द दोनचार वर्षांत अगदीं रूढ करितां आले तर आपणांस तें कां करितां येअूं नये? आपल्या त्या भगिनीभाषांतील तदर्थक प्रचलित स्वकीय शब्द आपण कां वापरूं नयेत? जर कोणास वर दिलेल्या प्रतिशब्दांहून अधिक सुटसुटीत, परिचित आणि यथार्थ स्वकीय शब्द सुचले तर अर्थातच ते आम्हीहि आनंदानें स्वीकारूं.

## गमतीची प्रतिक्रिया–स्वदेशी शब्दहि विदेशी भासतात

४५. मागें सांगितलेंच आहे कीं मराठी शुद्धीकरणावरील पहिला लेख प्रसिद्ध झाल्यापासून महाराष्ट्रीय शिक्षित वर्गात या विषयाची चर्चा सुरू झाल्यानें शब्द पारखून घेण्यासाठी नवीन प्रवृत्ति अुत्पन्न झाली आहे. जेथें शब्द स्वदेशी किंवा विदेशी आहे ही शंकाहि अुत्पन्न होत नसे तेथेंच आतां शब्द समोर येतांच तो कुठला आहे याची चर्चा सामान्य विद्यार्थ्यांपर्यंत होतांना आढळून येत आहे. या प्रवृत्तिनें व्युत्पत्तिशास्त्राकडे पुष्कळांचें लक्ष सहजच आकर्षिलें गेलें. परंतु त्यायोगें अेक साहजिकच गमतीची प्रतिक्रिया अुत्पन्न झाली. चांगल्या विद्वान गृहस्थांतहि या विषयाची चर्चा चालतांना कित्येक शुद्ध स्वदेशी शब्दहि अुर्दू म्हणून लेखले जाअूं लागले. यावरूनच आजपर्यंत शब्दांच्या व्युत्पत्तीकडे लेखकवर्गाचेंहि किती दुर्लक्ष होतें हें अुघडकीस येतें. जो शब्द अुर्दूमध्यें असतो तो विदेशी अशी साधारण कसोटी पुष्कळजण लावितांना आढळतात. पण हा भ्रम आहे हें आम्हीं मागें अुर्दूच्या अुत्पत्तीचे चर्चेंतच सांगितलें आहे. वर्तमानपत्रांतून आमच्या लेखांतहि किती अुर्दू शब्द घुसले आहेत हें दाखविण्याचा प्रयत्न करितांना केसरींतल्या आणि अितर वृत्तपत्रांतल्या लेखकांनीं "स्वारी", "वगैरे", "माहिती", "बाजू", "सक्त", "बातमी", "चौकस", "जादा", "ठराव", "करार", "गरम" अित्यादि शब्दांसहि अुर्दू म्हणून निवडले आहे आणि या शब्दांस प्रतिशब्द द्या म्हणून

आम्हांस आव्हान दिलें आहे! असल्या अजाण आव्हानास अितकेंच उत्तर पुरे आहे कीं हे सर्व शब्द शुद्ध संकृतोत्पन्न आहेत. "अश्वारोही" या शब्दापासून "स्वारी"; वर्ग शब्दापासून वगरा (पंजाबी) आणि वगैरे; महित शब्दापासून माहिती; भुजा शब्दापासून बाजू; शक्त शब्दापासून सक्त; वृत्त शब्दापासून वित्त-बातमी; चौ वा चतुःच्या रूपापासून चौक, चौकशी–चौकस, चौकडा; ज्यायान् आणि ज्येष्ठ शब्दापासून जास्त, जादा; स्थिर वा स्था या शब्दापासून ठरणें, ठराव; कृ–करणें शब्दापासून करार; धर्म (हिंदी घाम म्हणजे अून) पासून गरम; अशी या शब्दांची व्युत्पत्ति आहे. त्याचप्रमाणें "खाना", "दार", "दान", "बे" हे प्राकृत प्रत्ययरूपी शब्द मूळ संस्कृत शब्दांपासून वा प्रत्ययांपासून आलेले आहेत. ज्या खन् धातूपासून खणणें, घराचा खण हे शब्द आलेले आहेत, त्याचेंच रूप "खाना" हें आहे; म्हणून कारखाना ज्या खणांत म्हणजे घरांत कम्मकार काम करतात तें स्थल=कारखाना. "धर" (जसें वेत्रधर) यापासून "दार" म्हणजे धरणारा–बाळगणारा. 'आधान' शब्दापासून दान (जसें पर्णाधान – पानदान). वि– विरहितपासून बे (जसें बेशुद्ध म्हणजे शुद्धिविरहित), हीं प्राकृत रूपें अुत्पन्न झालेलीं आहेत. आणि जुन्या हिंदी ग्रंथांतूनहि आढळतात. तेव्हां हे प्रत्यय वा शब्द केवळ ते पर्शियन मध्येंहि आढळतात म्हणून ते विदेशी असलेच पाहिजेत असें समजणें हें भ्रमास्पद आहे. येथें अेखाद्दुसऱ्या शब्दाच्या व्युत्पत्तीविषयीं मतभेद होअूं शकेल. तो फुटकळ प्रश्न आहे.

## संशयास्पद फुटकळ अडचणींवरहि सोपा अुपाय आणि संशयित शब्द कसा ओळखावा याचा नियम

४६. ज्यास विशिष्ट शब्द परकीच आहे असें वाटेल त्यानें तोहि सोडून तदन्यक अितर स्वदेशी शब्द वापरावा. आपल्या स्वदेशी भाषेंत तामील, मल्याळमपासून काश्मिरीपर्यंत प्रत्येक भावना आणि वस्तुनिदर्शक अनेक शब्द विखुरलेले आहेत, त्यांतून वाटेल तो घ्यावा. या लेखांत वर दिलेल्या किंवा अितर शब्दांची व्यक्तिशः अुपपत्ति देणें अप्रस्तुत आणि अशक्य आहे. मूळ धातूपासून प्रस्तुत शब्द व्यवहृत होअीतों तो अनेक रूपांतून आणि अर्थांतून प्रवास करीत असतो हें तज्ज्ञांस सांगणें नकोच. येथें अितका सार्वत्रिक नियम लक्षांत ठेविला म्हणजे पुरे कीं जो शब्द मराठींत आणि अुर्दूंतहि आहे तो अुर्दूचा आहे किंवा पर्शियन भाषेंत आणि हिंदींत ज्यांचीं रूपें समान आहेत ते शब्द पर्शियनच आहेत असा मुळींच नियम नाहीं. अनेक शब्द आपल्या भाषेप्रमाणेंच पर्शियनमध्यें वा अरबींतहि व्यवहृत असले तरी ते केवळ तेवढ्याचसाठीं विदेशीय होत नाहींत. जे शब्द संस्कृत धातूपासून वा

हिंदी धातूंपासून अपभ्रंशाच्या आमच्या व्याकरणांतील सामान्य नियमांप्रमाणें सहजगत्या सिद्ध होऊं शकतात आणि ज्यांचा अुपयोग कोणत्याहि जुन्यांतल्या जुन्या अुपलब्ध हिंदी ग्रंथांतून सांपडतो ते स्वदेशी होत. ही सुटसुटित व्याख्या–अगदीं तुरळक अपवाद सोडून–शब्द आपला कीं दुसऱ्याचा हें ओळखण्यास सर्व्वत्र अुपयोगी पडेल.

## या व्याख्येच्या निष्कर्षानेंच परीक्षून आम्ही बहुतेक शब्द वापरण्याचा प्रयत्न करितों

४७. तथापि ज्या भाषेंतल्या विकृतीपासून तिचें संरक्षण करण्यास आम्ही झटूं अिच्छितों त्याच भाषेनें बाळकडू आम्हांसहि पाजलेलें असल्यानें नकळत किंवा निरुपाय म्हणून कांहीं शब्द आमच्याहि लिखाणांत आलेले आढळावेत हें साहजिकच आहे. परंतु आमच्या भाषेंतहि रोगाचीं कांहीं लक्षणें मधूनमधून प्रकट होतात यावरून तो रोगच हितकारक आहे असें सिद्ध होत नसून अुलट तो अितका हाडीमासीं खिळलेला असल्यानें अितरांनीं आमच्यापेक्षांहि अधिक दक्षतेनें आपआपल्या लिखाणांतून त्याचें अुच्चाटण करावें हेंच सिद्ध होतें. कोणी कोणी आम्ही बॅरिस्टर, सॉलिसिटर अित्यादि शब्द देखील त्याज्य मानतों कीं नाहीं असा प्रश्नहि केलेला आहे. त्यास अुत्तर अितकेंच कीं त्यांनीं तेहि त्याज्य मानून आमच्यावर कडी करावी. त्यांत आम्हांस आनंदच आहे. परंतु सर्व्वसाधारण नियम म्हणून अितकेंच सांगणें योग्य आहे कीं बॅरिस्टर, अेम. अे., बी. अे. अित्यादि अुपाधींचे निदर्शक असले शब्द विशिष्ट नांवांप्रमाणेंच भाषांतरार्ह नाहींत. ज्याप्रमाणें खलिफा, पोप, शंकराचार्य ह्या विशिष्ट नांवांनीं त्या त्या विशिष्ट अधिकाराचा बोध होतो तीच स्थिति या शब्दांची आहे. जेव्हां त्या त्या संस्थाच त्या त्या अुपाधीस स्वदेशी शब्द योजतील तेव्हां, राजसत्तेच्या आधारावर जगत असलेले 'कलेक्टर' आदिक शब्द जसे ती राजसत्ता स्वदेशी होतांचि स्वदेशी रूपांतर पावतील, तसेंच तेहि स्वदेशी पदव्यांचे रूपांत परिणमित होतील. तरीहि तोंवर न थांबतां परदेशी शब्दाचे स्थलीं स्वदेशी योजणें जर अर्थहानि न होतां आजहि शक्य असेल तर तसें अवश्य करावेंच.

मराठींत नवीन अुर्दू शब्द घुसडूं देअूं नयेत आणि अिंग्लिश शब्द मध्येंच कुठें तरी घुसडण्याची बाटगी खोडहि निंद्य आहे, येथपर्यंत ज्यांनीं आमच्या मताला या चर्चेत पुष्टी दिली त्यांच्यापैकींहि कित्येकांनीं त्यापुढची पायरी मात्र आमच्याबरोबर चढण्याचें नाकारून केवळ अितकाच अुपदेश दिला आहे कीं कोणताहि

## अतिरेक त्याज्य असून सुवर्णमध्यमच ग्राह्य आहे

४८. परंतु कोणती पायरी ते आमच्याबरोबर चढूं अिच्छित नाहींत किंवा सुवर्ण

मध्यमाची व्याख्या काय आहे हें मात्र त्यांनीं स्पष्टपणें कुठेंहि व्यक्त केलेलें नाहीं. वास्तविक स्थिति अशी आहे कीं, अतिरेक त्याज्य हें आम्हीहि म्हणत आहोंत आणि सुवर्ण मध्यम ग्राह्य हें वाक्य तर ॲरिस्टॉटलच्याहि फार पूर्वीपासून ज्याचे त्याचे ओंठावर नाचतच आलेलें आहे; पण मुख्य अडचण सुवर्ण मध्यमाची व्याख्या कोणती या प्रश्नाची आहे. जो तो आपआपल्या खोडीचें समर्थन ज्यायोगें होअील त्या मर्यादेस सुवर्ण मध्यम म्हणतो. कोणी "रूढ अुर्दू शब्द राहूं द्यावेत पण अिंग्लिश शब्द मात्र नकोत" यास सुवर्ण मध्यम म्हणतात, तर कोणी "आज वाअिफचें श्राद्ध आहे" या वाक्यासहि सुवर्ण मध्यम म्हणून अनिंद्य समजतो. तेव्हां हा घोटाळा सुवर्ण मध्यमाची शक्य तितकी स्पष्ट रूपरेखा आंखल्या वांचून मोडावयाचा नाहीं, हें अुघड होतें. ज्या भावनेचे आणि वस्तूंचे अुत्तम निदर्शक असे आमचे जुने शब्द होते, वा आहेत, वा आपणांस सहज साधितां येतील, त्या स्थळीं निष्कारण विदेशी शब्द वापरूं नयेत. परंतु विशिष्ट वस्तूंचे विशेष नामाप्रमाणें असणारे किंवा ज्यांतील खोंच वा सुटसुटीतपणा आपल्या भाषांतून व्यक्त करणें अशक्य आहे ते विदेशी शब्द मात्र स्वीकारण्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं, हीच काय ती भाषाशुद्धीच्या सुवर्ण मध्यमाची खरी रूपरेखा होय. यांत भाषेची शक्ति आणि संपत्ति हरण करणारा आकुंचितपणाचा अतिरेक आणि तिचें स्वत्व आणि सत्त्व हरण करून तिला बाटगी बनविणारा आत्मघातकीपणाचा अतिरेक हे दोन्ही सहजच टाळले जातात.

परंतु हें मात्र स्पष्टपणें सांगितलें पाहिजे कीं त्याज्यच असणाऱ्या या दोन्ही अतिरेकांतून जर आम्हांस अेक कोणाचा तरी

## अतिरेक निवडणेंच भाग पडेल तर

४९. त्यांतल्या त्यांत "आज मॉर्निंगला वाअिफला फीव्हर चढला होता तरी तसाच स्टीमरनें फर्स्ट क्लासचें तिकीट काढून बॉंबेला आलो अराअिव्ह होतांच स्टेशनच्या प्लॅटफॉर्मवर थरमामीटर अप्लाय करून बघतों तो टेंपरेचर हंड्रेड अँड टू !" हें वाक्य बोलणाऱ्या बाटग्या अतिरेकापेक्षां "आज सकाळींच कुटुंबाला ताप भरला परंतु तसाच आगनावेनें (अग्निनौकेनें) पहिल्या वर्गाची दर्शिका काढून मुंबअीस आलों. पण अग्न्याच्या चबुतऱ्यावर तापमापन लावतों तों तापमान अेकशेंदोन !" असें म्हणणारा सोंवळा अतिरेकच आम्हांस अधिक अनुकरणीय वाटतो. कारण हा स्वदेशी अतिरेक भाषेचें जीवन फार तर आकुंचित करील, परंतु तो पहिला बाटगा अतिरेक तिचे जीवनाचा घातहि करण्यास सोडणार नाहीं.

## ह्याच वाटचा अतिरेक

५०. सुवर्ण मध्यम, शब्दसंपत्तिवर्धन अित्यादि गोंडस नांवांखालीं छपून समाजांत वावरत राहिल्यानें दहा वर्षांपूर्वी जे परके शब्द नवे वाटत ते आज रूढ होअून गेले आहेत आणि आज जे नवीन वाटत आहेत ते विदेशी शब्द या अतिरेकाकडे अपराधी दुर्लक्ष केलें तर आणखी दहा वर्षांत बरोबर रूढ होतील. आणि मग रूढ शब्द राहूं द्यावे म्हणून म्हणणाऱ्या सद्गृहस्थांस त्यांचाहि कैवार घेअून तदर्थक आणखी कितीतरी आपल्या शब्दांस मरणाचें दारीं बसावें लागेल. आम्हांस देश-निर्वासनाची शिक्षा होअून आम्हीं काळ्या पाण्यावर गेलों तेव्हां क्रिकेट आणि फूटबॉल या खेळांव्यतिरिक्त "आअुट", "रेडी" हे शब्द देशी खेळांत घुसले नव्हते आणि खेड्यापाड्यांत त्यांचा मागमूसहि नव्हता. आतां चवदा वर्षांनीं परत स्वदेशीं येअून पहातों तों कोंकणासारख्या कोनामध्येंहि लहानसहान खेड्यांत, मुलांमुलींच्या घरगुती खेळांत "रेडी", "वन, टू, थ्री", "आअुट" हे शब्द रुळलेले आहेत. आंधळ्या कोशिंबीरी, लपंडाव, शिवाशिवी अित्यादि मुलींच्या खेळांत लहान मुली हेच "रेडी", "आअुट" शब्द प्रत्यहीं वापरतात! पूर्वीचे "सावध", "मारला", "धरला", "पडला", हे शब्द सांगितले तरी वापरणें त्यांस प्रथम कसेंसेंच वाटतें! आणखी दहा वर्षांनीं हे जुने शब्द पार नामशेष झाले म्हणजे त्या खेळांतील "रेडी", "आअुट" शब्दांनाहि रूढ म्हणून–घरांत घुसले म्हणून–राहूं द्या म्हणणारे सुवर्ण मध्यमवादी निघतील आणि कित्येक अितिहासवेत्ते या परदेशी शब्दांच्या त्यांतील अुपयोगावरून हे खेळ देखील विदेशांतूनच आलेले असावेत म्हणून संशोधनपूर्ण निबंध लिहून "दक्षिणा प्राअिझ कमिटी" कडून पारितोषिकेंहि मिळवितील.

## दुकानी पाट्यांवर व नांवाचे पाट्यांवर अिंग्रजी शब्द आणि नांवेंही अिंग्रजी अद्याक्षरांत घालण्याची मूर्ख खोड

५१. ज्या गांवांत वा नगरांत अिंग्रजी लोक वस्तु घेण्यास येण्याचा वा भेटीस येण्याचा मुळींच संभव नसतो तेथेंहि दुकानदार वा घरादिकांवर वस्तूंची वा गृहस्था-दिकांची नांवें अिंग्रजींत लिहून पाट्या लावलेल्या असतात! हेअर कटिंग सलून; क्लाथ मर्चंट; टेलर्स; बुकसेलर्स अँड पब्लिशर्स; टी. व्ही. ढेकणे, प्लीडर, अशा पाट्या खेड्यापाड्यापर्यंत लागलेल्या आढळतात. पाट्या अशा अिंग्रजी शब्दांत लावणें ही अेक टूमच झाली आहे. आतां हा केवळ छचोरपणा नव्हे काय? पाट्या गिऱ्हाअिकें वाढावीं म्हणून लावणें; गिऱ्हाअिकांत हजारांमागें अेकासही त्या शब्दांचा नीट अर्थ कळणार नाही अशा स्थळींहि त्या पाट्या लावून गिऱ्हाअिकें वाढतील काय? त्यापेक्षां

मराठींत "पाटी रंगविणार", "शिंपी", "केस कापणार", विविध, आंत-बाहेर (अिन-आअुट) असे सोपे शब्द लिहून जर पाट्या लावल्या तर अधिक गिऱ्हाअिकांस त्या आकर्षित करणार नाहींत का? परंतु अशा अिंग्रजी अगडबंब शब्दांच्या पाट्या हा अेक दुकानाचा अलंकार आहे किंवा अेक रूढिजन्य संस्कार आहे असें या गांवढळ दुकानदारांस वाटत असावें! काल अभिप्रायान्थ कोंकणांतील अेका तालुक्याच्या गांवांतून केशतैलाची कुपी आली. तीवर मराठी अक्षरांतच पण "हेअर-आअील" म्हणून छापील कागद चिकटविला होता!

परंतु अेवढी हास्यास्पदता पुरेशी न वाटूनच कीं काय हे दुकानदार त्या पाट्यांवर आपलीं नांवेंही अिंग्रजी अद्याक्षरांतच देत असतात! "आर्. अेम्. बुडबे", डब्ल्यू. अेच्. रडतोंडे"!! बुडबे आणि रडतोंडे यांना जरी ही अिंग्रजी अद्याक्षरांतील स्वकीय नांवें विसंगत वाटलीं नाहींत तरी कोणत्याही स्वाभिमानी महाराष्ट्रीयास तीं तशीं वाटतील यांत शंका नाहीं. प्रशाळेंतील (हायस्कुलांतील) मुलेंही "अेर अेस. व्ही." "अेर अेम. जी." अशा अिंग्रजी अद्याक्षरांत अेकमेकांस हांका मारतांना अैकूं येतात आणि त्यांस त्यांचे शिक्षक वा पालक कोणीहि हंसत नाहींत वा दाबीत नाहींत. पण जर अेखाद्या स्वाभिमानी विद्यार्थ्यानें वर्गांत अनावश्यक अिंग्रजी वा अुर्दू शब्द बोलण्याचें टाळलें तर त्यास अतिरेकी म्हणून शिक्षकसुद्धां हंसतांना वा अेक प्रकारच्या कंटाळ्यानें त्याकडे बघतांना आढळून येतात! अद्याक्षरांतच हांक मारणें वा लिहिणें तर "स. म. काळे", "वि. ग. जोशी" असे प्रयोग नाहीं का करतां येणार? परंतु शेळपट परधार्जिणेपणा हाच ज्या तेजोहीन पिढींत अुदारपणा म्हणून पूजिला जातो आणि योग्य स्वाभिमानहि अनुदारपणासारखा भासतो त्या पिढींत आपलीं नांवें आपल्याच अद्याक्षरांत लिहूं वा संबोधूं अितका देखील बाणेदारपणा कुठून सांपडणार! कोण्या अिंग्लिशानें कधीं आपलें 'जान स्टुअर्ट मिल', हें नांव 'जा. स्टु. मिल' असें लिहिलेलें आढळतें का?

## प्रत्यहीं नवीन विदेशी शब्दांस आंत घेणारा अजागळपणा

५२. हाच अजागळपणा आतां या क्षणीं अनेक अुर्दू, आणि अिंग्रजी शब्दांस मराठीच्या मंदिरांत न कळत चोरासारखें घुसूं देत आहे. मुंबअीच्या कांहीं कादंबऱ्या-मागें "सेन्सेशनल" हा शब्द लावण्यांत येतो. अजूनहि सेन्सेशन कशाशीं खायची हेंहि सहस्रांत अेकास माहीत नाहीं. थोडक्याच दिवसांत विशिष्ट प्रकारच्या कादंबऱ्या-मागें हा शब्द नेहमीं पाहून त्या शब्दासरशीं तो विशिष्ट प्रकार संबोधित होअूं लागेल आणि मग शिक्षितांत सेन्सेशनल हा शब्द अगदीं तोंडीं बसेल. सुशिक्षित

रंगोपंतांच्या तोंडून "आण रे ती सेन्सेशनल कादंबरी" ही आज्ञा ऐकितां ऐकितां बाळ्या आणि बबी आणि गृहलक्ष्मी आणि गडीहि तो शब्द शिकतील. आणखी दहा वर्षांत घरोंदारी सेन्सेशनल हा शब्द रूढ होऊन जाअील. 'अिलेक्शन मॅनिफेस्टो' यांचीहि गति वेळेवर न रोधिल्यास अशीच होणारी आहे. आमच्या समोर हें अेक चित्रमयजगत्चें रद्दी अंकाचें चिठोरें पडलेलें आहे त्यांत अेक कवी "भवानी तरवारीस शाहीराचा शाहिरी मुजरा" करितां करितां म्हणतात : "तुझ्यावरी कितिक मन्दांचें नाचलें थुर तकदीर!" त्या मन्दांचें 'तकदीर' नाचलें तें नाचलें पण आमचें कविवर्यांना हात जोडून सांगणें आहे कीं आतां यापुढें निदान बिचाऱ्या मराठीचें 'तकदीर' तरी असें तरवारीच्या धारेवर धरूं नये. हा तकदीर शब्द साधारण मराठी बोलणाऱ्या सहस्रामागें दहांस तरी कळतो आहे का? दैव, कर्म, भाग्य अशीं अनेक विविधार्थसूचक नांवें स्वदेशी असतां तदर्थक हा विदेशी निब्रट शब्द आपल्या कोमल कवितेच्या डोकांडी बसविल्यानें लवलेश तरी कांहीं शोभा आली आहे का? पण कोणता तरी मुसलमानी शब्द कुठून तरी चोरूनमारून आणून जर कवितेंत दडपला नाहीं तर मग कसली ती "शाहिरी" कविता आणि कसला तो "शाहिराचा शाहिरी मुजरा"!! परंतु,

**'स्वदेशी नवीन शब्द रूढ होणें महा कठीण आहे!' म्हणून हेच लोक म्हणतात**

५३. आश्चर्याची गोष्ट ही कीं तकदीर, दिल, सेन्सेशन अित्यादी आमच्या भाषेच्या प्रकृतीशीं विसंवादी असणारे परकी शब्द तींत निष्कारण घुसडले जात असतां त्या विरुद्ध मात्र 'हे कानाला कसेसेच लागतात!' 'ही नवी ब्याद कशास आणली!' अशी ओरड कोणीहि सुवर्ण मध्यमाचा अभिमानी करीत नाहीं. परंतु नवीन कल्पना दर्शविण्यास अेखादा संस्कृत शब्द कोणी योजला किंवा रूढ विदेशी शब्दाचे स्थानीं अुपयोजिला कीं "हा नवीन शब्द कसला रूढ होतो! हा आशावादीपणाचा अतिरेक आहे! ही नसती ब्याद कशाला आणली!" अशा अनेक प्रकारच्या चिंतेनें त्याच मंडळींचीं तोंडे अगदीं अुतरून जातात. परंतु जर ते पूर्वींचे हॉस्पिटल, म्युनिसीपालिटी असले जड शब्द वा रेडी, आअुट अित्यादि आतां आतां घुसत असणारे शब्द परकी असतांहि आपल्या अशिक्षित समाजपर्यंतहि कसे परिचित होत गेले हें पाहतील तर त्यांस सहज आढळेल कीं विदेशी शब्दांचे ठायीं नवे स्वदेशी शब्दहि आम्ही निर्धार करून योजूं लागलों तर त्याच परंपरेनें बोलतां बोलतां ते रूढ होतील. विदेशी अपरिचित शब्द जर अगदीं शेतकऱ्यांपर्यंत रूढ होअू शकतात, तर स्वदेशी आणि म्हणूनच सापेक्षतः मुळांतच किंचित् तरी परिचित असणारे शब्द प्रयत्न केला

तर रूढ झालेच पाहिजेत. विदेशी रूढ शब्दांस त्यांनीं अगदीं हांकलून लावलें नाहीं तरी निदान त्यांच्या जोडीनें तरी ते नांदूं शकून विदेशी शब्दांचें प्रतिस्पर्धी स्वामित्व तरी चालूं देणार नाहींत.

## विष्णु शास्त्री अुर्दू शब्दांविरुद्ध कां नव्हते ?

५४. कोणी कोणी आम्हांस असें आडवूं पहातात कीं विष्णुशास्त्री यांनीं वर्गीदारीं अिंग्रजी भाषेचा वा शब्दांचा अुपयोग करण्या विरुद्ध लिहिलें आहे हें जरी खरें आहे तरी त्यांनीं अुर्दू विरुद्ध कांहीं फारसें लिहिलें नाहीं. त्यांस आमचें असें अुत्तर आहे कीं अुर्दूची घातक मगरमिठी सर्व हिंदु भाषांसह मराठीसहि बसण्याची वेळ येअील आणि अुर्दूसच राष्ट्रभाषा करा असा दुराग्रह अुघडपणें धरण्याअितकी मुसलमानी महत्त्वाकांक्षा चढेल होअील हें शास्त्रीबुवांचे काळीं कोणाच्या फारसें लक्षांत येण्यासारखें नव्हतें. जे अुर्दू शब्द घुसले ते घुसले आतां राजसत्ता बदलल्यानें तो पेंच सुटला आहे म्हणून अुर्दूकडे दुर्लक्ष केलें तरी चालेल; परंतु जिचा पगडा राजसत्तेच्या आधारानें मराठीवर संपूर्णपणें बसण्याची भीति अुत्पन्न होत आहे त्या अिंग्रजी भाषेच्या गुप्त आक्रमणाकडे मात्र कडक लक्ष दिलें पाहिजे, असें त्यांस सहाजिकपणेंच वाटलें. विष्णुशास्त्र्यांच्या परिस्थितींत त्यांनीं जें म्हटलें तें नवीन परिस्थितिलाहि लागू करणें किंवा त्यास त्रिकाल सत्य मानणें ब्राह्म वाक्यं प्रमाणवत् होअील ! मोरोपंतांस संस्कृत ज्ञान अेखाद्या पुराणिकाअितकेंच साधारपणें होतें, असें तत्कालिन संशोधनाच्या प्रगतीप्रमाणें शास्त्री बुवांनीं सहजच विधान केलें. परंतु आतापर्यंत प्रसिद्ध झालेल्या ग्रंथसंपत्तीवरून संस्कृतावर प्रभुत्व गाजविण्याअितके मोरोपंत संस्कृतांतहि व्युत्पन्न होते असें दिसून आलें असतांहि, शास्त्रीबोवांच्या विधानासच चिकटून बसणें जशी चूक होअील–तशीच, त्यांच्या अुर्दूविषयक मतांचीहि गोष्ट आहे. आज जर ते स्वतः जिवंत असते तर त्यांच्या स्वाभिमानी स्वभावावरून पहातां सद्यःपरिस्थितींत त्यांनी परकी शब्द घालविण्याच्या या चळवळीचाच पुरस्कार केला असता हें अधिक संभवनीय वाटतें. आणखी शेवटचें अुत्तर आहेच कीं जरी विष्णुशास्त्र्यांस अुर्दू शब्द बहिष्कृत वाटले नाहींत तरी ते स्वतः शिवाजीमहाराजांस वाटले होते. शब्दप्रमाणावरच अवलंबून रहावयाचें असलें तरीहि भाषाशुद्धीकरणास स्वयमेव छत्रपतींच्या राजाज्ञेचाच आधार आहे !

## आम्हांस तरी परिस्थितीनेंच अुर्दू शब्द बहिष्कार्य करणें भाग पडलें

५५. शास्त्रीबोवांची गोष्ट तर दूरच परंतु आम्ही कारागृहांत जाअीतोंपर्यंत आम्हांसहि अुर्दू शब्दांचें कुठें वावडें होतें ! अिंग्रजी शब्द आम्ही टाळू परंतु अुर्दू

शब्द अगदीं खड्यासारखा निवडून काढण्याची तीव्र प्रवृत्ति तेव्हां नसल्यानें आमच्या यौवनकालीन ग्रंथांत आणि कवितांत, आम्हां आज त्याज्य मनीत आहेत ते शब्द, आम्हीं निःसंकोचपणें वापरलेले आहेत. परंतु बंगालसारख्या प्रांतांत, कीं जेथें मुसलमानांच्या घरांतही अुर्दू कोणास बहुधा समजत नाहीं तेथेंहि, जेव्हां मुसलमानांनीं अरेबीबहुल अुर्दूच बोलावी म्हणून चळवळ सुरू केली; अितकेंच नव्हे तर हिंदूंस अुर्दू भाषा आणि पर्शियन लिपी देखील हिंदुस्थानची राष्ट्रीय भाषा आणि लिपी मानण्यास भाग पाडूं म्हणून हजारों मुसलमानांच्या प्रतिज्ञा होअूं लागल्या. आणि अेका बाजूनें अलीगढाहून अुठलेली अुत्तरीय लाट यांच्या पकडींत मराठींसहि अुर्दुची आज नाहीं अुद्यां मगरमिठी पडणार अशी धास्ती वाटूं लागली तेव्हां आम्हांसहि अुर्दू शब्दांस बहिष्कार्य समजण्याची प्रवृत्ती महाराष्ट्रांत बळावावी म्हणून, प्रयत्न करणें भाग पडलें. आमची सर्व मराठी लेखकांस विनंती आहे कीं आम्हीं आजपर्यंत अुर्दू शब्द कधीं कधीं वापरलें म्हणून पुढेंही वापरूं असा दुराग्रह न धरतां ज्याप्रमाणें गेल्या आठदहा वर्षांत भाषेच्या कल्याणार्थ त्यांस वापरीनासें झालों त्याचप्रमाणें, त्यांनींहि पूर्वीं चुकी झाली म्हणून पुढेंहि ती करण्याचा किंवा अुर्दू शब्द वापरणें ही चूकच नाहीं म्हणून म्हणण्याचा दुराग्रह सोडावा यांतच मराठी भाषेचें हित आहे.

## मराठीवर अुर्दूचें संकट आलेलेंच नाहीं असें म्हणणारे

५६. टीकाकारहि दुर्दैवानें आम्हांस भेटले आहेत. त्यांपैकीं अेकानें तर अगदीं अखंडनीय म्हणून अेक अुदाहरण दिलें आहे कीं, अहो कोंकणांत पहा! मुसलमानास पर्शियन शब्द देखील येत नाहीं — मराठी बोलतात — मग त्यांस अुर्दूचा अभिमान तो कुठून असणार! या आक्षेपकांचे डोळ्यांत परस्पर कोंकणी मुसलमानांनींच अेक झणझणीत अंजन गेल्याच वर्षी घातलें हें महाराष्ट्रीयांनीं ध्यानांत धरावें. कोंकणी मुसलमानांची अेक मोठी शिक्षण परिषद रत्नागिरीस झाली. त्या परिषदेचे अध्यक्ष अेक मोठे सरकारी अधिकारी होते. त्या मुसलमान अधिकाऱ्यांच्या आणि अितर वक्त्यांच्या भाषणांत असें स्पष्ट सांगण्यांत आलें कीं, "कोंकणी मुसलमानांस जी आपली जन्म-भाषा नाहीं ती आपल्या घरादारांतून बोलण्याची लाज वाटावयास पाहिजे!" ही लज्जास्पद स्थिति टाळण्यासाठीं शेंकडों रुपयांचा निधी अुभारून ठिकठिकाणीं अुर्दू शाळा काढण्यांत येणार आहेत. सध्यांहि कोंकणांत अुर्दू शाळा भराभर वाढत असून त्यांना शिक्षक पुरविण्यासाठीं शिक्षक-शाळाहि निघाल्या आहेत. त्यांस सरकारी कोशांतून अनेक शिष्यवृत्त्या सढळ हातानें मिळतात. जर कोंकणाची ही स्थिति तर महाराष्ट्रांतील अितर प्रगतिपर मध्यप्रांतांची काय स्थिति असेल तें सांगणें नकोच. आज नाहीं अुद्यां अुत्तरेची मुसलमानी भाषाच राष्ट्रभाषा करण्याची ही दुराग्रही लाट

महाराष्ट्रांतहि सर्वत्र पसरून सहस्रों मुसलमान अुर्दूस डोक्यावर घेअून आपल्या स्वत्याच्या मातृभाषेच्या छातीवर नाचण्यास कमी करणार नाहींत ! त्यांच्या सहवासांत मराठीमध्यें–जर वेळींच आपण तिच्या द्वारावर अेव्हांपासून कडक पहारा ठेवला नाहीं तर – अुर्दू शब्दांचा धुडगुस सुरू होअून तिलाहि सिंधी पंजाबीप्रमाणें स्वत्वहीन होअून जावें लागेल ! नाहीं म्हणणारांनी ध्यानांत धरावें कीं सिंधी पंजाबी वाङ्मयेंहि अेका काळीं मराठीप्रमाणेंच शुद्ध होतीं आणि ज्या मुसलमानी चळवळींनें आणि हिंदूंच्या भावड्या "चाल दे रे" म्हणणाऱ्या ढिलाअीनें त्या स्वत्व गमावून बसल्या तीच मुसलमानी चळवळ महाराष्ट्रांत सुरू झाल्याविना रहात नाहीं जें संकट दहा वर्षांनीं सर्वांसच दिसणार आहे तें आज आम्ही दृष्टोत्पत्तीस आणतों आहोंत अितर्केच. म्हणून अेव्हांपासूनच सावध होअुन मराठीस शुद्ध राखण्याचा अटोकाट प्रयत्न करणें हाच शाहाणपणा आहे.

### "अहो ! भाषा भाषेस बळी पडणें ही नियतीच आहे !"

५७. असेंहि अेका तत्त्वज्ञानें आम्हांस अुपदेशिलें आहे. आजर्ना भाषा अुद्यां नाहींशी होणार किंवा रूपांतर घेअून कोण्या अन्य जीवनांत जीवमान रहाणार हा सृष्टिनियम आहे. तीच स्थिति शब्दांची ! त्या तत्त्वज्ञांचें हें म्हणणें तर खरेंच आहे. तथापि हा सृष्टिनियम घरेंदारें, गोपुरें ह्यांसहि लागतो. नाहीं काय ? पण म्हणून घराला पडलेलीं भगदाडें कोणीं बुजवूं नयेत कीं काय ? भाषाच काय पण माणूसहि अुद्यां मरतो–मग तो तत्त्वज्ञ कां असेना ! –पण तरीहि रोगांवर औषधोपचार करण्यास तत्त्वज्ञ देखील धडपडतच असतात; पौष्टिकें घेतांना देखील आढळतात ! त्या व्यतिरिक्त भाषा काय किंवा हें अुभें जगत् काय, प्रत्येक सावयव वस्तु अेक दिवस रूपांतर वा विनाश पावणारच हा जसा सृष्टिनियम आहे तसाच, आपलें अस्तित्व शक्य तोंवर अक्षुण्ण राखण्यासाठी आणि स्वत्व शुद्ध ठेवण्यासाठी विनाशी शक्तीशीं सारखी झटापट करीत राहणें हाहि, त्या प्रत्येक सावयव वस्तूचा स्वभाव सृष्टिनियमच नव्हे काय ?

### जें जें विदेशीय अनुकरण लोकहितवर्धक असेल तें मात्र त्याज्य नाही

५८. आम्ही विदेशी शब्द निष्कारण घेअुं नयेत म्हणून जरी म्हणत असलों तरी त्यामुळें विदेशी भाषांतील सुरेख वाक्प्रचार, वा अुदात्त कल्पना वा अगाध ज्ञान हीं आम्ही त्याज्यच समजतों असें मानणें म्हणजे वस्तुस्थितीचा विपर्यास करणें होय. असा विपर्यास करणारे स्वतःसच हास्यास्पद करून घेतात. जें जें अुत्तम, अनुकरणीय आणि लोकहितवर्धक असेल तें तें आपण कोणापासूनहि शिकावें–

अनुकरावें. बालादपि सुभाषितं ग्राह्यम्! यांत मानापमानाचा मुळींच प्रश्न नाहीं. आणि तो प्रश्न जरी जमेस धरिला तरीहि आजपर्यंत अुभ्या मनुज जातीस ह्या भारतवर्षानें भौतिक वा तात्त्विक ज्ञान किंवा कला यांचें जीवनद ऋण अितकें दिलेलें आहे कीं तें, त्याच भांडवलावर त्यांनी थाटलेल्या त्यांच्या आजच्या दुकानांतून आम्हीं कितीहि सामानाची अुचल केली तरी, सहसा फिटणारें नाहीं.

## म्हणून स्वस्थ बसूं नका

५९. आतां या विषयावरील चर्चेचा हा समारोप पुरा करतां करतां पुन्हां अेक वेळ अितकीच विनंति करावयाची आहे कीं, रूढ विदेशी शब्द काढणें वा नवीन स्वकीय रूढ करणें कठीण आहे अशी आधीच समजूत करून घेअून स्वस्थ बसूं नका. हुतात्मा हा शब्द अेका वर्षाचे आंत मार्टिअर या अिंग्रजी शब्दाचे अर्थी प्रचलित नसला तरी परिचित झाला नाहीं काय? तीच स्थिती क्रमांक=नंबर, निश्चित=खात्री, स्तंभ=कॉलम या आणि अितर शब्दांची आहे.

## प्रयोग करीत गेलें म्हणजे आपोआप लेखांतून शिक्षितांत नि शिक्षितांतून अशिक्षितांत हे शब्द पाझरत जातील

केवळ कांहीं मंडळींनीं निश्चय केला पाहिजे. शिक्षक वर्गानेंहि या शब्दांची शेवटी जोडलेली टिपणी किंवा टांचण (याद्दी नव्हे)! आपल्या विद्यार्थ्यांकडून अुतरवून घेअून नेहमीं समोर ठेवावें. जुन्या लेखकांस हें जड जाअील पण नवीन पिढीला हे शब्द सहज तोंडी बसतात. भाषेमध्यें अुर्दू वा अिंग्रजी शब्द घालणें अुपहासास्पद आणि निंद्य आहे, ही सामाजिक भावना तीव्रपणें अेकदां अुत्पन्न केली कीं कार्य झालें.

## लेखकवृन्द नि शिक्षकवर्ग

६०. ही भावना अुत्पन्न करण्याचा प्रयत्न करणारांस सर्व मराठी लेखकवृन्द आणि शिक्षकवर्ग साहाय्य करील, आणि श्रीशिवछत्रपतींचें आणि विष्णुशास्त्र्यांचें हें अेक व्रत तरी नेटानें पुढे चालवील ही आमची निश्चिति आहे. अितकेंच नव्हे तर अशा प्रयत्नांस यश येअून, मराठींत व्यर्थ शिरलेल्या अुर्दू आणि अिंग्रजी शब्दांचें प्रमाण कमी होअून आणि हिंदु भाषांत शुद्ध स्वकीय शब्दांचा भरणा जसजसा वाढेल तसतसे, आज जे या प्रयत्नांकडे साशंक वा सविरोध पाहत आहेत ते देखील आनंदित होतील. कारण अर्थहानि न होतां सुंदर स्वकीय शब्दांनीं हिंदु भाषा परिपुष्ट,

परिमार्जित आणि परिवर्धित होत असतां कोणा भाषेच्या अभिमान्यास आनंद झाल्याविना राहील ? कोणा हिंदूचें हृदय अुल्हास पावल्याविना राहूं शकेल ?

आतां असा सतत परिश्रम केल्यानंतरहि कांहीं कांहीं राजकीय आणि शास्त्रीय परकीय शब्दहि राहतीलच. त्यांतील राजकीय शब्द जसे जिल्हा, कलेक्टर, गव्हर्नर, अित्यादि–

## ते ती सत्ता जशी जशी स्वकीयत्व पावेल तसे तसे सहजच पालटतील

६१. तथापि हे नवीन शब्द, राजकीय लिखाणांतील कां होअीना, रूढ करितांना त्यांस शुद्ध आणि सुटसुटीत स्वकीय प्रतिशब्द प्रथमपासूनच योजण्याचा प्रघात पाडीत असावें. हिंदींत तसेंच करितात. म्हणजे कायदेकौन्सिल किंवा जवरीसंभोग यांसारखे विद्रूप शब्द निपजावयाचेच नाहींत. भाषेमध्यें थोडे शब्द परभाषेंतील असणें ही गोष्ट निराळी आणि त्यांची स्वकीय शब्द मारून टाकणारी नारायणरावांच्या गाऱ्यांसारखी प्राणघातक अरेरावी चालूं देणें वा परकीय शब्द घेण्यांत कांहीं हानि वा दुर्बलता नसून तें अेक जसें कांहीं भूषणच आहे अशी विकृत समजूत करून घेणें निराळें.

## या चर्चेंत भाग घेणाऱ्यांचे आभार मानून निरोप घेतों

६२. शेवटीं अुर्दू, अिंग्रजी अित्यादि परकी शब्दांकडे त्याज्य दृष्टीनें पाहण्याची प्रवृत्ति अुत्पन्न करण्याचा जो लेखकाचा मूळ हेतु तो, या विषयासंबंधीं सबंध महाराष्ट्र लेखकवर्गांतच नव्हे, तर शाळांतील विद्यार्थ्यांपर्यंत जी खळबळ अुडाली आहे, आणि प्रशाळेत (हायस्कुलांत) या विषयावर परीक्षेस निबंधहि ठेवल्याचीं जीं अुदाहरणें घडत आहेत त्यायोगें, बराच सिद्धीस गेला हें पाहून आम्हांस वाटत असलेलें समाधान व्यक्त करून आणि ज्या विद्वान गृहस्थांनीं या चर्चेंत अनुकूल वा प्रतिकूल पक्षीं भाग घेतला त्यांनीं नि लोकांविषयीं जो आदरभाव व्यक्त केला तदर्थ त्यांचे सर्वांचे मनःपूर्वक आभार मानून, आम्ही मराठी शुद्धीकरणाची ही लेखमाला पुरी करितों आणि या कार्याचा परामर्ष घेणें न घेणें आतां महाराष्ट्राच्या स्वाभिमानावर सोडून या विषयाचा निरोप घेतों.

---

*येथपर्यंतचा भाग हा* '**मराठी भाषेचें शुद्धीकरण**' *ह्या नांवाच्या खिस्ताब्द १९२६ (अेकोणीससे सव्वीस) मध्ये प्रसिद्ध झालेल्या वीर सावरकर लिखित पुस्तकांत प्रसिद्ध झालेला आहे. ह्यापूर्वीच अेक दोन वर्षें हा भाग 'केसरी' मध्येहि पूर्वार्ध नि अुत्तरार्ध अशा लेखमालेंत प्रसिद्ध करण्यांत आला होता. ह्या पुस्तकाचा पूर्वार्ध येथें संपतो.* प्रकाशक

## कायदे कौन्सिलांतील अिलेक्शनच्या कँडिडेटांचे मॅनिफेस्टोज् !

वरील लेखाच्या मथळ्याचें वाक्य लिहितां लिहितां आमच्या लेखणीला आणि वाचतां वाचतां आमच्या वाचकांना दचकल्यासारखें झालें असेल यांत शंका नाहीं. कायदे कौन्सिलांतील अुमेदवारांच्या मॅनिफेस्टोज्‌विषयीं लिहिण्याचें धाडस सावरकर करतात तरी कसे ! राजकारणांत पडावयाचें नाहीं म्हणून ह्यांचेवर असलेले सरकारी बंधन ते राजकारणाच्या पूर्वप्रीतीच्या अुत्कंठतेमुळें अेकाअेकीं विसरलें कीं काय ?

तें बंधन आम्हीं विसरलों नसलों तरी या शब्दांशीं जन्मभर आमचा अितका दाट परिचय झालेला आहे कीं ते आतां घरांत, दारांत बोलांतून आणि मान्यावरून खेडेगांवांत आणि नगरांत जिथें रहावें तिथें लोकांच्या ओठावर अुभे राहिलेले दिसत असतां आम्हीं मात्र त्यांच्याशीं न बोलतां अनोळख्यासारखें तोंड लपवून निघून जावें हें आम्हांस अगदीं दुस्सह होत आहे. परवां अगदीं टाळाटाळीं करून त्यांची भेट घ्यावयाचीच नाहीं म्हणून खोलींत कोंडून घेतलें आणि वर्तमानपत्रेंदेखील वाचावयाचीं नाहींत म्हणून टपाल येतांच केवळ घरगुती पत्रें तेवढींच अुघडलीं. अकस्मात् अेका पाकिटांत अेका छापलेल्या तुकड्यावर पहातों तों पुन्हां आपला श्रीयुत मॅनिफेस्टो फडकला ! तेव्हां मात्र आमचें मन अगदीं ओशाळें झालें. ज्या राजकीय शब्दावरील आमच्या प्रेमासाठीं आम्हीं त्या पोन्टब्लेअरच्या भस्मासुराचे दर्शनासाठीं सुद्धां वाऱ्या केल्या त्या ह्या आमच्या परिचित शब्दांशीं ते अगदीं आमच्या घरीं येअून खोलींत हात जोडून अुभे राहिले तरी न बोलणें केवळ निर्लज्जपणा आहे असें वाटून आम्हीं त्या सर्वांशीं मनमोकळेपणें बोलण्याचे ठरविलें आणि म्हटलें "या कौन्सिल, कायदेकौन्सिल, अिलेक्शन कॅन्डिडेट, मॅनिफेस्टो ! तुम्हीं सर्व या, तुमच्याशीं आणि तुमच्याविषयीं कांहीं तरी बोलल्यावांचून आम्हांस आतां मुळींच रहावत नाहीं मग त्यापायीं आमची शेंडी तुटो वा पारंबी तुटो" !

हें आमचें म्हणणें अैकतांच ते सर्व शब्द कळकळीनें म्हणाले कीं पोन्टब्लेअरच्या भस्मासुराचा वरदहस्त आपल्या मस्तकास लागतांच आपल्या डोक्याचे केस पुष्कळ अंशीं गळून गेल्यानें यद्यपि आपली शेंडी तुटण्याचें भय मूळांतच कमी झालेलें आहे,

---

*वीर सावरकर यांचा हा विनोदी लेख 'रणगर्जना' ह्या नियतकालिकांत दि. २१–११–१९२६ ला प्रसिद्ध झाला होता. त्यावेळीं ते रत्नागिरी येथे स्थानबद्ध होते आणि राजकारणाशीं कोणताहि संबंध न ठेवण्याचें त्यांचेवर बंधन होतें.* — प्रकाशक

तथापि ज्या जीवनाच्या क्षीण पारंबीस आपण अजून लोंबकळत राहिलों आहों ती आम्हां राजकीय शब्दांशीं बोलण्यामुळें तुटण्याचें भय मात्र आम्हांस वाटतें खरें. म्हणून तुम्हीं आम्हां शब्दांची ओळख न दाखवितां आमच्याविषयीं कांहींहि न बोललेत तरी चालेल !" हें त्यांचें अुदार बोलणे अैकून आम्हांस त्यांच्याशीं अधिकच बोलावेंसें वाटूं लागून आम्हीं म्हणालों, "तुमच्या या औदार्याविषयीं आम्हीं आभारी आहों. परंतु पूर्वपरिचयामुळें तुम्ही नाहीं म्हटलें तरी तुमच्या प्रकरणीं कांहीं तरी बोलल्यावांचून आम्हांस रहावत नाहीं. सर्व हिंदुस्थान अिलेक्शनमध्यें दंग असतां या कायदेकौन्सिलच्या अिलेक्शनशीं मी अगदींच संबंध ठेवूं नये हें अशक्य आहे. मी कसातरी पण कायदेकौन्सिलांच्या निवडणुकींत भाग घेणार. भिअूं नका. अशा बिकट पेंचांतून कसें सुटावें याची गुरुकिल्ली अेका संन्याशीबाबांनीं आम्हांस अंदमानांत असतां दिली आहे."

हें संन्याशी बाबा जन्माचे चोर होते. जातीचे दरवडेखोर. परंतु पुढें अेका साधूच्या तावडींत सांपडून त्यांनीं चोरी सोडण्याची प्रतिज्ञा केली आणि त्या साधुमंडळीनें त्यांस संन्यास देअून आपल्या देखरेखींत ठेवलें. तें साधुमंडळहि स्वकार्यसाधुत्वाच्या अुलाढाली करीत भटकतच असे. परंतु कमींत कमी आपसांत कोणी चोरी करूं नये या विषयीं अगदीं कटाक्ष ठेवी. त्यांच्या टोळींत आल्यापासून संन्यासी बाबांस चोरी करण्याची अगदींच चोरी झाली. कारण जरी टोळींत चोरी केली तरी तें द्रव्य चुकवून ठेवावयाचें कोठें ! त्या टोळींत स्वतःची अशी लूट नसे; सर्व जें गवसेल तें टोळीचें अशा पेंचांत संन्यासी बाबा असतांना शेवटीं ते अगदींच त्रासून गेले. तेव्हां लोभाकरितां न का होअीना पण केवळ चोरीची हौस पुरविण्यापुरती तरी चोरी करावी असा निश्चय करून, रात्रीं सर्व साधु झोपीं गेल्यावर ते गुपचुप अुठत आणि याचा लोटा अुचलून त्याच्या पायापाशीं, त्याची छाटी चोरून याच्या झोळींत, याच्या झोळींतील लंगोटा त्याच्या अुशाशीं असा अुचलठेवीचा कारभार करून पुनः झोपीं जात. सकाळीं अुठतांच साधु लोकांत अेकच आरोळी अुठे, चोरी चोरी! जो तो दुसऱ्यापाशीं आपली वस्तु सांडतांच त्यास चोर म्हणून शिव्या हांसडी. या प्रकाराचा अुगम काय, हें शोधण्यासाठीं शेवटीं त्यांच्यातला अेक साधु रात्रभर गुप्तपणें जागत राहिला. पहातो तों ही संन्याशीबोवांची स्वारी अुठून आपल्या अुचलेपणाच्या व्यवसायांत दंग झाली ! तेव्हां अर्थातच चोर चोर म्हणून त्या जागरूक साधूनें ओरड करताच सर्वजण जागे झाले आणि संन्याशाला धरलें. विचारलें 'तूं चोरी कां करतोस्', तेव्हां तो म्हणाला, "केवळ हौशीसाठीं! मी कांहीं तुमचें सामान स्वतः दाबून टाकतों कां? अिकडचें सामान तिकडे करणें ही कांहीं चोरी नव्हे.

अपहार न करतां माझी चोरी न करण्याची प्रतिज्ञा आणि चोरी करण्याची हौस दोन्ही जर मी पुरवीत आहे तर त्याविषयीं मजवर रागावणें हें तुम्हांसारख्या काव्य-साधू साधूंना तरी कांहीं शोभत नाहीं. कारण त्यांत तुमचें काव्य मुळींच बिघडत नाहीं." हें अुत्तर अैकून काव्यसाधू लोक हंसले आणि त्याला तेवढी निरुपद्रवी अुठाठेव करूं द्यावी म्हणून म्हणाले.

कायदेकौन्सिल, अिलेक्शन, क्यान्डिडेट, मॅनिफेस्टो, व्होट अित्यादि वस्तूंशीं आम्हीं कांहींहि संबंध ठेवूं नये म्हणून निर्बंध आम्हांस घातलेला असला तरी वरील सारख्या कोणत्या तरी युक्तीनें आम्हीं कायदेकौन्सिलच्या येत्या निवडणुकींत भाग घेण्यास सोडणार नाहीं. त्या वस्तूंची नाहीं तरी त्या शब्दांच्याविषयीं आम्हीं कांहींतरी बोलण्याची हौस पुरवून घेणार. तुम्हीं चिंता करूं नका. या, तुमच्या विचाराचे वतीनें कोण कोण प्रतिनिधी अुभे आहेत ते सर्व या, आम्ही तुमचे गुण अैकून तुमच्या निवडणुकींत मतदारांनीं कोणास मतें द्यावीं तें निश्चित करून लोकांस तसें करण्या-विषयीं प्रबळ अनुरोध (म्हणजे जबरदस्त शिफारस) करूं.

हें अैकतांच अेक अगदीं अनोळखी परंतु धीट शब्द पुढें झाला आणि म्हणाला, माझें नांव मॅनिफेस्टो. हिंदुस्थानांत लाखामागें अेका देखील मनुष्याचा आणि माझा अजून परिचय नाहीं, परंतु मी सरकारी वतीचा क्यांडिडेट म्हणून अुभा असल्यानें लोकांनी मलाच निवडून द्यावें. थोर थोर पुढारी माझ्या वतीनें मतें मिळविण्यासाठीं आटोकाट प्रयत्न करीत आहेत. या पिढींत मी संभावित संपादकांच्या घरीं दारीं परिचित होअीन. दुसऱ्या पिढींत मी प्रत्येकाच्या ओठीं तोंडीं खिळून बसेन. आणि तिसऱ्या पिढींत माझेकडे लोकमत अितके झुकेल कीं जरी अेखादा हलकट वेडा पीर लोकांस म्हणाला कीं अहो हा म्यानिफेस्टो सरकारी वतीचा परकी मनुष्य आहे, यास मतें देअूं नका. तर प्रत्येक अस्सल देशभक्त मनुष्य म्हणूं लागेल, 'वा ! कोण हा स्वाभिमानाचा अतिरेक ! हा बिचारा म्यानिफेस्टो आमच्या ओठींतोंडीं अगदीं खिळून गेलेला, आमच्या भाषागृहांत अगदीं देवघरापर्यंत तीन पिढ्या वावरत असलेला शब्द, आणि याला म्हणे वापरूं नका ! आमच्या घरची शब्दसंपत्ति वाढविण्याचें काम यानें केलें ! आम्ही यासच मतें देणार !'

हें वाक्य तो बोलत आहे तोंच दुसरा अेक हिंदु वेषांतील शब्द पुढें झाला. त्याचा तोंडवळा अगदीं परिचयाचा दिसला. तो म्हणाला, माझें नांव निवेदन. ज्या विचाराकरितां म्यानिफेस्टो प्रतिनिधी होअूं पहात आहे. त्याच जागेसाठीं मीहि अुभा आहे. मलाच लोकांनीं कां मतें द्यावींत, तें माझ्यापेक्षां म्यानिफेस्टोनें जीं कारणें

आपलें समन्थनाऱ्थ म्हणून पुढें आणलीं आहेत त्या त्यांच्या कारणांच्या योगानेंच अधिक स्पष्ट होत आहे. हाच म्हणाला कीं 'आज हा लाखांत अेकाच्याहि परिचयाचा नाहीं पण तीन पिढ्यांत आपल्या घरांत हा नित्याचें बिऱ्हाड ठेवूं शकेल.' म्हणूनच मी म्हणतों कीं, या सरकारी परक्या भटाला वेळींच ओसरीवर पाय पसरण्याचे आधीं हुसकून द्यावा आणि त्याची जागा मला, स्वदेशीय शब्दाला द्यावी, याचें काम मी किती अुत्तम प्रकारें करतों तें मला अेकदां तें काम सांगून पहा, कीं तुमच्या प्रत्ययास येअील. मी या हिंदुस्थानच्या वातावरणांतच जन्मलेला असून देववाणी संस्कृत माझी आजी होती. प्रथम अजागळपणें परकी शब्दांना आपल्या विचारांचें प्रतिनिधित्व करूं द्यावयाचें आणि मग ते ती जागा बळकावून बसले कीं रडत, ओरडत शुद्धीकरणाच्या मागें लागावयाचें हा कोण शहाणपणा ! पूर्वीं जरूर, तागाअीत, वल्लद, कोम अित्यादि अुन्दू शब्दांना असेंच ओंठावर नाचूं दिलें म्हणून तर आतां तेच अुरावर नाचत आहेत ! म्यानिफेस्टो म्हणतो त्याच्यासारख्या परकी शब्दानें शब्द संपत्ती वाढते. पण त्यायोगें आमच्यासारख्या स्वदेशीय शब्दांची अुपासमार व दुसरीकडे शब्दसंपत्तीचा क्षय होतो त्याची वाट काय ?

हें त्यांचें बोलणें अेकतांच आम्ही निऱ्णय दिला कीं, लोकानीं यापुढें केव्हांहि म्यानिफेस्टोस मतें न देतां त्या जागेसाठीं 'निवेदना' लाच निवडून द्यावें. अजून म्यानिफेस्टो लाखांतून अेकाच्याहि तोंडांत बसला नाहीं तोंच त्यास मज्जाव करावा. हा निऱ्णय अेकतांच आमच्या विवेक नावाच्या द्वारपालानें म्यानिफेस्टोस खोलीचें दार दाखविलें आणि निक्षून सांगितलें कीं पुन्हां जर तूं आमच्या मराठीच्या तोंडांत बसूं पाहशील तर तुझ्या तोंडांत बसल्यावाचून रहाणार नाहीं !

हा निऱ्णय अेकतांच आलेल्या शब्दांतील विदेशी वेष केलेले अनोळखी शब्द मागें मागें सरकत पाय काढूं लागले. तेव्हां आम्हीं सांगितलें कीं म्यानिफेस्टोचें म्हणणें अेकल्यानंतर जसा आम्हीं निऱ्णय दिला तसा तुमचें म्हणणें अेकल्यानंतर स्वतंत्र निऱ्णय देअू. तुम्हीं विदेशी म्हणून म्यानिफेस्टोप्रमाणें निवडणुकींत पराभव पावाल असें समजूं नका. कारण ज्या जागेसाठीं तुम्हीं प्रतिनिधी म्हणून अुभे राहूं अिच्छितां त्या जागेवर तो तो विचार प्रदर्शित करणारा कोणताहि स्वकीय योग्य शब्द न मिळाला तर आम्ही तुमचीच निवड करूं. परंतु स्वदेशी शब्द अधिक योग्यतेनें तें काऱ्य करीत असूनहि म्यानिफेस्टो दुसऱ्या जागेंत घुसून तिचा धनी बनूं पहात होता म्हणून त्याला निवडून दिलें नाहीं. या, आम्हीं सोयीनें अेकअेकास बोलावतों. कायदेकौन्सिल ! तुम्ही आणि तुमचे सहकारी कौन्सिल ऑफ स्टेट आणि ती तुमची घरधनीण लेजिस्लेटीव्ह असेंब्ली ! तुम्ही तिघे प्रथम पुढें या. आमचे हें बोलणें अेकतांच द्वारपाल

विवेक त्यांना बोलावूं लागला. पण त्याच्या हिंदी जिव्हेस तीं नांवें अुच्चारतां देखील येअीनात. म्हणून विवेक ओरडला आग लागो त्या तुमच्या नांवांस. माझ्या हातापिढ्या कोणी तोंड अितकें वेंगाडलें नसेल, अितकें मी वेंगाडलें तरी तुम्ही आंत येत नाहीं. अितकें तो म्हणतो तों ते तिघे आंत आले आणि कायदेकौन्सिल म्हणाला, 'घाबरूं नका. तुमच्या आम्ही अजून परिचयाचे नाहीं म्हणून तोंडास त्रास पडत आहे पण तो थोडासा सोसा, म्हणजे तुमच्या मुलांची तर गोष्टच कशाला पण तुमच्या मुलीस देखील अेकवेळ देवाचें नांव घेण्यास जड जाअील पण आमचीं नांवें घेण्यास जड जाणार नाहीं. काय लेजिस्लेटीव्ह असेंब्लीबाअी, खरें ना?' तो विचारतो तोंच विधिमंडळ, व्यवस्थापिका परिषद्, धारासभा, राज्यसमिति, विधिसमिति हीं सर्व हिंदी शब्दांची टोळी आंत घुसली आणि म्हणते "पण आमच्या लोकांनीं तुमच्या पुढें प्रथम तरी अितकें तोंड वेंगाडावेंच कां? आम्ही तुमच्या जागेवर योजले जातांच तुमचीं कामें शतपट लोकहितबुद्धीनें करून दाखवूं. त्या त्या विचारांच्या जागेसाठीं आम्ही अितके प्रतिनिधि असतां आणि आमच्याहून अधिक योग्य अितरही नियुक्त करतां येणारे असतां तुमची आमच्या हिंदु भाषांच्या घरांत लुडबूड हवीच कशाला?" तों लेजिस्लेटिव्ह असेंब्ली म्हणाली, 'पण ध्यानांत धरा, आम्ही सरकारनियुक्त प्रतिनिधि होणारे आहोंत. सरकारचा आम्हांस पाठिंबा आहे! आणि म्हणूनच आम्हांस लोकमताचा पाठिंबा मिळाला पाहिजे.'

हें सरकारचें नांव बरेच वेळां अैकतांच आम्हांस थोडीसी भीति वाटली आणि आम्ही तो संवाद टाळण्यासाठीं म्हटलें, "पुरे आतां राजकारणाची चर्चा करण्याचें हें स्थल नव्हे. आतां केवळ निर्णय तेवढा अैका. कारण प्रत्येकाचे वादविवाद असे चालूं लागले तर तुम्ही हातघाअीवर याल. आम्हांस अनत्याचारी शांततेच्या या काळांत ही निवडणूक करावयाची आहे. या खोलींच्या चार स्तंभांत ती आवरली गेली पाहिजे. नाहींतर भर मैदानांत अुतरून 'रणगर्जना' आमच्यावर डोळे फाडूं लागेल, आणि अनत्याचारी शांततेचा भंग होअील. कायदे कौन्सिल! तुमच्या जागेसाठीं दोन प्रतिनिधि होअूं अिच्छितात; अेक विधि-मंडळ, दुसऱ्या या व्यवस्थापिका परिषद्. धारासभाही अुभ्या आहेतच. परंतु व्यवस्थापिका परिषदेला अुत्तर-हिंदुस्थानांत बहुमत मिळालें आहे, आणि विधिमंडळाकडे आमचा ओढा आहे. कारण त्यांची विचार व्यक्त करण्याची पद्धत आटोपसर, नेटकी, आणि डौलदार आहे. म्हणून आम्ही कायदे कौन्सिलच्या जागेकरितां विधिमंडळ यांसच निवडावें असें ठरवितो. त्याचप्रमाणें लेजिस्लेटिव्ह असेंब्ली बाअींच्या स्थलीं विधिसमिति आणि कौन्सिल ऑफ स्टेटच्या ठिकाणीं राज्यपरिषद यांची निवडणूक व्हावी. चला आतां अिलेक्शन,

तुम्ही पुढें या; तुम्हांस कोण कोण प्रतिस्पर्धी आहेत? निवडणूक आणि निर्वाचन म्हणाले, आम्ही दोघे. तेव्हां अर्थातच आम्ही त्यासच स्थायीक करणार. तुमची निष्कारण लुडबुड आम्हांस मुळींच संमत नाहीं. निर्वाचन हा शुद्ध संस्कृत शब्द असून, निवडणूक ही त्याची मुलगी आहे; दोघांसही लोकांनीं अेकेक मत देअून निवडावें. आतां राहिला "क्यान्डिडेट" त्यास कोण प्रतिस्पर्धी आहे हें विचारतांच अेक मुसलमानासारखी विजार घातलेला शब्द पुढें आला; त्याचे डोक्यावर केमाल पाशानें फाडून फेंकून दिलेली अेक तुर्की टोपी होती, तिच्या तुटत आलेल्या गदळ गोंड्याचीं दोन चार सुतें कानावर लोंबत होती. तूं रे कोण म्हणून विचारतां तो म्हणाला, मी 'अुमेदवार' ह्या विचारास प्रदर्शित करीत असतों. आज तीनशें चारशें वर्षें मी महाराष्ट्रांत रहात आहें. हा कँडिडेट अुपऱ्या आहे; तोंच 'भिच्छुक' नांवाचा अेक शुद्ध स्नानसंध्याशील ब्राह्मणासारखा शब्द पुढें आला आणि म्हणाला, पण मी महाभारत काळापासून ह्या स्थानावर नियुक्त आहे. मध्यंतरीं मोठा राष्ट्रप्रळय झाला. त्यांत आम्हांस देशोधडीस जावें लागलें. पण आतां निवडणूक पुन्हां होणार हें अैकून आलों आहे. तेव्हां अर्थातच आम्हीं म्हटलें, भिच्छुक! या स्थानास तुम्हींच योग्य आहांत, आम्ही तुम्हांस मत दिलें.

याप्रमाणें निवडणुकी संपतांच द्वारपाल विवेक त्या सर्व मंडळीस बाहेर घेअून गेला. तिथें लोकांचा मोठाच थवा जमला होता. त्यांस निवडणुकीचा निर्णय कळविण्यांत आला कीं कायदेकौन्सिलच्या ठिकाणीं विधिमंडळ, लेजिस्लेटिव्ह असेंब्लीचे ठिकाणी विधिसमिति; कौन्सिल ऑफ स्टेटचे ठिकाणीं राज्यपरिषद; क्यान्डिडेट किंवा अुमेदवार यांचे ठिकाणी भिच्छुक; अिलेक्शनच्या ठिकाणीं निर्वाचन किंवा निवडणूक, आणि म्यानिफेस्टोच्या ठिकाणीं निवेदन यांस नियुक्त करण्यांत आलेले आहे. हें अैकतांच सर्व सरकार नियुक्त शब्दांचा पराजय होअून स्वकीय शब्द निवडून आले म्हणून राष्ट्रीय पक्षाच्या लोकांनीं मोठाच जयजयकार केला. यापुढें कोणीहि "कौन्सिलांतील अिलेक्शनसाठीं क्यान्डिडेटांचे म्यानिफेस्टो" अशीं धेडगुजरी वाक्यें न बोलतां "विधिमंडळांतील निवडणुकीसाठी अुभ्या राहिलेल्या भिच्छुकांचीं निवेदनें" अशीं शुद्ध, राष्ट्रीय आणि मंजुळ वाक्यें अुच्चारावयाचीं असा सर्वांनीं नियम केला. तेव्हां विवेकानें त्यांचें अभिनंदन केलें आणि म्हणाला आतां केवळ जे शहाणे आहेत त्यांनीं मात्र अिलेक्शनचा रिझल्ट, कायदेकौन्सिल, क्यान्डिडेटांचे म्यानिफेस्टो, असे शब्द मराठी वृत्तपत्रांतून लिहिले तर चालतील! कारण आपणांस अेखादी चांगली गोष्ट सुचण्याचे आधीं ती दुसऱ्यास सुचावी अेवढ्याचसाठीं ती अनुकरावयाची नाहीं हा दुराग्रही सत्याग्रह जर ते न करतील तर त्यांस अितर कोणत्या गुणांचे बळावर आपलें शहाणपण चव्हाट्यावर आणतां येणार आहे!

शेवटीं विवेकानें निवडून आणलेल्या राष्ट्रीय अिच्छुकांस (अुमेदवारांस) सांगितलें कीं तुम्हीं आमच्या विचारांचे प्रतिनिधि आज जरी निवडलेले आहांत तरी पुढें मागें हे विचार प्रदर्शित करणारें दुसरे योग्यतर स्वकीय प्रतिनिधि जर मिळाले तर आम्हीं तुम्हांस सोडून त्यांसच नियुक्त करूं हां ! तेव्हां ते सज्जन अुद्गारले, अगदीं मान्य. आम्ही केवळ अिच्छुक आहोंत. अेकदां आम्हांस आपण प्रतिनिधि केलेंत म्हणून योग्यता नसताहि वंशपरंपरा मध्यंतरीं लुडबुड करूं पहाणारे आम्हीं कोणी भिक्षुक नाहीं ! केवळ अिच्छुक आहोंत.

---

*ह्या लेखांत त्यावेळेस १९२६ मध्यें मराठींत अत्यंत प्रचलित असलेल्या ज्या अिंग्रजी शब्दांवर वीर सावरकरांनीं विनोदी टीकेचा भडिमार केला आहे ते अिंग्रजी शब्द आज १९३७ मध्यें मराठी भाषेंतून जवळ जवळ लुप्त झाले आहेत आणि त्यांचे ठायीं स्था. वीर वि. दा. सावरकरांनीं सुचविलेले आणि अितरहि स्वकीय शब्दच मराठी लिखाणांतून प्रचलित झाले आहेत. ह्या अेका अभिनंदनीय गोष्टीवरूनहि वीर सावरकरांनीं भाषाशुद्धीसाठीं अंदमानपासून गेलीं ३०–४० वर्षें जे परिश्रम घेतले ते कसे यशस्वी होत गेलें आहेत हें दिसून येअील.*

प्रकाशक

*दुसऱ्या आवृत्तीचे आतां सन १९८१ मध्ये तर विधानसभा, विधायक, विधी-मंत्री, राज्यसभा, अिच्छुक, निवडणुक घोषणापत्र आदि अनेक शुद्ध मराठी शब्द शासनच वापरीत आहे. आतां मराठी हीच महाराष्ट्राची राज्यभाषा झाली आहे.*

*( या नवीन आवृत्तीचे प्रकाशक )*

● ●

# भाषाशुद्धि नि श्री. श्री. कृ. कोल्हटकर

पुण्यास ह्या वर्षी भरलेल्या आणि बऱ्याच थाटामाटानें पार पडलेल्या मराठी–साहित्य–संमेलनाचे अध्यक्ष श्री. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांनीं त्यांच्या अध्यक्षीय भाषणांत मराठी भाषेच्या शुद्धीकरणाचे चळवळीविषयीं बरीच चर्चा केलेली आहे. मराठी भाषेंत अिंग्रजी शब्द मिसळून तिचें जें अत्यंत विकृत रूप कांहीं अिंग्रजी शिकलेल्या आणि न शिकलेल्या लोकांच्या तोंडांतून आणि लेखांतून व्यक्त होत असतें, त्याविषयीं श्री. कोल्हटकर यांनीं तीव्र खेद व्यक्त केला असून ते अशा भेड-गुजरी प्रचारास 'मराठीचें भ्रष्टीकरण' ह्याच नांवानें संबोधितात. अिंग्रजी शब्दांच्या निष्कारण भेसळीची श्री. कोल्हटकर यांना अितकी शिसारी वाटत आहे कीं, त्यांनीं Money bag चा देखील मोह न धरतां केवळ 'चामचंची'च काय ती कडोसरीस बांधून आपल्या टीकेची फटफटी (Motar cycle) अितक्या जोरानें सोडली आहे कीं वाटेंत अनेक 'अुतार' (Stations) आणि 'पडशाळा' (Waiting rooms) लागल्या असतांहि आणि तिथें थांबण्याचा आग्रह अनेक 'मिष्टरांनीं' आणि 'सरांनीं' केला असतांहि त्यांस 'अैसपैस पाय पसरण्याचे आधींच अर्धचंद्र' देअून ते आमच्याहि पुढें अेक पाअूल निघून गेले आहेत. मराठी भाषेच्या सात्विक अभिमानानें हृदय भरून येअून शेवटीं शेवटीं ते म्हणाले, "........ — पण तोंपर्यंत आपण आपल्या तोंडीं बसलेले अिंग्रजी शब्द बोकीत स्वस्थच बसणार काय? स्वस्थ बसल्यास केवळ आपल्याकडेच स्वाभिमानशून्यता येअील असें नाहीं; तर आपण आपल्या संसर्गानें भावी पिढीस दूषित करून निर्भेळ मराठी बोलण्याचें श्रेय तिजकडून हिरावून घेअूं. अिंग्रजी शब्द मराठी संभाषणांत जितक्या सोकर्यानें शिरले तितकेंच अवघड काम त्यांना त्यांतून हुसकून लावणें होणार आहे. पण तें अवघड कामहि अेक आवश्यक कर्तव्य म्हणून आपण पार पाडलें पाहिजे."

---

*वीर सावरकरांचा हा लेख १६ जून १९२७ च्या 'श्रद्धानंद' साप्ताहिकांत प्रसिद्ध झालेला आहे. त्या वर्षी पुणें येथें जें मराठी साहित्य संमेलन भरलें होतें त्याच्या अध्यक्षपदावरून कै. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांनीं केलेल्या भाषणांतील भाषाशुद्धि संबंधीच्या प्रश्नांना ह्या लेखांत वीर सावरकरांनीं अुत्तरें दिलीं आहेत.*

प्रकाशक

अिंग्रजी भाषेची मराठीवर कुरघोडी होअू देअू नये म्हणून आज तीस चाळीस वर्षे महाराष्ट्रांत कित्येक प्रमुख मंडळी झटत आलेली आहेत. माधवराव रानड्यांच्या चणेकुरमुरे * मंडळाची संस्था हें अेकच मंडळ अशा प्रयत्नासाठीं खटपट करीत नव्हतें. असे लहान मोठे बरेच प्रयत्न आजवर होत आलेले आहेत. त्या प्रयत्नांनीं आणि विशेषतः चिपळूणकरांच्या निबंधमालेंतील लेखांनींच अुद्युक्त होअून आम्हीं आमच्या शाळेतील दिवसापासून अिंग्रजी शब्द मराठींत शक्यतों न आणण्याचा प्रयत्न करण्याचा नियम आमच्या सहकाऱ्यांसह आजवर अनेक संस्थांतून घालीत आणि पाळीत आलेले आहोंत. कॉलेजमध्येंच नव्हे तर अगदीं विलायतेंत–लंडनच्या अगदीं मध्यवस्तींत देखील–कीं जिथें अेकदोन वर्षे राहतांच 'मराठी अगदीं विसरून गेलों बुवा!' म्हणून म्हणणें म्हणजे अेक प्रकारचें भूषण आहे असें समजणारे अनेक मराठी आणि हिंदी गृहस्थ निवसत असत–तिथेंसुद्धां आमच्या देखरेखीखालीं चाललेल्या "भारतीय भवनां"त अिंग्रजी शब्द मराठी किंवा हिंदी भाषेत घुसडला जातांच तो अगदीं अपराध समजला जाअून त्या अपराधी व्यक्तिस आपल्या चहास किंवा बिस्कुटास मुकावें लागे. अंदमानांतहि आमच्या पंजाबी, बंगाली आणि अितर प्रदेशांतील सहकष्टभोगी राजबंद्यांसह आम्हीं असेच कडक निर्बंध घालीत असूं. चिपळूणकरांच्या पिढीमागून गेल्या १९०६ च्या थोरल्या स्वदेशी चळवळीपर्यंत अिंग्रजी शब्दांच्या अेकसारख्या चेपीत चालणाऱ्या आक्रमणापासून मराठी भाषेचें संरक्षण करण्यासाठीं अशा प्रकारचे प्रयत्न बऱ्याच परिणामकारक रीतीनें चाललेले असत.

परंतु त्यानंतर ह्या विषयाकडे जनतेचेंच नव्हे तर साहित्याच्या नेत्यांचेंहि पुष्कळच दुर्लक्ष होत चाललें. प्रथम या विषयासंबंधी जितका नेटाचा अूहापोह आणि जितकें निग्रहाचें आचरण होत होतें तितकें होअीनासें झालें. आणि सार्वजनिकपणें तिकडे सर्व जनतेचें लक्ष पुन्हां अेकदां तीव्रतेनें वेधलें जाअील अशी अेखादी भावनोद्दीपक चळवळ चालू ठेवण्यांत आली नाहीं.

अेतदर्थच आम्ही सुटून येतांच मराठी शुद्धीकरणाच्या प्रश्नास पुन्हां अेकदां प्रबळ चालना देण्याचा प्रयत्न केला. त्या चळवळीचा हेतु मराठींतून अुर्दू–मुसलमानी–शब्दांचीच काय ती हकालपट्टी करावी हा नसून प्रथमपासूनच आपल्या भाषेत

---

* *टीप:– चणेकुरमुरे मंडळांत असा अेक नियम असे कीं जो सदस्य आपल्या बोलण्यांत अनावश्यक अिंग्रजी शब्द वापरील त्याला त्या दिवशीं मंडळाचे सदस्यांच्या बैठकींत चणेकुरमुरे न खातां बसावें लागेल.* –प्रकाशक

आपल्या स्वदेशीय संस्कृतोत्पन्न हिंदुभाषा संघाव्यतिरिक्त कोणत्याहि विदेशी शब्दांस निष्कारण घुसूं देअूं नये असाच होता. अुर्दू शब्दांअितकाच अिंग्रजी शब्दांवर आणि अन्य-अिंग्रजी अशा बाटग्या मराठीवरहि मराठी शुद्धीकरणाच्या चळवळीचा रोख असे आणि आहे ही गोष्ट आमच्या मराठी शुद्धीकरणावरील प्रत्येक लेखांतून आणि आमच्या साहचर्यांत असणाऱ्या मंडळींशी बोलल्या जाणाऱ्या प्रत्येक वाक्यावरून कोणासहि कळणारी आहे. त्या चळवळीमुळें गेल्या दोन वर्षांत ह्या प्रश्नाकडे जनतेचें लक्ष पुन्हां अेकदा अितक्या तीव्रतेनें आकर्षिलें गेलें आहे कीं, शाळेमधील मुलांपासून तों संपादकांच्या लेखनशाळेपर्यंत मराठी लिहितांना वा बोलतांना जीभ आणि लेखणी 'हा शब्द अिंग्रजी तर नाहीं ना! हा शब्द अुर्दू तर नाहीं ना!' अशा शंकेनें चटकन अडखळूं लागते. ही गोष्ट त्या लेखणीच्या आणि जिभेच्या प्रतिपदी अडखळण्यानें होणाऱ्या तोतरेपणाच्या त्रासास कंटाळलेल्या पुण्या – मुंबअीच्या कित्येक मित्रांनी 'हा भाषाशुद्धीचा नसता अुपद्व्याप काढतात तरी कशाला' म्हणून जी हांकाटी चालविली आहे तीवरूनच सिद्ध होते. आतां तर श्री. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांनीं साहित्य परिषदेच्या अध्यक्षपदावरूनच त्या विषयाची चर्चा अितक्या प्रामुख्यानें केली आहे की, त्यामुळे आज दोन वर्षे चालविलेल्या चळवळीचा पुष्कळच परिणाम झाला याविषयी आम्हांस आणि आमच्या महाराष्ट्रीय अनेक सहकाऱ्यांस साहजिकच आनंद व्हावा. अिंग्रजी भाषेतील शब्दांस मराठींत घुसघुस घालू न देता त्यांवर "कडक बहिष्कार" पुकारावा हें मत श्री. कोल्हटकर यांनीं आम्ही सांगतों त्याहीपेक्षां थोड्या अधिकच "अतिरेकी" भाषेत समर्थिलें याविषयीं आम्ही श्री. कोल्हटकर यांचें अभिनंदन करतों.

## पण मग हाच न्याय अुर्दू शब्दांसहि लागू नाही का?

अिंग्रजी शब्दांच्या संसर्गानें मराठीचें "भ्रष्टीकरण" होत आहे ही गोष्ट श्री. कोल्हटकर यांनी अगदी आम्हीं अनेक आक्षेप सहन करून अुपयोजिलेल्या त्या "भ्रष्टीकरण" शब्दांचा अुपयोग करूनच सांगितली आहे. हें "भ्रष्टीकरण" कां होअू देअूं नये ह्याचीं कारणेंहि त्यांनीं तीच सांगितली आहेत. परंतु त्याच कारणासाठी अनवश्यक अुर्दू शब्दांच्या संसर्गापासूनहि मराठीचें भ्रष्टीकरण होअूं देअूं नये असें आम्ही म्हणत असल्याने सकृद्दर्शनी कोणासहि असें वाटेल कीं, श्री. कोल्हटकरहि अुर्दू शब्दांच्या घुसघुसाचाहि आमच्या सारखाच निषेध करीत असतील. परंतु दुर्दैवानें त्यांस स्वतःस तसें वाटत नाही असें त्यांच्या भाषाशुद्धीकरणाच्या चर्चेच्या अुत्तरार्धावरून दिसून येतें ही अेक आश्चर्याचीच गोष्ट आहे. वास्तविक पहातां ज्या ज्या कारणासाठीं ते अिंग्रजी शब्द मराठींत घुसूं देअूं नयेत म्हणून म्हणतात, त्याच

कारणासाठीं अुर्दू किंवा कोणतेहि विदेशी शब्द मराठींत शक्य तों घुसूं देअू नयेत हेहि मत अपरिहार्यपणें अनुमित होतें. नवीन शब्दच नव्हेत तर जे अिंग्रजी शब्द अगदी घरादारांतून घुसले आहेत त्यांस देखील यापुढें मज्जाव करावा, मग तें काम अवघड असलें तरी कर्तव्य म्हणून केलेंच पाहिजे असें श्री. कोल्हटकर म्हणतात. मग आम्ही विचारतों कीं, हाच न्याय अुर्दू किंवा अितर कोणत्याहि विदेशी शब्दांसहि कां लागू नये? अवघड असलें तरी मिस्टर सर, असें खेड्यापाड्यांतील पेन्शनर चांभार-महारादिकापर्यंत रूढ झालेल्या शब्दांसहि "बहिष्कार" घालण्यास 'कंबर कसून' अुद्युक्त झालेलें श्री. कोल्हटकरांचें भाषाभिमानी धैर्य अुर्दू शब्दास पहातांच अेका-अेकीं असें कंबर मोडल्यासारखें कां होतें?

याचें कारण अितकेंच आहे कीं, श्री. कोल्हटकर यांची आमच्या भाषाशुद्धीच्या चळवळीविषयीं पुष्कळच विकृत समजूत झालेली आहे. ही गोष्ट त्यांनीं अुर्दू भाषेंतील शब्दांवरहि शक्य तों बहिष्कार घालावा ह्या मताविरुद्ध म्हणून जे जे आक्षेप आणलेले आहेत त्यांवरूनच सिद्ध होत आहे. 'केसरी'त आलेल्या फुटकळ लेखांतून कांहीं तरी, केव्हां तरी, कुठें तरी वाचून त्यांनीं ह्या विषयासंबंधी आपलें मत बनविलें आहे. परंतु त्या लेखांसह त्यावर आलेल्या अनेक आक्षेपांचा सांगोपांग विचार करून आम्हीं या भाषाशुद्धीकरणाच्या विषयावर जें अेक स्वतंत्र पुस्तक* लिहिलें आहे आणि ज्यास अेक त्याज्य शब्दांच्या प्रतिशब्दांसह कोशहि जोडलेला आहे तें पुस्तक श्री. कोल्हटकर यांनीं वाचलें नसावें—लक्षपूर्वक तर वाचलें नसावेंच असें त्यांनीं घेतलेल्या त्याच त्या शिळ्या शंकावरून स्पष्ट होत आहे. अेतदर्थ आम्हांस तर प्रथम असेंच वाटलें कीं, श्री. कोल्हटकरांच्या आक्षेपांस त्या पुस्तकांत ज्यांत ज्यांत अुत्तरें दिलेलीं आहेत ते ते छेदक तेवढे निर्देशूनच हें अुत्तर पुरें करावें. कारण तेंच तें स्पष्टीकरण लिहिण्यांत श्रमाचा नि वेळेचा अपव्यय होतो. परंतु साहित्यपरिषदेच्या ज्या अध्यक्षपीठावरून त्यांनीं ते आक्षेप घेतले त्या पीठाच्या महत्वासाठीं त्या आक्षेपांचें थोडेंबहुत स्वतंत्र-पणें निराकरण करणें प्राप्त आहे.

## मुसलमानी शब्दांवर बहिष्कार म्हणजे मुसलमानांचा द्वेष !

श्री. कोल्हटकरांचा मूळ आक्षेप असा आहे की मुसलमानी शब्दांस मराठींत धांगडधिंगा न घालूं देण्यासाठीं निघालेली ही चळवळ मुसलमानांच्या विषयीं जी अेक

---

* टीप :— हें पुस्तक म्हणजें 'मराठी भाषेचें शुद्धीकरण' कीं जें ह्याच पुस्तकांत पृष्ठे १ ते ९० पर्यंत पुनर्मुद्रित करण्यांत आलें आहे. —प्रकाशक

नवीन तेढ अुत्पन्न झाली आहे तिचा परिणाम आहे, आणि हें नसतें कुलंगडें गृहीत धरून त्यावर श्री. कोल्हटकरांनीं अडचणींचे मनोऱ्यावर मनोरे बांधलेले आहेत! मुसलमानांची संख्या फार आहे—हितसंबंध असेल—दुही अल्पकालीन आहे—मुसलमानांच्या प्रत्येक वस्तूवर बहिष्कार घालावा लागेल! म्हणजे गाण्यांतल्या चिजा देखील बहिष्कृत समजाव्या लागतील! असे नाहीं नाहीं ते भयानक देखावे नसत्या कल्पनेंतून अुठून त्यांच्या भाषणाच्या पडद्यावर तरंगत आहेत. पण आम्ही असें विचारतों कीं, ही भाषाशुद्धीची चळवळ मुसलमानांच्या द्वेषामुळें अुत्पन्न झाली हें तुम्हांस कोणी सांगितलें? या आक्षेपाचें निरसन आम्ही शुद्धीकरणाच्या पुस्तकांत ३० व्या च्छेदकांत केलेलेंच आहे. — (पृष्ठ २१ पहा).

पण प्रस्तुत प्रसंगापुरतें म्हणून विचारतों कीं, तुम्हीं स्वतः अिंग्रजी शब्दांवर "बहिष्कार" घालावा म्हणून जो म्हणतां तो काय अिंग्रजांशीं तुमची सध्यां जी तेढ अुत्पन्न झाली आहे तिचा परिणाम आहे?

अिंग्रजी शब्द अगदीं फटफटी ( Motorcycle ) पर्यंत बहिष्कृत करावे म्हणून आपण जें म्हणतां तें अिंग्लिशांच्या द्वेषानें का म्हणतां? तसें असेल तर अुर्दू शब्दांवर बहिष्कार घालण्याच्या चळवळीविरुद्ध जे जे तुम्हीं आक्षेप घेतलेत ते ते तुमच्याविरुद्धहि घेतां येतील! अिंग्रजांनीं सुरू केलेल्या आगगाडी, तारायंत्र, दूरध्वनि, ध्वनिलेख अित्यादि असंख्य सुधारणा आपण अंगिकारल्या त्याचप्रमाणें अेक तर त्यांचे अनवश्यक शब्दहि तुमच्या भाषेंत घुसूं द्या; नाहीं तर त्या शब्दांस बहिष्कार घालणें तर अिंग्रजांनीं आणलेल्या वरील अनेक अुपयुक्त सुधारणाहि सोडा, असें जर तुम्हांविरुद्ध कोणी म्हणूं लागला तर तुम्हीं काय अुत्तर द्याल? त्यास तुम्ही असेंच अुत्तर द्याल कीं, बाबा! अिंग्रजांच्या ज्या ज्या अुपयुक्त गोष्टी वाटल्या त्या त्या आम्हीं घेतल्या; म्हणून त्यांचे अनुपयुक्त किंवा अनावश्यक शब्दहि आम्ही आमच्या भाषेंत निष्कारण घुसूं द्यावे हें तुझें म्हणणें अगदींच बादरायणी असंबद्ध संबंधाचें द्योतक आहे! तसेंच आम्हीं आमच्या भाषेंतील शब्दाहून श्रेष्ठ नसलेले आणि आमच्या वाक्यसंस्कृतीशीं विसंगत असणारे अिंग्लिश शब्द भाषेंत शिरूं देत नाहीं ही गोष्ट आम्हीं अिंग्लिशांचा द्वेष करतों ह्याचें दर्शक असें जर तूं समजत असशील तर तेंहि तुझ्या निर्मूल मौलिकतेचेंच (originality) लक्षण समजलें पाहिजे. अुद्यां आम्हीं रोमनलिपींत मराठी लिहीत नाहीं किंवा स्वयंपाकघरांत अिंग्रजी न बोलतां मराठींतच बोलतों हेंहि अिंग्रजांशीं असलेल्या आमच्या तेढीचेंच तूं लक्षण समजशील!

पण अिंग्रजी शब्दांवर बहिष्कार घाला म्हणून जें सांगितलें तें श्री. कोल्हटकरांना अिंग्रजांविषयीं मनांत जी तेढ वाटते तीमुळेंच सांगितलें हा आक्षेप जर खोटा असेल, तर मुसलमानी शब्दांवर बहिष्कार घाला म्हणून सांगणारे मुसलमानांविषयीं वाटणाऱ्या तेढीमुळेंच तसें सांगतात हा आक्षेप खरा कशावरून ? आणि तशी तेढ असली किंवा नसली तरी मुसलमानी शब्दांस बहिष्कार घालण्याची चळवळ ज्यांनीं आरंभिली, त्या श्रीशिवछत्रपतींना तें जाअून विचारा; आम्हांस कशाला विचारतां !

कृते म्लेंच्छोच्छेदे भुवि निरवशेषं रविकुला-
वतंसेनात्यर्थं यवनवचनैर्लुप्तसरणीम्
नृपव्याहारार्थं स तु विबुधभाषां वितनितुम्
नियुक्तोभूद्विद्वान्नृपवरशिवच्छत्रपतिना
(राजव्यवहारकोश)

'या आर्यावर्तात म्लेंच्छ सत्तेचा अुच्छेद करून स्वतंत्र हिंदुराज्य स्थापन केल्यानंतर यवन भाषेच्या वर्चस्वानें लुप्त झालेल्या स्वकीय देववाणीचें पुनरुज्जीवन करण्यासाठीं ज्या महाराज छत्रपतींनीं यावनी शब्दांचें अुच्चाटन करण्याचा प्रयत्न केला त्या छत्रपतींनीं त्यांनीं त्या कार्यार्थ ज्या विद्वानाची योजना केली आणि जो

विपश्चित्संमतस्यास्य किं स्यादज्ञविडंबनैः
रोचते किं क्रमेलाय मधुरं कदलीफलम् ॥

'श्रीशिवछत्रपतींसारख्या अनेक धुरंधर आणि बुद्धिमान पुरुषांना जें यावनी शब्दांचें अुच्चाटण करण्याचें कार्य संमत झालेलें आहे त्या यत्नास मूर्ख लोक जरी हंसले तरी त्यांस कोण भीक घालतो' – अशी घोषणा करून राजव्यवहारकोश लिहावयास जो बसला त्या रघुनाथ पंडितास विचारा कीं, ही यावनी शब्दांवर मराठींत बहिष्कार घालण्याची चळवळ मुसलमानांविषयीं वाटणाऱ्या तेढीचा परिणाम आहे कीं गोडीचा ! कारण ही चळवळ त्या शिवकालीन पिढीची आहे. आम्हीं केवळ तिचें अनुसरण केलें – तीं मंदावली होती ती पुन्हां प्रज्वलित केली अितकेंच !

श्री. कोल्हटकर यांनीं अुर्दू शब्दांच्या बहिष्काराचें विरुद्ध म्हणून जे आणखी कांहीं आक्षेप आणलेले आहेत, त्यांचें खंडन अिंग्रजी शब्दांस बहिष्कार घातलाच पाहिजे ह्या मताचे समर्थनार्थ त्यांनींच योजिलेल्या कोटिक्रमानें कसें होतें हें पहाणें मोठें गमतीचें आहे.

## श्री. कोल्हटकरांविरुद्ध कोल्हटकर

अुदाहरणार्थ दोन चार आक्षेप पाहूं. ते म्हणतात, "मुसलमानी शब्दांचा जसा त्याग करावयाचा तसा मोंगल बादशहा निझाम यांच्या पदव्यांचाहि त्याग करावा लागेल." पण मग अिंग्रजी शब्दांचा जर त्याग करावयाचा तर अिंग्रजी पदव्यांचाहि त्याग नको का करावयास ? बी.अे. अेल्.अेल्.बी ही पदवी देखील त्यागिली पाहिजे ! जर ती पदवी न सोडतां अिंग्रजी शब्द सोडतां येत असतील, तर तसेंच मुसलमानी शब्दांसहि आवश्यक त्या विशिष्ट पदव्या न सोडतां त्यागतां येअील. 'सर' हा शब्द त्यागावा म्हणून म्हणताना श्री. कोल्हटकर त्यास 'साहेब' हा पर्याय सुचवितात आणि साहेबाची हांजी हांजी करण्याची आजकालची अभिजात रूढी पाळण्यासाठीं म्हणूनच कीं काय, त्याचे वतीनें म्हणतात, "साहेब शब्दांत मुसलमानी अुगमाशिवाय आक्षेपार्ह कांहींच नाही." होय; पण 'सर' ह्या शब्दांत तरी त्याच्या अिंग्रजी अुगमावांचून आक्षेपार्ह काय आहे ? ते म्हणतात, मुसलमानी शब्द मराठी व्याकरणाचे नियम मुकाट्यानें पाळतात म्हणून ते ठेवावेत. पण मराठी व्याकरणाचे नियम अिंग्रजी शब्दांकडून पाळवून घेण्यांत तर मराठी लोक—विशेषतः सुशिक्षित महाराष्ट्रीय औरंगजेबच्या झिझिया वसूल करण्याच्या कडवेपणासहि मागें टाकणारे आहेत ! 'ब्रदरला भयंकर फीव्हर चढल्याचें लेटर आल्यानें आतां टुडेच्या टुडे बॉंबे गांठलीच पाहिजे !' अशा शेंकडों वाक्यांत असे हूं कां चूं न करतां हिंस्रांतले हिंस्र शेंकडो अिंग्रजी शब्द गऱ्भगळीत होअून मराठी व्याकरणाचे पिंजऱ्यांत अुभे असलेले प्रत्यहीं दिसून येतात मग त्यांवर कां बहिष्कार घाला ? "मुसलमानीं शब्दांस मराठी विभक्ति-प्रत्यय बरेच जुळतात" पण तसेंच ते अनेक अिंग्रजी शब्दसहि जुळतात. वरील 'साहेब' आणि 'सर' ह्यांनाच विचारूं. साहेबापेक्षां 'सर'च अधिक सरळ दिसतो. 'सरला विचार' 'सरनीं मारलें; 'सरांचा अुपदेश हीं वाक्यें तर लहान मुलें देखील रात्रंदिवस घोकीत असतात. 'सर'ला मुलें भक्तिपूर्वक विभक्ति लावतात तर 'वाअिफ'ला मोठीं माणसें लावतात. 'वाअिफ' हा शब्द तर मराठी विभक्तीस, अगदीं वाअिफ हस्बंडच्या आज्ञेस पाळते तितक्या भक्तीनें शिरोधार्य करतो. वाअिफला, वाअिफनें, वाअिफशीं या सर्व विभक्तिप्रत्ययांशीं वाअिफचें सूत अगदीं तंतोतंत जमलेलें दिसतें. मग ज्यांच्या तोंडीं हीं वाक्यें नेहमी येतात त्यांनीं 'मराठी व्याकरणाचे निर्बंध निमूटपणें पाळणाऱ्या या बिचाऱ्या' अिंग्रजी शब्दांची हकालपट्टी काय म्हणून करावी ? "अनेक मुसलमानी शब्दांमागें अितिहास आहे, ते कष्टानें प्राप्त झालेले आहेत." पण मग त्यांना बहिष्कार घालण्यासाठीं अुपयोजिलेले 'अुपस्थिति', 'निश्चिति', 'प्रतिमोल' अित्यादि शब्दहि कांहीं रानपाल्यासमवेत अुडत आलेले नाहींत ! राजव्यवहारकोशाच्या पाठीशीं तर राजाश्रयाचा अितिहास आणि

अेका राजनियुक्त विद्वन्मंडळाचे कष्ट आहेत! "घरादारांत घुसलेले मुसलमानी शब्द काढून टाकणें फारच अवघड आहे" म्हणून सांगणाऱ्या श्री. कोल्हटकरांस अिंग्रजी शब्दांविषयीं बोलणारे श्री. कोल्हटकरच असें बाणेदार अुत्तर देतात कीं, "तें अवघड कामहि अेक अवश्य कर्तव्य म्हणून पार पाडलेंच पाहिजे. चालू पिढींतील प्रत्येक मराठी भाषेच्या अभिमान्यानें मराठी संभाषणांत अिंग्रजीवर पूर्ण बहिष्कार घालण्याचा निर्धार केला पाहिजे. दर अिंग्रजी शब्दामागें अेक दिवस सक्तमजुरीची शिक्षा ठेवली असती तर असा निर्धार करण्याचें कारणच पडलें नसतें!" अगदीं खरें. त्यांत अधिक अितकेंच सांगावयाचें कीं, असा कडक निर्धार केला कीं अिंग्रजी शब्दां-प्रमाणेंच मुसलमानी शब्दहि मराठींतून बहिष्कृत करतां येणें अवघड असलें तरी तितकेंच शक्य आहे.

## या विरोधाचें मूळ कारण दूषित संवय

श्री. कोल्हटकरांच्या पिढीस अिंग्रजी शब्द न वापरतां मराठी, संभाषणांत जरी नसली तरी लेखांत आणि व्याख्यानांत, लिहिण्याची संवय झाली आहे. म्हणून त्यांस अिंग्रजी शब्दावर कडक बहिष्कार घालण्याची शक्यता पटते–आणि त्या दृष्टीनें त्यांनीं लहानपणापासून विचारहि केलेला असतो. परंतु अुर्दू शब्दांसहि मराठींत निष्कारण शिरूं देणें हें अिंग्रजी शब्द शिरूं देण्याअितकेंच अपमानास्पद किंवा हानिकारक आहे ही भावना पेशवाअी मेल्यापासून आपल्या अिकडे जवळ जवळ मेल्यासारखीच झाली असल्यानें – नव्हे अलीकडे अलीकडे अुर्दू शब्द नाहीं तेथून चोरून आणून मराठींत निष्कारण दडपणें म्हणजे अेक मोठें शतकृत्य होय, अशी अत्यंत घृणास्पद समजूत नवशिक्या लेखकांची झाल्यानें – आणि त्यामुळें ह्या पिढीच्या लेखण्या अुर्दू शब्दांचा अुपयोग करण्यास अगदीं सवकल्या असल्यामुळें 'अुर्दू शब्दहि बहिष्कार्यच होत' हा महाराष्ट्राच्या अभिमानी देवतेच्या जुन्या गर्जनेचा प्रतिध्वनि आमच्या भाषाशुद्धीच्या रूपानें नव्यानें अुठूं लागतांच त्या लेखण्यांना प्रतिपदीं अगदीं कावरेंबावरें झाल्यासारखें होअूं लागलें. आणि म्हणूनच अिंग्रजी शब्द बहिष्कारास अनुकूल असलेले लोक अुर्दूचें नांव निघतांच आपणच निरस्त केलेले आक्षेप आपणच घेअूं लागतात.

आमची अशी निश्चिति आहे कीं, जर श्री. कोल्हटकर आमचें मराठी शुद्धी-करणाचें पुस्तक अेकवार – आणि पूर्वीं वाचलेंच असेल तर पुन्हां अेकदां–लक्षपूर्वक वाचतील तर त्यांस अिंग्रजी भाषेंतील शब्दांप्रमाणेंच अुर्दू शब्दहि आपल्या भाषेंत निष्कारण घुसडूं देणें लज्जास्पद आहे असें वाटूं लागेल. आणि त्यांवर बहिष्कार

घालणें हें काम अिंग्रजी शब्दांप्रमाणेंच अवघड असलें तरी अशक्य नाहीं असें आढळून येअील. कारण श्री. कोल्हटकर यांस विदेशी शब्दांस बहिष्कार घालावा या आमच्या मताची रूपरेखाच नीट समजली नाही. म्हणूनच ते गुलाब किंवा जिल्हा या शब्दांसहि बहिष्कार घालावा का म्हणून आम्हांस विचारतात. आम्हीं त्यांच्या ध्यानांत यावें म्हणून–विदेशी शब्द–त्यागाचा खरा अन्वय
थोडक्यांत खालीं सांगत आहों. मराठी भाषेंत जे जुने किंवा नवे विदेशी शब्द– मग ते अिंग्रजी असोत किंवा अुर्दू असोत किंवा आणखी कोणत्या अहिंदु भाषेंतील शब्द असोत–घुसलेले असतील त्यांस शक्य तोंवर काढून टाकून त्याठायीं संस्कृतादिक हिंदु भाषासंघांतील (म्हणजे कानडी, तेलगू अित्यादि भाषांतीलहि) स्वदेशी शब्दांचा अुपयोग करावा.

यावनी काय किंवा अिंग्रजी काय–विदेशी असा शब्दच स्वभाषेंत ठेवावयाचा नाहीं असें आम्हीं केव्हांहि प्रतिपादित नाहीं. म्हणून श्री. कोल्हटकर यांचे बहुतेक आक्षेप आपोआपच निरसन होतात. ते आमच्या चळवळीस विरुद्ध नाहींत अितकेंच नव्हे तर कांहीं अंशीं अनुकूल आहेत.

हजर शब्दास अुपस्थित, कायदेमंडळ या शब्दास विधिमंडळ, खात्री शब्दास निश्चिति आणि हवामान शब्दास वायुमान हे शब्द जर मराठींत प्रचलित झाले तर "मराठीचें अपरिमित नुकसान होणार आहे" असें श्री. कोल्हटकर यांना खरोखरच का वाटत आहे? तर मग मोटार गाडीस 'धुरगाडी' म्हणण्यानेहि ती अपरिमित हानी होणार नाहीं का ? जर आपण विचाराल कीं या शब्दांस हे नवे प्रतिशब्द रूढ होणें शक्य आहे काय ? तर त्याचें अुत्तर हें आहे कीं, ते तसे रूढ होत चाललेच आहेत. अेका दोन वर्षांच्या चळवळींत ते शब्द आणि तसे 'हुतात्मा', 'क्रमांक', 'स्तंभ' (कॉलम), 'निश्चिति' असे जवळ जवळ शंभर अेक नवीन शब्द स्वभाषेंत भर पडले आहेत आणि महाराष्ट्रांत प्रचलित नसले तरी परिचित झालेले आहेत.

आम्हीं शक्य तों स्वदेशी शब्द योजू; अवश्य असेल तेथें विदेशी शब्द घेअू. अशक्य असेल तेथें तो राहूहि देअू; पण शक्य तोंवर प्रयत्न असा करूं कीं, मराठींत किंवा कोणत्याहि हिंदुभाषासंघांतील भाषेंत अहिंदु भाषेंतील विदेशी शब्द निष्कारण घुसला न जावा, अुरला, न जावा.

अशा निष्ठेनें आज शेंकडों लोक अुत्तेजित होअून लेखांत आणि संभाषणांत विदेशी शब्दांपासून शक्य तों अकलंकित अशी भाषा बोलूं लागले आहेत, लिहूं लागले आहेत. श्री. कोल्हटकरहि निष्पक्षपातीपणें विचार करतां करतां म्हणतात:–

"विदेशी शब्दांविरुद्धची ही मोहीमहि अगदींच निरर्थक ठरली असें नाहीं. कारण अलिकडे मराठी गद्यांत व पद्यांत मुसलमानी शब्दांस जी बेसुमार भरती आली होती तिला त्या शुद्धि मोहीमेचा अुदय झाल्यापासून ओहोटी लागल्याची चिन्हें दिसूं लागलीं आहेत. ......भाषेतून मुसलमानी शब्दांस अर्धचंद्र मिळाला नाहीं तरी भाषेत अुपयुक्त शब्दांची भर पडल्यावांचून राहणार नाहीं."

आतां त्यांच्या भाषणांत कोल्हटकरांचीं कांहीं वाक्यें जीं भाषाशुद्धीच्या अुलट भासतात तीं ते अेवढ्यासाठींच सहज बोलून गेले कीं आपण विदेशी बहिष्कारास पूर्णपणें अनुकुल आहोंत ही गोष्ट त्यांची त्यांच्याच नीटपणें ध्यानांत आली नाहीं.




• •

# पंचवार्षिक समालोचन *

जवळ जवळ सहासात वर्षांपूर्वी मराठी भाषेंत पूर्वी आणि सध्यांच्या म्लेंच्छ राजवटींत घुसलेले आणि घुसत असणारे विदेशी शब्द शक्यतों बहिष्कृत करून आणि बहिष्कार्य मानून विशेषतः अुर्दू किंवा अिंग्रजी शब्दांनीं आपल्या भाषेंतून हुसकून दिलेल्या किंवा नष्टप्राय केलेल्या आपल्या स्वकीय शब्दांचें पुनरुज्जीवन करावें आणि यापुढें तरी आपला स्वकीय शब्द असतांहि विदेशी शब्द निष्कारण वापरण्याची खोड आपण सर्वांनीं सोडून द्यावी या हेतूनें मराठी भाषेच्या शुद्धीकरणाची चळवळ संघटितपणें हातांत घेण्यांत आली. याविषयीं 'केसरीं'त प्रसिद्ध झालेल्या लेखानंतर, प्रचलित रूढीच्या योग्य असो वा अयोग्य असो परंतु विरुद्ध जाणाऱ्या कोणत्याहि चळवळीप्रमाणेंच या भाषाशुद्धीच्या चळवळीवरहि विचारी आणि अविचारी अशा आक्षेपांचें, शंकांचें आणि वेळीं शिव्यांचेंहि मोठें काहूर अुठलें. त्यांतील कांहींचें समाधान केसरींत दुसरी अेक लेखमाला लिहून केलें. परंतु वर्तमानपत्रांतील लेख फुटकळपणें प्रसिद्ध होणें अपरिहार्य आणि अशा फुटकळ लेखांतील कोणता तरी भाग वाचल्यानेंच आणि त्या लेखमालेचा समग्र अभ्यास न केल्यानेंच बहुतेक टीकाकारांचे संशय अुत्पन्न झालेले आहेत असें वाटल्यामुळें ती लेखमाला केसरीकारांच्या अनुज्ञेनें "मराठी भाषेचें शुद्धीकरण" या स्वतंत्र पुस्तकांत × थोडी भर घालून समग्र छापून प्रसिद्ध केली आणि त्याज्य विदेशी शब्दांचा अेक दिग्दर्शनापुरता लघुकोश या पुस्तकास जोडला. येथे या चळवळीचें सूत-अुबाच संपलें; त्यास आज पांच वर्षें होअून गेलीं.

---

* *आपल्या स्थानबद्धतेच्या काळांत रत्नागिरी येथें असतांना स्वा. वीर सावरकरांनीं जी भाषाशुद्धीची चळवळ पुढें चालू केली त्याचा पांच वर्षांचा आढावा घेणारा हा लेख 'केसरी'मध्ये चार लेखांकांत दि. १६ मे १९३१ पासून दि. २ जून १९३१ पर्यंतच्या अंकांतून प्रसिद्ध करण्यांत आला होता.*

प्रकाशक

× *ह्या पुस्तकाचीं पानें १ ते ५० म्हणजेच मराठी भाषेचें शुद्धीकरण ह्या पुस्तकाच्या पूर्वार्धाचें पुनर्मुद्रण आहे.*

तथापि कोणत्याहि अभिलषणीय परंतु फार निन्द्यावलेल्या रूढीचे विरुद्ध असणाऱ्या सुधारणेस, घडवून आणण्याची मुख्य गुरुकिल्ली तिचें तात्विक चर्च्चण करीत फार वेळ न बसतां तिला तात्काळ आचरणांत आणून सोडणें हीच असते. कित्येक शंका ती सुधारणा आचरणांत आणून तिचें वांछनीय फळ प्रत्यक्ष हातांत दिल्यावांचून नुसत्या तात्विक किंवा वाच्चिक अुहापोहानें केव्हांहि फिटणाऱ्या नसतात. अेकाद्या नव्या फळाचेंच अुदाहरण पाहा. तें नवें फळ गोड कीं कडू, हितकारक कीं अहितकारक, रसाळ कीं रुक्ष हा वाद तें फळ प्रत्यक्ष न चाखतां केवळ समोर ठेवून किंवा चित्रांत आंखून चर्च्चा करीत बसल्यानें सहसा सुटणार नाहीं. पण त्याचा प्रयोग करतांच, तें चाखून पाहतांच तो वाद कितीतरी चटकन मिटूं शकतो. ह्यास्तव, भाषाशुद्धीच्या चळवळीनें मराठी भाषेवर मोठी आपत्ति कोसळेल तितक्या वर्दळीवर आलेल्या आक्षेपाचें समाधान ती भाषाशुद्धी अंशतः तरी प्रत्यक्ष घडवून आणून आचरून दाखवून तिचे सुपरिणाम काय ते ज्यांचे त्यांचेपुढें प्रत्यक्षपणें मांडणें प्रथमच्या तात्विक आणि वाच्चिक वादांचा शेवटचा निर्णय लावण्याचा श्रेयस्कर मार्ग होय असें जाणून आम्हीं पांच वर्षापूर्वीं तें स्वतंत्र पुस्तक प्रसिद्ध केल्यानंतर भाषाशुद्धीचा प्रत्यक्ष प्रयोग प्रमुखतः श्रद्धानंद पत्रांतून चालू केला. या पत्राच्या पहिल्या अंकापासून तों "ऑर्डिनन्सनें" तें पत्र गेल्यावर्षीं बंद पडेतों संपादक महाशय डॉ. सावरकर यांजपासून तों लेखकांपर्यंत सर्वांनीं तींत निष्कारण घुसलेल्या अुर्दू, अिंग्लिशप्रभृती विदेशी शब्दांपासून शक्य तों अकलंकित अशीच मराठी भाषा वापरण्याचें ब्रीद यथासाध्य पाळून दाखविलें. दर आठवड्याच्या आठवड्यास महाराष्ट्रभर ह्या पत्रांतून अुर्दू शब्दांनीं लुप्त वा लुप्तप्राय केलेले आपले अनेक स्वकीय जुने आणि छान शब्द पुनः प्रचलित होअूं लागले. भाषिक परधार्जिणेपणानें स्वकीय कोण आणि परकीय कोण याची जाणीव देखील जी नष्ट झाली होती ती पुनः अुत्पन्न करून शब्द पाहिला कीं हा स्वदेशी कीं विदेशी, अुर्दू, अिंग्लिश कीं हिंदवी ? असा प्रश्न पटकन मनाचे मनास करण्याची चटक लेखकांस आणि वाचकांस लावून सोडली. शाळांतून आणि घरांतून बायकामुलांपर्यंत हा शब्द विदेशी कीं देशी यांची चर्चा आणि शब्दांच्या चुक्यांची धरपकड हा 'भेंड्या'सारखा अेक गमतीचा आणि अुद्बोधक खेळ करून सोडला.

कोठून तरी अेकादा बाटगा अुर्दू शब्द आणून तो लेखांत वा कवितेंत दडपून देणें म्हणजे "शाहिरी" कवितेचा परमोत्कर्ष होय अशा अगदीं विकृत समजुतीपर्यंत या अंधळ्या परधार्जिणेपणाचा जो टप्पा गेलेला होता त्याचे डोळ्यांत चरचरीत अंजन घातलें जाअून अुर्दू शब्द भाषेंत निष्कारण घुसडणें हें भाषादारिद्र्याचें

द्योतक आहे, हा दोष आहे, असें लोकरुचीस हितावह वळण पुष्कळ अंशानें लागूं लागलें आणि भाषाशुद्धीच्या चळवळीनें भाषेच्या शब्दसंपत्तीचें दिवाळें निघून "मोठें अरिष्ट कोसळेल" म्हणून अनेक प्रामाणिक आक्षेपकांसहि जी भीति प्रथमदर्शनीं वाटली तिचा अनायासेंच निरास होऊन प्रत्यक्ष अनुभवांती भाषेची शब्द-संपत्ति उलट वाढलेली दिसूं लागली. अनेक जर्मन-सिल्व्हरी किंवा बनावटी विलायती नाणीं फेकलीं पण त्यांचे ठायीं शुद्ध बावनकशी सोन्याच्या आणि जातिवंत रुप्याच्या नाण्यांची भाषेच्या भांडारांत सारखी भर पडत आहे.

'श्रद्धानंद' हें भाषाशुद्धीच्या आणि लिपीशुद्धीच्या चळवळींचें मुखपत्र होतें. अर्थात् "ऑर्डिनन्सनें" तें बंद पडल्यापासून त्या अवधींत या विषयाचीं पाळेंमुळें अितकीं खोल आणि अशा सुपिक भूमींत नेअून रुजविलीं आणि बळाविलीं आहेत कीं असल्या अेकट्या दुकट्या माळ्याच्या राखणीवांचूनहि हा वृक्ष आपल्या स्वतःच्याच जीवनशक्तीच्या बळावर जगूं शकावा, भरभराटूं शकावा. कारण मागें अुल्लेखिलेलें भाषाशुद्धीचें मूळ पुस्तक प्रसिद्ध होअून या चळवळीचें सूतअुवाच होतांच गेल्या पांच वर्षांत भाषाशुद्धीचा अभिमान धरणारा आणि ती आचरणांत आणून सोडणारा असा अेक संघटित वर्ग लहान मोठ्या प्रमाणांत महाराष्ट्रांतील बहुतेक महत्त्वाच्या नगरांतून अुत्पन्न झालेला आहे. मसुरच्या ब्रह्मचर्याश्रमासारखी संस्था भाषाशुद्धीची सक्रिय अभिमानी आहे. तेथील प्रचारकांच्या व्याख्यानांतून आणि विशेषतः त्यांच्या दासबोध मासिकांतून निष्कारण विदेशी असा शब्द मग तो जुना अुर्दू असो वा नवीन अिंग्लिश असो सहसा आढळत नाहीं.

दासबोध हें मासिक श्रद्धानंदाप्रमाणेंच भाषाशुद्धीचा अेक अेकनिष्ठ प्रचारक आहे. त्या आश्रमाचे वतीनें छापलेल्या अनेक ग्रंथांतूनहि विदेशी शब्दस्पर्शापासून विमुक्त केलेली अशी सोज्वळ, शुद्ध आणि सतेज मराठीच योजलेली असते. आमच्या धर्मपीठाचें तर हें विशेष कर्तव्य आहे कीं, त्यांनीं आपल्या लिखाणांतून अनवश्यक अशा मार्गें म्लेंछ राजवटींत घुसलेल्या, विदेशी शब्दांचें साफ अुच्चाटन करून तदर्थक असणाऱ्या आपल्या जुन्या आणि नव्या स्वकीय शब्दांचाच प्रसार करावा. महा-भारताच्या भाषांतरांत किंवा त्या कथानकांवरील नाटकांत जेव्हां अशी भाषा वाल-ण्यांत येते कीं, तेव्हां दरबारस्थ दुर्योधन अुठून धृतराष्ट्रास म्हणाला 'बाबासाहेब! खुदाच्या मेहरबानीनें आज हा डाव मी जिंकला. धर्माचें तकदीर फुटलें. आतां या दुष्मनांना मी नेस्तनाबूद करून टाकीन! बस्स आतां दरबार बरखास्त करावा!!" तेव्हां तो अक्षम्य मूर्खपणा असतो; तसाच आमच्या धर्मपीठाच्या पवित्र आज्ञापत्रांतून आणि लिखाणांतून 'निसबत' 'जरूर' 'कायदेपंडित' 'तहाहयात' 'तहकूब' किंवा त्याचाच

माअू 'बेवकूब' अित्यादि शब्द आचार्यपीठाच्या मराठी लिखाणांत वापरले जाणें लाजिरवाणें आहे. ह्या दृष्टीनें पाहतां अलिकडेच प्रसिद्ध झालेल्या श्रीशंकराचार्य डॉक्टर कुर्तकोटींच्या केसरी संस्थेस दिलेल्या आशिर्वादाची भाषा आमच्या सर्व धर्मपीठांना किती अनुकरणीय आहे! 'केसरीप्रबोधां'त दिलेल्या त्या अुभ्या छेदकांतील विचारांप्रमाणें त्यांना व्यक्त करणारी भाषाहि आमच्या पुरातन संस्कृतींतील अुदात्त आणि अुत्तम तें तें संरक्षण करण्याचें ज्यांचें आद्य कर्तव्य त्या आचार्य पीठाला शोभते खरी. त्या अुभ्या छेदकांत नवा वा जुना कोणताहि म्लेंछ शब्द निष्कारण न आल्यानें ती भाषा पंगू वा दरिद्री झालेली नसून अुलट किती श्रुतिसुखद, संपन्न आणि संस्कृत भासत आहे. आचार्य यापुढेंहि निदान आपल्या लिखाणांत तरी धर्मभास्कर मसुरकरांप्रमाणेंच अनवश्यक नि निष्कारण अशा म्लेंछ शब्दाच्या संपर्कापासून आपल्या 'विबुधभाषेस' मुक्त करण्याच्या ह्या शिवछत्रपतींनींच आरंभिलेल्या कार्याचा यथासाध्य पुरस्कार करतील अशी आम्हांस आशा आहे.

संघटन–प्रचारकांपैकीं श्री. पांचलेगांवकर महाराजहि भाषाशुद्धीचे अभिमानी असून अुर्दू वा अिंग्रजी शब्द शक्य तों आपल्या बोलण्यांत टाळण्याचा आणि अितरांकडून टाळविण्याचा यत्न, तसें करतांना थोडा त्रास पडला तरी सहन करून, करीत असतात. ज्ञानदेवी मासिकांतील लेखांतहि अथपासून अितिपर्यंत अगदीं प्रतिज्ञापूर्वक भाषाशुद्धीचें व्रत अंगिकारलेलें असतें. त्याचे संपादक श्रीयुत आठवले हे या विषयाचे अगदीं पहिल्यापासूनचे अभिमानी. जुने अुर्दू किंवा नवे अिंग्लिश शब्द बहिष्कृत करतांना त्या ठायीं अगदीं ठाकठीक असा स्वकीय शब्द अचूक योजण्यांत त्यांचा हात नित्याचाच पडाअीत. यावांचून चित्रकार आणि लिपी संशोधक देवधरांसारखे आणखी अनेक लेखक लिहिण्यांत आणि बोलण्यांत भाषाशुद्धीचें व्रत अेकनिष्ठपणें पाळीत असतात. रत्नागिरी हिंदुसभा तर प्रथमपासूनच आपलें सर्व विस्तृत लिखाण आणि मुद्रण शुद्ध भाषेंतच प्रसिद्ध करते. अितरहि कांहीं हिंदुसभा आणि संस्था भाषाशुद्धीकडे थोडेंफार लक्ष पुरवितात.

आम्ही आणि आमच्या बंधुद्वयानें तर जन्मठेप, मला काय त्याचें, वीरबैरागी, गोमांतक काव्य, अुःशाप, हिंदुपदपादशाही, नेपाळ प्रभृति लिहिलेल्या झाडून सार्‍या लहान मोठ्या ग्रंथांत भाषाशुद्धीचाच अवलंब केला अितकेंच नव्हे तर मराठींतील आमच्या सर्व व्याख्यानांतून, पत्रव्यवहारांतून, संवादांतून आणि प्रत्यहींच्या चालचलाअू बोलण्यांतून गेल्या पांच सहा वर्षांत अुर्दू वा अिंग्लिश शब्द असा न येअू देण्याचा पराकाष्ठेचा प्रयत्न करीत आलों. आमच्याप्रमाणें प्रत्यहींच्या बोलण्यांतहि

अुर्दू वा अिंग्रजी शब्द निष्कारण न वापरण्याचें ब्रीद प्रत्यक्ष आचरणांत अगदीं कट्टरपणें पाळीत असलेल्या शेंकडों तरुण आणि प्रौढ स्त्रीपुरुषांचीं अुदाहरणें आम्हांस माहीत आहेत.

भाषाशुद्धीची चळवळ पांच वर्षांपूर्वीं प्रथम हातीं घेतली, तेव्हां तिचे समर्थक हाताच्या बोटावरहि मोजण्या अितके निघाले नाहींत. पण ती सुधारणा प्रत्यक्ष आचरणांत आणतांच जे प्रामाणिक आक्षेपक होते ते तीस अनुकूल होत चाललेले आणि वर सांगितल्याप्रमाणें जिकडे तिकडे तिचा अितका गौरव नि गाजावाजा झाला कीं, साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षामागून अध्यक्षांस प्रामुख्यानें त्या सुधारणेचा अुल्लेख आणि चर्चा करणें अपरिहार्य होअून बसलें. वर अुल्लेखिलेल्या प्रामाणिक आक्षेपकांपैकीं पुण्याच्या सन १९२७ च्या संमेलनाचे अध्यक्ष श्री. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांनीं या चळवळीचा अर्धा भाग जो अिंग्लीश शब्दांचें अुच्चाटण त्याचा अत्यंत अभिमानपूर्वक पुरस्कार केला आणि दुसरा भाग जो अुर्दू शब्दांचे अुच्चाटण त्याविषयीं त्यांची त्यावेळीं पूर्ण अनुकूलता नसताहि निःपक्षपातपणें मानलें कीं, "विदेशी शब्दाविरुद्धची मोहीम अगदींच निरर्थक ठरली असें नाहीं. कारण अलिकडे मराठी गद्यांत आणि पद्यांत मुसलमानी शब्दांस जी बेसुमार भरती आली होती, तिला त्या मोहिमेचा अुदय झाल्यापासून ओहोटी लागण्याची स्पष्ट चिन्हें दिसूं लागलीं आहेत. मराठी शब्दांतून मुसलमानी शब्दांस अर्धचंद्र मिळाला नाहीं तरी भाषेंत अुपयुक्त शब्दांची भर पडल्यावांचून राहणार नाहीं." श्री. कोल्हटकरांनीं अुर्दू शब्दांविरुद्धच्या या चढाअीविषयीं जे आक्षेप त्या भाषणांत घेतले, त्यांचेहि समाधान 'श्रद्धानंदाने' १६ जून १९२७ च्या आपल्या लेखांत* केलें. आणि त्यामुळें आपलें मत अनवश्यक अुर्दू शब्दांच्या बहिष्कारासहि पूर्ण अनुकूल झालें आहे असें श्री. कोल्हटकरांनीं अेका व्याख्यानांत सांगून स्वतः थांबून थांबून स्वदेशी शब्द योजीत अुर्दू शब्द भाषणांत न येअू देण्याचा यत्नहि त्याच प्रसंगीं प्रकटपणें केला.

त्या पुढचें साहित्य संमेलन बेळगांव येथें १९२८ च्या वर्षीं झालें. त्यांतहि त्या संमेलनाचे अध्यक्ष सुप्रसिद्ध 'काळ' कर्ते देशभक्त शिवरामपंत परांजपे यांनींहि ह्या भाषाशुद्धींच्या आंदोलनाविषयीं म्हटलें कीं, "आपल्या भाषेंत मिसळणारे मुसलमानी आणि अिंग्रजी शब्द आपल्या भाषेवरहि आपल्या प्रस्तुतच्या राजकीय पारतंत्र्याचा छाप नित्याचा मारून ठेवतात त्यामुळें हे शब्द आपणांस दुःसह होतात हें

* टीप :— हा लेख ह्या पुस्तकांत पृष्ठ ५८ ते ६७ वर छापला आहे.

कांहीं खोटें नव्हे. आपण व्याख्यानांतून टीक आहे पत्र व्यवहारांतून किंबहुना आपल्या घरांतील बोलण्यांतूनसुद्धां अिंग्रजी शब्द अतिशय वापरतों. या अुद्वेजक स्थितीनें अत्यंत अुद्विग्न होअून कै. राजवाडे यांनीं या अिंग्रजी जोखडाखालीं आणि जुलमाखालीं मराठी मरेल देखील अशी 'अतिस्नेहः पापशंकी' ह्या दृष्टीनें भीति प्रदर्शित केली. त्याचप्रमाणें जे मुसलमानांसहि सारख्याच रीतीनें भरडून काढणाऱ्या बिकट राजकीय परिस्थितींत हिंदूंशीं सहकार्य करीत नाहींत त्यांचे मुसलमानी शब्दहि आपल्या भाषेंत कशाला पाहिजेत अशा दृष्टीनीं देशभक्त सावरकर नि अितर कांहीं लोक अिंग्रजीबरोबर मुसलमानी शब्दांचेंहि आपल्या भाषेंतून अुच्चाटन करून टाकण्याचा अुद्योग करीत आहेत. युरोपांतील स्विझरलंड आणि अिटली यांवर अेकेकाळीं ऑस्ट्रियाचें राज्य चालू होतें. त्या परकीय राज्याचें जोखड झुगारून देअून स्वतःची स्वतंत्रता जेव्हां प्रस्थापित करण्याचा त्या वरील दोन देशांतील कांहीं संस्थानिकांनीं प्रयत्न आरंभिला, तेव्हां त्यांनींहि आपल्यावरील जुलमी राज्याच्या भाषेंतील शब्द आपल्या कोशांतून काढून टाकण्यास अशीच सुरवात केली. ग्रीक लोक १५२५ सालीं टर्कीच्या जुलमांतून सुटण्यासाठीं धडपडूं लागले तेव्हां त्यांनींहि टर्किश शब्दांना अर्धचंद्र देण्याचा अुपक्रम चालविला. हल्लींसुद्धां जर्मन लोक फ्रेंच भाषेचा अितका तिटकारा करतात कीं, आपलें अुत्तर फ्रेंच मनुष्यास समजो न समजो ते फ्रेंचांशीं जर्मन भाषेविना कधींहि बोलत नाहींत. तेव्हां पारतंत्र्याच्या तिटकाऱ्याच्या दृष्टीनें विश्वनाथ-पंत राजवाडे यांची काळजी आणि विनायकराव यांची अुद्योगशीलता लक्षांत घेण्यासारखी नाहीं असे कोण म्हणेल!" देशभक्त, 'काळ' कर्ते यांनीं जे दोन चार आक्षेपहि घेतले आहेत त्याचा विचार पुढें होणारच आहे.

यापुढचें साहित्यसंमेलन गोव्यास सन १९३० ला प्रा. वा. म. जोशी यांचे अध्यक्षतेखालीं भरलें. त्यांनीं आपल्या भाषणांत भाषाशुद्धीचा अुल्लेख करून "मराठी फारसी शब्दांचा हास्यास्पद संकर हा दोष आहे" असें बजावून श्री. कोल्हटकरांच्या मताप्रमाणेच आपलें मत असल्याचें सांगितलें. अर्थात कोल्हटकरांच्या वर अुद्धृत केलेल्या छेदकाप्रमाणें या आंदोलनाचा सुपरिणाम बऱ्याच अंशीं त्यांस मान्य असलाच पाहिजे. त्यांनीं घेतलेल्या आक्षेपांचाहि विचार पुढें करूं.

भाषाशुद्धीस्तव गेल्या पांच वर्षांत जे सक्रिय प्रयत्न करण्यांत आले आणि तिचा जो प्रसार झाला त्याच्या या त्रोटक समालोचनावरून अितकें तरी स्पष्ट होत आहे कीं, भाषाशुद्धीच्या आंदोलनामुळें मराठीवर "मोठें अरिष्ट कोसळेल" ही पूर्वीची पुष्कळजणांची भीति पार नाहींशी होअून अुलट आपल्या भाषेस आणि आपल्या

स्वाभिमानास अधिक पोषक होण्याचा तिचा सुपरिणामच अधिक संभवनीय आहे अशी आतां साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षांपासून तो शाळाकॉलेजांच्या विद्यार्थ्यांपर्यंत बहुतेकांची निश्चिति होत आली आहे. आतां संमेलनाध्यक्षांचे वर अुल्लेखिलेले आणि अितरहि जे आक्षेप अजूनहि मधून मधून डोकें वर काढतात त्यांतहि शेकडा ९० तरी भाषाशुद्धीच्या मूळ हेतूचें, मर्यादेचें आणि नियमांचें नीटसें ज्ञान होताच आपोआप निरस्त होण्यासारखे आहेत. तेव्हां त्यांस स्वतंत्र अुत्तर देत न बसतां भाषाशुद्धीचें स्वरूप अगदीं सूत्रमय रीतीनें येथें पुनः अेकदां सांगितलें असतां त्यांचें समाधान आपोआपच होअील असें जाणून तेवढें स्वरूप येथें देअूं.

भाषाशुद्धीच्या मुख्य अुद्देशाचें आणि मर्यादेचें सार आम्हीं सन १९२६ च्या वर्षींच प्रसिद्ध केलें. त्या पुस्तकांत पहिल्याच पानावर संकलितपणें जें दिलेलें आहे त्याचा भावार्थ हाच कीं—

१. आपले तदर्थक जुने अुत्तम शब्द असतांहि किंवा नवीन स्वकीय शब्द अुद्भावन करणें शक्य असतांहि त्या जुन्या शब्दांस लुप्त करून टाकणाऱ्या किंवा त्या नव्यांची नाकेबंदी करणाऱ्या आणि म्हणूनच अगदीं अनवश्यक असणाऱ्या विदेशी शब्दांस, मग ते अुर्दू असोत वा अिंग्लिश असोत वा अितर कोणतेहि असोत, स्वभाषेंत, निष्कारण वावरूं देअूं नये. आपला स्वकीय शब्द नामशेष करून विदेशी शब्द बोकाळू देणें हा कांहीं शब्दसंपत्ति वाढविण्याचा मार्ग नव्हे आणि औरस मुलांची कत्तल करून मुलगा दत्तक घेत सुटणें हा कांहीं वंशविस्ताराचा मार्ग नव्हे. (उदाहरणार्थ, लोकसभा, विधिमंडळ, प्रजासभा अित्यादि शब्द असतां ग्वाल्हेरप्रमाणें मजलिस-अी-आम या शब्दास कवटाळणें हा मूर्खपणा होय.)

२. परंतु ज्या वस्तु पूर्वीं आपल्यांत नव्हत्या किंवा ज्यांस आपले तितकेसे सुटसुटीत प्रतिशब्द निर्माण करणें सुलभ नाहीं अशा वस्तूंची वा पदार्थांचीं नांवें विदेशी विशेषनामाप्रमाणें विदेशी शब्दांनींच व्यक्त करण्यास प्रत्यवाय नाहीं. अशा विदेशी शब्दांनीं मात्र स्वकीयशब्दसंपत्ति वाढते खरीच. जसें गुलाब, कोट, सदरा, बूट, कॉलर, स्टोव्ह, पेन्सिल, स्टीमर अित्यादि. परंतु त्यांसहि जर कोणी अेखादा स्वकीय प्रतिशब्द काढला, तर वैकल्पिकपणें तोहि वापरल्यास प्रत्यवाय नाहीं. स्टीमरला कोणी आगनाव किंवा कोकणांत म्हणतात तसा 'बाफर' हा शब्द प्रचारांत आणला तर त्यांत रागावण्याचें काय कारण?

३. भाषाशुद्धीचेंच नव्हे तर सर्व सुधारणांचेंच मर्म असें असावें कीं, स्वकीय संस्कृतींत जें अुत्तम, कार्यक्षम वा हितकारक आहे त्याचा निष्कारण त्याग करूं नये

आणि विदेशी संस्कृतींतील आपल्यांत नाही असें जें अुत्तम, जें कार्यक्षम आणि जें हितकारक तें सकारण स्वीकारण्यास कचरूं नये.

या समालोचनाच्या प्रस्तावाचे शेवटीं भाषाशुद्धीच्या नियमांची आणि मर्यादांची जी त्रोटक रूपरेषा दिली, ती नीट लक्षांत घेतां या चळवळीवर पूर्वी घेतले गेलेले आणि अजूनहि तिच्या स्वरूपाच्या अर्धवट ज्ञानामुळें घेण्यांत येत असलेले बहुतेक आक्षेप आपोआपच गळून पडतात, हें सहजच दिसून येअील. यावरहि जर कोणास ती चळवळ कांहीं कारणाकरितां आक्षेपार्ह वाटेल तर त्यांनीं प्रथमतः आमचें 'भाषा-शुद्धीकरण' हें स्वतंत्रपणें प्रसिद्ध झालेलें पुस्तक अवश्य वाचावें. कारण त्यांत ह्या सर्व आक्षेपांचें पूर्वीच निरसन केलेलें आहे. ह्या समालोचनांतल्या आक्षेपांची तींच तीं अुत्तरें देण्याची पुनरुक्ति करीत बसण्याचा मुळींच हेतु नाहीं. आणि त्याची आवश्य-कताहि नाहीं. गेल्या पांच वर्षांत ह्या चळवळीमुळें आपल्या भाषेचें वाढलेलें शब्दबळ आणि आत्मविश्वास हाच ह्या चळवळीचें हितकारकत्व सिद्ध करण्याचा अखंडनीय प्रत्यक्ष पुरावा आहे. आणि म्हणून तिच्या ह्या सुपरिणामाचें संकलित दिग्दर्शन करण्यापुरतेंच आणि झालेल्या कार्याचा आढावा काढून पुढें तेंच धोरण चालविणें कितीं हितकारक आहे तें दाखविण्यासाठींच काय तें हें समालोचन केलेलें आहे.

आपल्या भाषेच्या ह्या वाढलेल्या स्वकीय शब्दबळाची साधारण कल्पना येण्या-साठीं या चळवळीच्या प्रभावानें आणि विशेषतः श्रद्धानंद पत्राच्या द्वारें जे शेंकडों स्वकीय नवीन शब्द मराठींत लिहिण्यांत आणि बोलण्यांत प्रचलित किंवा निदान परिचित तरी झाले, त्यांपैकीं कांहीं शब्द थोड्या स्पष्टीकरणासह देत आहों : त्वर्य (urgent). विधिमंडळ (कायदे कौन्सिल). विधिसभिति (लेजिस्लेटिव्ह असेंब्ली). अधोरेखित (under lined). पुरस्कार, लिखाणावळ पुरस्कार (honourarium Remuneration). स्तंभ (कॉलम). आनुषंगक (डॅश). निक्षेप (ट्रस्ट). विश्वस्त (ट्रस्टी; जसें–केसरी संस्थेचा निक्षेप करून त्याचें विश्वस्त मंडळ नेमण्यांत आलें.). दैनिकी, आन्हिकी (डायरी). क्रमांक (हा शब्द आमच्या ज्येष्ठ बंधूंनीं अंदमानांत सुचविला; नंबर.) छेदक (परिग्राफ). टाचण, बाड (फाअील). शुल्क (हा शब्द हिंदी बंगालींत रूढ होता. फी). ग्रंथ-विक्रेता (बुकसेलर). समास, कोर (मार्जिन). हुतात्मा (हा शब्द अंदमानांत आम्हांस सुचला; मराठींतून तो आतां हिंदी, बंगाली प्रभृति भाषांतहि रूढ झाला आहे. Martyr या अिंग्लिश किंवा 'शहीद' ह्या अुर्दू शब्दां-हूनहि अुदात्ततर अर्थ 'हुत' या पदांतील यज्ञ संस्थेच्या ध्वनीनें सूचित होतो. हिंदुभाषासंघांतील अेक मोठी अुणीव ह्या शब्दानें दूर केली.). प्रतिवृत्त (रिपोर्ट). धिक्कार (शेम. सभांतून ह्या शब्दाचा अुपयोग व्हावा. तो गर्जनानुकूलहि आहे.).

पुनरत्व. (वन्स मोअर या शब्दाचा नाटकगृहांतून अुपयोग व्हावा. तोहि गर्जनानुकूल आहे.) प्रमाणपत्र (सर्टिफिकेट). अर्थात् (अुर्फ. जसें माधवराव नारायण अुर्फ सवाअी माधवराव न म्हणतां माधवराव नारायण अर्थात् सवाअी माधवराव म्हणावें). अिच्छुक (अुमेदवार). अुपस्थित, अुपस्थिति (हिंदी बंगालींत रूढ आहेत. हजर, हजेरी). अनुपस्थिती (गैरहजेरी). निर्बंध, नैर्बंधिक, निर्बंध पंडित अित्यादि (कायदा, कायदेशीर, कायदेपंडित अित्यादि. कायदा या शब्दासारख्या समाजाच्या मूळ आधाराचाच भाव प्रदर्शित करणाऱ्या पदार्थास आमचा स्वकीय अेकहि शब्द आज प्रचलित नसावा याहून भाषेची परवशता ती कोणती! विदेशी शब्द स्वकीय शब्दांस आमूलात् कसे नामशेष करितात त्याचें हें प्रत्यंतर पहा! ज्या भाषेंत आणि ज्या राष्ट्रांत "तानि धर्माणि प्रथमान्यासन्" ज्यांत जगांतील पहिल्यांतील पहिलें 'Code' तीं धर्मसूत्रें, त्या स्मृति रचिल्या गेल्या त्यांना आतां विदेशी शब्दांवांचून 'कायद्या'ची कल्पना व्यक्तविणें अशक्य होअून गेलें आहे. सगळाच हिंदुभाषासंघ या प्रकरणीं अेकजात दरिद्री! राज्य परक्यांचे हातीं गेलें तेव्हांच 'कायदा' गेला–तो शब्द देखील वांचवितां आला नाहीं. आतां तो कलंक शब्दापुरता तरी धुवूं या. निर्बंध शब्द हा कायदा शब्दांतील सर्व अर्थ आणि ध्वनिहि व्यक्त करतो. तेव्हां तोच त्यासाठीं राखून ठेवावा; आज तो तसा परिचितहि होत आहे. केसरी प्रभृति पत्रांतूनहि निर्बंधभंग हा कायदेभंग शब्दाचा प्रतिशब्द म्हणून येतो. हिंदींतहि तो शिरत आहे. तेव्हां आतां तोच रूढ व्हावा.) निर्बंधशास्त्र (कायदेशास्त्र). राजवट, सत्ताकाल (कारकीर्द). स्थायीनिधि, स्थिरनिधि (कायमनिधि). राजबंदी (पोलिटिकल प्रिझनर. हा शब्द जन्मठेप पुस्तकानें प्रचलित केला.) प्रकट सभा (जाहीर सभा) अंतस्थ सभा (Private meeting) अंतस्थ, व्यक्तिगत, घरगुती (Private खाजगी.)

अशा आणखी शें-दोनशें नवीन स्वकीय शब्दांची भर गेल्या पांच वर्षांत प्रमुखतः या भाषाशुद्धीच्या आंदोलनानें पडली आहे. पण ते सर्व कांहीं येथें देतां येणार नाहींत.

## जुन्या शब्दांचें पुनरुज्जीवन

भाषाशुद्धीनें स्वकीय नवीन शब्दांची भर घालण्याचें हें अेक कार्य जसें केलें, तसेंच आपले जे जुने शब्द निष्कारण लुप्तप्राय होत चाललेले होते त्यांचें पुनरुज्जीवन करण्याचें दुसरें महत्त्वाचें कार्यहि तितक्याच प्रबळतेनें केलें. हल्लीं शिवाय, जरूर, कबूल हे विदेशी शब्द घरांत बायकामुलांच्या तोंडीं देखील सारखे रुळलेले असून आपले तदर्थक असणारे अनेक जुने शब्द 'सध्यां, वाचून, विना, मान्य, संमत,

अवश्य' चुकून देखील बोलण्यात येअीनासे झाले आहेत. मुली लपंडाव खेळतांना देखील 'रेडी' शब्द वापरतांना आढळतात! जुने खेळांतील सावध, पडला, मारला अित्यादि छानदार शब्द मुळींच जात चालले आणि रेडी, आअूट हे जिकडे तिकडे बोकाळले. अुदाहरणार्थ बेळगांवचे संमेलनाध्यक्षांच्या भाषणाच्या अेका पानांत 'जरूर' हा शब्द चारदा पांचदां आला आहे; पण पर्याय म्हणून देखील 'अवश्य' हा आपला तदर्थक शब्द अेकदांहि आला नाहीं. खालील टिपणींत दिग्दर्शनार्थ दिलेले सर्व विदेशी शब्द याच प्रकारांत मोडतात. त्यांचे पर्याय असलेले आपले स्वतःचे जुने शब्द आपण नियमपूर्वक वापरावे. आणि त्यांस मारून शिरजोर होअू पाहाणाऱ्या विदेशी शब्दास बहिष्कृत करावें. कारण ते भाषेंतून साफ गेलें तरी आपली कांहीं अेक हानि होणारी नाहीं. जुने स्वकीय शब्द मारून विदेशी शब्द निष्कारण वापरणें मूर्खपणाचें आहे. हाच भाषाशुद्धीचा मुख्य कटाक्ष आहे.

बहिष्कार्य शब्दांचीं अुदाहरणें–बद्दल (संबंधीं, विषयीं) हा शब्द बेळगांच संमेलनाध्यक्षांच्या भाषणाचे पहिल्याच पानांत चार ओळींत चारदां आला आहे. पण तदर्थक स्वकीय शब्द संबंधीं, विषयीं अित्यादि ते मुळींच आले नाहींत! शिवाय (विना, वांचून, व्यतिरिक्त, आणखी) कायम (स्थिर, स्थायी, नित्य, नेहमीचें) अगर (जरी, किंवा, वा) अब्रू (लौकिक, मान, प्रतिष्ठा) अिलाज (अुपाय साधन) अिमानी (प्रामाणिक, विश्वास्य) अिमारत (घर, वाडा, आलय, भवन, गृह, निकेतन असे किती तरी शब्द पण जिथें तिथें अिमारत हा विदेशी शब्द काय तो बोकाळलेला.) कबूल (मान्य, संमत) अैपत (सामर्थ्य, योग्यता, शक्ति) गुदस्ता (गतवर्षी) कमाल (धन्य, पराकाष्ठा, परिसीमा, परमावधि) किंमत (मूल्य, मोल, पुस्तकावर किंमत लिहिली तरच तें पुस्तक विकण्यास अनुज्ञा मिळते अशी सर्वसाधारण समजूत दिसते! चुकून देखील पुस्तकावर कोणी 'मूल्य' अमुक म्हणून छापीत नाहीं जो तो 'किंमत' छापतो) हकीगत (वृत्त, वृत्तांत, माहिती) तर्फे (बतीनें) दोस्त (मित्र, स्नेही, वयस्य, सोबती संवगडी आणखी पाटीभर शब्द आहेत; पण कांहीं 'शाहीरां'ना दोस्त म्हटल्यावांचून प्रेमाचा पान्हा फुटतच नाहीं.) दिलगिरी (दुःख, शोक, खेद, अनुताप) अव्वलपासून अखेर (अथपासून अितिपर्यंत.) जमीन–अस्मान (आकाश–पाताळ) सालमजकूर (चालू वर्ष) साल-गुदस्त (गतवर्ष.) माजी (विगत) मंजूर (मान्य, संमत) हवामान (वायुमान, ऋतुमान) हवा पालट (वारा पालट) हवापाणी (वारापाणी, जलवायु. हिंदी बंगालींत रूढ.) गरीब (दीन, बापुडा, सालस, बिचारा) मेहेरबान (कृपावंत) मेहरबानी (कृपा, दया, आभार, अुपकार.)

या आणि अशा अनेक अनवश्यक विदेशी शब्दांचा प्रचार गेल्या पांच वर्षांत पुष्कळ अंशीं कमी होऊन आपल्या तदर्थक जुन्या स्वकीय शब्दांचें त्या प्रमाणांत पुनरुज्जीवन होत चाललें. अशा रीतीनें अनेक स्वकीय शब्दांची भर पाडून आणि जुने स्वकीय शब्दहि पुनरुज्जीवित करून आपल्या भाषेचें शब्दबळ त्या चळवळीनें अुलट वाढविलें आहे. ही गोष्ट अशी अनुभवान्तीं निर्विवादपणें सिद्ध होत आहे. ह्या अेकंदर सर्व परिणामांस विचारांत घेअून ह्या समालोचनावरून हें स्पष्ट होतें कीं, मराठीस परकीय अनवश्यक शब्दांच्या मारक पीडेपासून मुक्त करून तिचें स्वकीय शब्दबळ अुलट प्रवर्धमान करणारी असली विस्तृत आणि जाणीव चळवळ आजवर केव्हांहि झाली नव्हती. मराठीचे अंगीं मुरलेल्या अुर्दू शब्दांचे रोगावर तर शिवाजीमहाराजानंतर शस्त्रक्रिया अशी हीच झाली!

अर्थात प्रत्यक्ष अनुभवाअंती अितक्या हितकारक ठरलेल्या या भाषाशुद्धीचें व्रत आतां आपण सर्वांनीं यापुढें आणि यांहूनहि नेटानें चालविलें पाहिजे. भाषेमध्यें परकी शब्द जे असे डोअीजड होअून स्वकीय शब्द नामशेष करूं शकतात ते अेका ठरलेल्या पद्धतीनें होत. ती पद्धत अशी कीं, आपण हयगयीनें, केव्हां निरुपाय म्हणून आणि केव्हां केव्हां तर केवळ अैट म्हणून कांहीं परकीय शब्द भाषेंत वापरूं लागतों. ते जितके अधिक वापरले जातात तितके तदर्थक आपले असणारे शब्द मागें पड-तात आणि तो भाव त्या विदेशी शब्दानींच व्यक्त करण्याची संवय पडते. पुढें तो भाव त्यावांचून व्यक्तच होत नाहींसें वाटतें. आणि ते विदेशी शब्द असे अेकदां रूढ झाले म्हणजे मग ते जुने, ते पचले, ते आपलेच झाले अशा खुळ्या ममत्वानें त्यांना काढण्याचा प्रयत्न कोणी करूं लागला कीं तो नकोसा वाटतो. पण त्यापायीं आपले होते ते स्वकीय शब्द नाहींसे झाले याचें कोणासच कांहीं वाटत नाहीं? तेव्हां विदेशी शब्द घरांत ज्या चोरवाटेनें आजवर घुसूं शकले ती ही मूळच्या "हयगयीची" वाट आतां पूर्णपणें बंद करून टाकली पाहिजे. यापूर्वींचे जुने निष्का-रण घुसलेले विदेशी शब्द तर हुसकून देअूच देअूं; पण आपण आतां विदेशी शब्दांस आजवर आंत येणारें जें चोरदार अुघडकीस आलें आहे त्यावरहि कडक पाहारा ठेवूं. आपला स्वकीय शब्द असतां किंवा संस्कृतासारख्या शब्दप्रसवक्षम आणि सुसंपन्न अशा आपल्या देव–वाणींतून–रत्नखाणींतून तो निर्माण करतां येत असतां विदेशी शब्द त्या "हयगयीच्या" चोरवाटेनें प्रथम आंत येअू द्यावयाचाच नाहीं. थट्टेची क्षणिक अनुज्ञा देअून देखील त्यास आंत घुसूं द्यावयाचा नाहीं असें सर्वांनीं व्रत घेतलें पाहिजे.

ह्या 'हयगयीचें' अगदीं ताजें अुदाहरण हवें असेल तर हा 'अिंकलाब झिंदाबाद' अैका! हिंदूंतच नव्हे तर मुसलमानांतहि हजारीं अेकासहि ह्याचा अर्थ कळेना पण तरीहि मुसलमान ओरडतात म्हणून गांवोगांव हिंदूहि तेच ओरडतात. अेका चांगल्या प्रौढ व्यापाऱ्यास परवां हेतुतः विचारलें 'आतां तुम्ही गर्जत आहां त्या अिंकलाब झिंदाबादचा अर्थ काय?" तो हंसून म्हणाला, 'अर्थ! झिंदाबाद! आपला राष्ट्रीय झेंडा बाद असा कांहींसा मी समजतों!!!' पंजाबमध्ये सुशिक्षित हिंदूंची—त्यांनीं अशीच 'हयगय' करण्याचें पाप आपणांहूनहि फारच भयंकर प्रमाणावर शतकों-शतक केल्यानें त्यांची—मूळची हिंदु भाषा निर्जीव होअून आज अुर्दू हीच सार्वजनिक प्रौढीची भाषा झाली आहे. त्यामुळें तिकडे क्रांति चिरायु होवो! क्रांतीकी जय! ह्या गर्जनेपेक्षां अिंकलाब झिंदाबाद ! ही गर्जनाच अधिक फैलावली आहे. मुसलमान तर वन्दे मातरम् देखील म्हणणार नाहींत मग क्रांतीकी जय कसले म्हणतात! त्यांनीं अिकडेहि अिंकलाब झिंदाबाद गर्जविला. पण मुसलमान हिंदु भाषीय गर्जना जाणूनबूजून टाळतात तर त्या दुराग्रहाला टोला देण्यासाठीं तरी आपण आपली स्वकीय गर्जनाच करूं असें हिंदूंना कांहीं वाटलें नाहीं. अितका पीळ असता तर मग ते हिंदु कसले? तेहि लागले मेंढरासारखे अिंकलाब झिंदाबाद ओरडायला क्रांति चिरायु होवो! चिरंजीव क्रांति!' किंवा 'क्रांती की जय' ह्या आजवर दुमदुमणाऱ्या आपल्या स्वकीय गर्जना मागें पडून आतां जर ही झिंदाबादीच बोकाळली तर ती भावना त्याच शब्दांस चिकटत जाणार. पुढें कांहीं शहाणे म्हणणार त्या झिंदाबादेवांचून तो भाव व्यक्तच होत नाहीं बुवा! आणि दहा वर्षांत सर्वच लोक म्हणणार हा शब्द जूना झाला, आपलाच झाला, राहूं द्या त्याला झालें! पण या पायीं आपली 'क्रांति चिरायु होवो' ही गर्जना—हा शब्द—परका झाला, ठार झाला, गेला, ह्याची वाट काय? यास्तव आपण जरी प्रथमपासूनच 'क्रांति चिरायु होवो!' 'चिरंजीव क्रांति! किंवा 'क्रांती की जय' हे आजहि चैतन्यप्रद, गर्जनाक्षम आणि सर्वस्वीं अर्थपूर्ण असलेले शब्दच वापरावे मग तिकडे मुसलमान कांहींहि ओरडोत. गर्जनांकडे आम्ही येथें भाषाशुद्धी पुरतेंच पहातों आहोंत. त्यांच्या राजकीय अर्थाशीं आणि त्या गर्जनांच्या योग्यायोग्यतेशीं आमचा येथें कांहींहि संबंध नाहीं. गर्जावयाचेंच तर निदान स्वकीय शब्दास व्यवहारा अेवढेंच विषय येथें प्रस्तुत आहे.*

---

** हा लेख १९३१ मध्ये वीर सावरकरांनी लिहिला तेव्हां त्यांना राजकारणांत भाग घेण्याची बंदी होती. म्हणून त्यांनीं ही चर्चा शब्दांचे अर्थांपुरतीच असल्याचे स्पष्ट केले.*

परंतु अशा प्रकारची घातक हयगय या भाषाशुद्धीच्या नाकेबंदीमुळें आतां विरळा घडते हीच नवी गोष्ट आहे. कारण तो पिकेटर हा शब्द पहा बंगालींत विदेशी नवीन शब्द तात्काळ बहिष्कृत होतात. तसा तोहि बहिष्कृत होऊन त्याला "निरोधक" निरोधन असे फक्कड शब्द योजले गेले. आणि त्यांच्या करवीं मराठींतहि त्या वेळ्या पिकेटरवरच पिकेटिंग होऊन त्यास त्या विदेशी कापडाच्या गठ्ठ्यांसहच झटपट बहिष्कृत करण्यांत आलें. निरोधक आणि निरोधन हे शब्द बोलतां बोलतां रूढ होत आहेत अशीच सावधानता आपण अेकसारखी ठेवली पाहिजे.

आतां या गेल्या पांच वर्षांचे समालोचनाचे शेवटीं येत्या सहाव्या वर्षासाठीं या चळवळीचा कार्यक्रम आणि धोरण काय असावें तेंहि दिग्दर्शनापुरतें सुचवून हा लेख संपवूं.

१. परकीय शब्दहि केव्हां घ्यावे तो नियम मागें स्पष्टपणें दिलाच आहे. तेवढा अपवाद सोडून आपण सर्वांनीं स्वकीय शब्दच वापरावे. यापुढें तरी कोणीहि मित्राला फ्रेंड' विण्याचा किंवा भावाला 'ब्रदर'विण्याचा आचरटपणा करूं नये. स्वकीय शब्दांची व्याख्या हीच कीं संस्कृतोत्पन्न ज्या अनेक प्राकृत भाषा किंवा तामिलप्रभृति द्राविडादिक भाषा आपल्या हिंदु लोकांत या देशांत मूळपासून प्रचलित आहेत त्या हिंदु भाषासंघांतील सर्व शब्द आपणास स्वकीयच आहेत हें अैकून अेका विद्वान माणसास बरेंच हसूं कोसळलें होतें आणि त्या माणसाने मासिकांतून विचारलें होतें कीं, 'काय हो, हिंदुभाषासंघ म्हणजे काय? भाषेला देखील धर्म असतो कीं काय?' त्यांस आमचें अितकेंच सांगणें आहे कीं, आपण पुढें आपल्या त्याच लेखांत 'हिंदुस्थान' हा शब्द वापरलेला आहांत तो पाहून आम्हांसहि तसेंच हसूं कोसळलें आणि विचारावेंसें वाटलें कीं, हिंदुस्थान, म्हणजे काय? स्थानाला–दगडमाती–झाडपाल्यांच्या या सांठवणीलाहि धर्म असतो कीं काय? पण जर तसें कांहीं नसून हिंदुलोक परंपरेनें ज्यांत राहतात तें स्थान हिंदुस्थान अशा अर्थी आपण तो शब्द योजला असाल तर हिंदुलोक परंपरागत ज्या भाषा बोलतात तो हिंदुभाषासंघ अितकें कळण्यापुरतीहि विद्वत्ता आपल्या अंगीं आहेच तर!

२. ज्या गांवीं बहुतेक मराठीच जाणणारे लोक असतात अशा गांवीं 'वॉशिंग कंपनी' 'हेअर कटिंग सलून' 'वॉच रिपेअरिंग' अशा पाट्या अगदीं अडाण्या दुकानदारापर्यंत लावण्याची जी खोड पडली आहे ती तात्काळ सोडली जावी. मराठी पाट्या तेथें लावाव्या. म्हणजे गिऱ्हाअिकांस समजणें हा जो पाट्यांचा मूळ अुद्देश तो साधेल.

भाषाशुद्धीकरितांच नव्हे पण त्यांच्या धंद्याच्या हिताकरितांच मराठी भाषेतील पाट्या लावाव्या! तसेंच अशा ठिकाणच्या विधिज्ञांनीं आपल्या दारावर "Out" "In" असें अिंग्रजी लिहिण्याची हास्यास्पद खोड सोडून 'बाहेर'—'आंत' असें मराठी लिहावें. स्वतःस कळावें अेवढ्यासाठीं तें नसेल आणि लोकांस कळावें म्हणून जर तें तसें लिहिलें जात असेल तर मराठी जाणणाऱ्या लोकांची संख्या जिथें बहुतेक असणार तिथें ते शब्द मराठीच लिहिणें बरें हेंहि सांगावें लागतें! त्याप्रमाणें नांवांचीं अद्याक्षरें मराठींत लिहावी. अेस. व्ही. फडक असें लिहिण्याची खोड सोडून स. वि. फडके, अित्यादि लिहावें.

३. शब्दकोशमंडळानें प्रत्येक रूढ विदेशी शब्द देतांना त्यांच्या प्रतिशब्दांचे स्थानीं अेक वा अनेक कोणचे तरी तदर्थक स्वकीय शब्द अवश्य द्यावे. आणि दुसरें असें कीं महानुभावादिक आणि अगदी मागधी महाराष्ट्रीय वाङ्मयांतीलहि जे जुने शब्द आजच्या विदेशी शब्दांनीं लुप्त केलेले आढळतील वा त्यांना आज प्रतिशब्द होण्यास योग्यसे वाटतील ते सारे पुनरुज्जीवित करून त्या त्या विदेशी शब्दांस प्रतिशब्द म्हणून त्यांपुढें द्यावे. यायोगें शब्दसंपत्ति रक्षणाच्या कार्यासह तें कोशमंडळ सहजगत्या स्वकीय-शब्दबळ विवर्धनाचें कार्यहि करूं शकेल. परिभाषा मंडळानेंहि हेंच धोरण ठेवावें.

४. शेवटीं ज्या ज्या जुन्या पत्रकारांनीं आणि लेखकांनीं अनावश्यक असे नवे वा जुने विदेशी शब्द टाळण्याचा प्रयत्न करण्यांत अजूनहि दुर्लक्ष केलेलें आहे त्यांनीं तें यापुढें तरी तसें न करतां शक्य तों तोंडांत वा लेखणींत बसलेले विदेशी शब्द बहिष्कृत करा-वेच करावे. अनेक लेखक हें करणें अिष्ट हें मनांतल्या मनांत जाणतात पण त्यांची संवकलेली भाषा बदलणें आतां अगदी अवघड जातें म्हणूनच काय ते ते अघडपणें या गोष्टीचा पुरस्कार करीत नाहींत. पण त्यांस आम्ही अनेक ठिकाणीं अनुभवून पाहिलेली अेक सोपी पद्धत सांगतों. प्रथम लेख नेहमींप्रमाणें लिहून काढावा, म्हणजे हा शब्द अुर्दू कीं अिंग्लिश या ससेमिऱ्यानें प्रतिपदीं त्यांच्या विचाराचा ओघ खंडणार नाहीं आणि मग आपण अुपमुद्रित (प्रुफें) अन्वेक्षितों तसें तें लिखाण केवळ विदेशी शब्दांच्या दृष्टीनें बघून टाकावें. म्हणजे पटपट ते ते शब्द शुभ्र चादरीवर ढेंकूण नेमके सांप-डावे तसे सांपडतील. आणि लेखणीनें टोंचतांच चिरडले जातील. असें पांचसहादां झालें कीं, मग ते मुळीं लिहितांनाच येअीनासे होतील.

५. वरील सूचनांप्रमाणें सर्वांनींच अधिकतम चिकाटीनें आणि निर्धारानें विदेशी शब्द बहिष्काराचें व्रत भागानगरी (निजाम हैद्राबाद), वऱ्हाड, ग्वाल्हेर, भडोच या

प्रांतांतील महाराष्ट्रीय यांनीं आचरण्याची पराकाष्ठा करावी कारण मराठींत उर्दू प्रभृति विदेशी शब्द घुसण्याचें संकट तिकडूनच ओढवण्याचा अधिक संभव केव्हांहि असणार.

● ●

## आमची राष्ट्रभाषा आणि भाषाशुद्धि *

भारतीय राज्य घटनेच्या ३४३ व्या छेदकाप्रमाणें (article प्रमाणें) 'देवनागरींत लिहिलेली हिंदी ही राष्ट्रभाषा होय' असें निर्धारिलेलें आहे.

परंतु ह्या छेदकाला त्याच्याखालीं 'जर, तर, तथापि अित्यादी अुपाधींच्या अितक्या जळवा लावलेल्या आहेत कीं, जर त्यांना तसेंच राहूं दिलें तर त्या मूळ घोषणेला रक्त-क्षयाची बाधा झाल्याविना राहणार नाही. आणि शेवटी हिंदी ही राष्ट्रभाषा न होतां प्रत्यक्षांत ती याने हिंदुस्थानी' तरी होअील किंवा आणखी शेंपन्नास वर्षें आज चालू असलेली अिंग्रजीच राज्यभाषेचें पद बळकावून बसेल.

### अुर्दूनिष्ठ पक्षाच्या आग्रहानें हिंदुस्थानीचा नामनिर्देश

लोकांत सामान्य समज असा पसरलेला दिसतो कीं, घटनेप्रमाणें अिंग्रजी आणखी फार फार तर पंधरा वर्षेंच काय ती राज्यभाषा म्हणून नांदूं शकेल; पण ही चूक आहे. वरील ३४३ व्या छेदकाच्या तिसऱ्या अनुच्छेदकांतच (Clause मध्येंच) हें ठासून सांगितलेलें आहे की, लोकसभेला वाटलें तर पंधरा वर्षांनंतरहि अिंग्रजी हीच राज्यभाषा म्हणून चालू ठेवतां येअील, म्हणजे तें कृत्य घटनाबाह्य म्हणून मुळांतच निषिद्धिलेलें नाहीं. तीच गोष्ट अुर्दूनिष्ठ 'याने हिंदुस्थानी'ची आहे. हिंदी ही राज्य भाषा आहे असें म्हणत म्हणत पुढें छेदक ३५१ मध्यें स्पष्टपणें ग्रथिलेलें आहे कीं, "हिंदी भाषेला संपन्न नि समृद्ध करण्यासाठीं 'हिंदुस्थानी' भाषेंतील रूपें, शैली नि मोड हिंदींत आत्मसात् केलीं जावींत!" श्री. नेहरूंच्या अुर्दूनिष्ठ पक्षाच्या आग्रहामुळेंच 'हिंदुस्थानी'चा हा नामनिर्देशपूर्वक विशिष्ट अुल्लेख हिंदीसह करण्यांत आला हें सांगावयास नकोच.

### हा ठराव असा डळमळीत कां झाला?

राष्ट्रभाषेविषयींचा हा असा डळमळीत नि गुळमुळीत ठराव कां करण्यांत आला हें ध्यानीं येण्यासाठीं ह्या विषयाची पूर्वपीठिकाच थोडीशी पाहिली पाहिजे. साधारणतः श्रीस्वामी दयानंदजींपासून हिंदुस्थानची राष्ट्रभाषा हिंदी नि लिपि

---

* *लेखाची मूळ प्रसिद्धी 'केसरी' मध्यें दि. ७ आणि १४ जानेवारी १९५१ ला.*

देवनागरी असावी असा प्रचार अनेक हिंदु पुढाऱ्यांकडून चालू झाला होता; परंतु खिलाफतीच्या चळवळीला अनुचलून धरण्याची घोडचूक जेव्हां कांग्रेसनें केली तेव्हां मुस्लिमांचें प्रस्थ कांग्रेसमध्यें माजूं लागलें. ती संधि साधून मुस्लिमांनी त्यांच्या अितर स्वार्थसाधू मागण्यांमध्येंच हीहि मागणी ठामपणें केली कीं, जर तुम्हाला हिंदू-मुस्लिमांची अेकी पाहिजे असेल तर अुर्दू हीच तुम्ही राष्ट्रभाषा म्हणून मानली पाहिजे. ह्या हिंदी नि अुर्दू अशा दोन्ही पक्षांचा समन्वय आपण सहज साधूं शकूं अशा हिरीरीनें, तोपर्यंत केवळ 'हिंदी' हीच राष्ट्रभाषा होय असें म्हणत आलेल्या गांधीजींनीं अशी तोड सुचविली कीं, अुर्दू-शब्द-बहुल अशी जी 'हिंदुस्थानी' नावांची बोली लखनौच्या बाजूला सर्वसाधारणतः हिंदु-मुसलमान लोक चालचलाअु व्यवहारासाठीं बोलतात तिलाच राष्ट्रभाषा ठरवावी; आणि ती देवनागरी नि अुर्दू अशा दोनहि लिप्यांत लिहिली जावी. मुस्लिमांनी अर्थातच ही तडजोड मानली नाही. परंतु गांधीजींच्याच अध्यक्षतेखालीं भरलेल्या हिंदी साहित्य संमेलनांत गांधीजींच्या आग्रहानें 'हिंदुस्थानी' हीच राष्ट्रभाषा होय, असा ठराव संमत करून घेण्यांत आला. अितकेंच नव्हे तर, 'हिंदी याने हिंदुस्थानी' असें त्या राष्ट्रभाषेचें नामकरणहि करून टाकले ! अर्थात अुर्दू-शब्द-बहुल जी हिंदुस्थानी तिलाच हिंदी म्हणावयाची पाळी आली; आणि प्रत्यक्ष हिंदी साहित्य संमेलनानेंच तो ठराव केला !

## 'संस्कृतनिष्ठ' हें विशेषण कां लावावें लागतें ?

तेव्हां ज्या हिंदीला आम्ही आमची राष्ट्रभाषा करूं अिच्छितों ती ही 'हिंदी याने हिंदुस्थानी' नव्हे असें स्पष्टपणें दिग्दर्शविण्यास्तव हिंदीच्या सत्यस्वरूपास आरशासारखें प्रतिबिंबविणारें, तिच्या नांवाविषयीं झालेल्या साऱ्या वैचारिक गोंधळास निरसणारें आणि ज्या हिंदीस आम्हीं राष्ट्रभाषा मानतों तिची ओळख चटकन अेका शब्दांत पटवूं शकणारें 'संस्कृतनिष्ठ' हें व्यावर्तक विशेषण आम्हीच प्रथमतः तिला लावलें आणि 'संस्कृतनिष्ठ हिंदी हीच आमची राष्ट्रभाषा नि देवनागरी हीच आमची राष्ट्रलिपि' अशी घोषणा केली. लगोलग हिंदुमहासभेनें नि बहुतेक हिंदुत्वनिष्ठ संस्थांनीं तीच अुचलून धरली.

## महाराष्ट्रीय मंडळींचा पुढाकार

थोड्याच दिवसांत 'हिंदी साहित्य संमेलन' हि शुद्धीवर आलें आणि 'याने हिंदुस्थानी' सहच गांधीजींना ती संस्था सोडावी लागली. तेव्हांपासून अेका बाजूला 'संस्कृतनिष्ठ हिंदी'चा प्रचार धूमधडाक्यानें हिंदुस्थानभर चालू झाला. ज्या प्रांतांची मातृभाषाच हिंदी होती त्या प्रांतांतील कांग्रेसी मंडळींतहि बहुतेक लोक आंतून नि श्रीयुत टंडनजींसारखे पुढारी प्रकटपणेंहि संस्कृतनिष्ठ हिंदीचाच प्रचार नि पुरस्कार

करूं लागले. तें साहजिकच होतें; परंतु मातृभाषा हिंदी नसतांहि हिंदीभाषीय प्रांताअितकाच कट्टरपणें जर कोण्या प्रांतानें संस्कृतनिष्ठ हिंदीचाच पुरस्कार नि प्रचार केला असेल, तर तो आपल्या महाराष्ट्र प्रांतांतील हिंदुत्वनिष्ठांनीं होय. अबोहर, हरिद्वार, जयपूर, मुंबअी प्रभृति नगरांत भरलेल्या हिंदी साहित्य संमेलनाच्या प्रसंगीं नि अितर प्रसंगीं अुर्दूनिष्ठ 'हिंदुस्थानी' पक्षाच्या कारवाया हाणून पाडण्याच्या कामी ह्या महाराष्ट्रीय मंडळींचा नेहमी पुढाकार असे.

## अिंग्रजी हें खरें वादकेंद्र नव्हे!

शेवटीं राज्य-घटना-समितींत राजर्षि टंडन यांच्या नेतृत्वाखालीं 'संस्कृतनिष्ठ हिंदी' हीच राष्ट्रभाषा ठरविण्यासाठीं प्रबळ अुठावणी झाली. अुर्दूनिष्ठ 'हिंदुस्थानी'च्या पक्षांत आज ज्यांच्या हातीं राजसत्ता आहे अशा कॉंग्रेसी अधिकाऱ्यांची नि मौलाना आझादांसारख्या मुसलमानी सभासदांची फळी श्री. नेहरूंच्या नेतृत्वाखालीं तिचा पाडाव करण्याचा प्रयत्न करूं लागली. राष्ट्रभाषेच्या ठरावाच्या प्रकरणीं खरें वादकेंद्र अिंग्रजी हें नव्हतें; कारण अिंग्रजी ही भारताची नित्याची राष्ट्रभाषा म्हणून घटनेंतच नोंदवून टाकावी असें म्हणण्याचें साहस श्री. नेहरूसुद्धां करूं शकत नव्हते. अिंग्रजी अेक तेवढे घेतलेंच पाहिजेत अितक्याच बिक्षिप्त हट्टावारी त्यांना स्वतःचें समाधान करून घ्यावें लागलें. अुलटपक्षीं अिंग्रजीची आजच्या आज हकालपट्टी करणें हें राष्ट्रीय व्यवहाराच्या दृष्टीनेंच अनिष्ट नि अशक्य आहे हें हिंदीचा पक्षहि जाणून होता म्हणून अिंग्रजी ही राज्यव्यवहारांत आणखी पंधरा वर्षें राहूं द्यावी हा ह्या ठरावांतील भाग सर्वांनीं निरुपाय म्हणून अेकमतें स्वीकारला. पण खरा मतभेद जो होता तो संस्कृत-निष्ठ हिंदी कीं अुर्दूनिष्ठ हिंदुस्तानी याच प्रकरणीं होता. तो वाद शेवटीं किती विकोपास गेला हें सर्वश्रुतच आहे. अंतीं निरुपाय म्हणून दोन्ही पक्षांना रडतकढत 'जर, तर, तथापि, परंतु' अित्यादि अुपाधींच्या चौकटींत कोंबलेल्या तडजोडीनेंच काय तो मिटवितां आला; ती तडजोड म्हणजेच ह्या राष्ट्रभाषेचा ठराव! या कारणामुळेंच तो असा डळमळीत नि गुळमुळीत झालेला आहे.

## अेकाचा विजय असला तरी दुसऱ्यांचा पराजय खास नव्हे

त्यांत 'संस्कृतनिष्ठ हिंदी हीच आमची राष्ट्रभाषा होय' असें व्यावर्तक निर्धारानें म्हटलेलें नसून 'देवनागरींत लिहिली जाणारी हिंदी' अेवढेंच म्हटलेलें आहे. आजहि शेंकडों अुर्दू शब्द देवनागरींत लिहितां येतील. त्यांतहि पुढें 'हिंदुस्तानी' भाषेंतील शब्दच नव्हेत तर रूपें, शैली, मोड हींहि हिंदींत आत्मसात करावी असें अेक अुंटाचें पिल्लूहि घुसडलें आहे. पुन्हां ह्या राष्ट्रभाषेविषयींच्या ठरावाचें वारंवार समीक्षण करून त्यांत आलटापालट करण्यासाठीं योग्य वाटल्यास समीक्षण -समित्या

(कमिट्या) नेमण्याचा जो अधिकार राष्ट्राध्यक्षांना देण्यांत आलेला आहे त्यांत जी गोम आहे ती वेगळीच; पण स्थलाभावामुळें तो भाग नुसता अुल्लेखून, अितकेंच सांगणें पुरें आहे कीं, हा ठराव हिंदी पक्षाचा विजय जरी असला तरी 'त्यानें हिंदुस्तानी' पक्षाचा पराजयहि नाहीं! जर 'संस्कृतनिष्ठ हिंदी' पक्षानें यापुढेंहि प्रचाराचें, आचाराचें नि प्रयत्नांचें प्रबळ आंदोलन दसपट वेगानें चालू ठेवलें नाहीं तर ठरावांतील नांव जरी हिंदी राहिलें तरी वस्तुतः ती 'हिंदुस्तानी'च बनल्यावांचून राहणार नाहीं. पुनः पंधरा वर्षांच्या आंत अिंग्रजीला पदच्युत करावयाची आहे तेंहि 'संस्कृतनिष्ठ हिंदी' पक्षालाच करावें लागेल, हें ध्यानांत धरा. श्री. नेहरू, मौलाना आझाद अित्यादि तशा प्रवृत्तींची मंडळी अिंग्रजीला राज्यव्यवहारांतहि शक्य तितकें दीर्घायुष्य चिंतणारीच आहेत हें विसरतां कामा नये.

## घटनेला भीक न घालतां अुर्दुनिष्ठ 'हिंदुस्थानी'चें पाताळ यंत्र चालू झालें सुद्धा !

हिंदी राष्ट्रभाषा करणाऱ्या ठरावाची शाअी वाळते न वाळते तोंच हिंदुस्तानीचा राष्ट्रभाषा म्हणून प्रचार करणारी अेक अखिल भारतीय संस्था त्या पक्षानें स्थापिली आहे. तिच्यामध्यें आज ज्यांच्या हातीं राजसत्ता आहे असे मोठमोठे मंत्री नि नृपांगणगत खलांचे तांडेच्या तांडे प्रांताप्रांतांतून शिरलेले आहेत. त्यांना मुसलमानी संस्थांचें सहकार्य अर्थातच लाभणारें आहे. कॉंग्रेसपक्षीय पुढाऱ्यांच्या हातीं असलेल्या निरनिराळ्या नांवांच्या निधींतून तशा संस्थेला भरपूर द्रव्यसाहाय्य मिळणारें आहे. शाळेंतील पाठ्य पुस्तकांतूनच हिंदी म्हणत म्हणत अुर्दूनिष्ठ हिंदुस्तानी भाषा घालावी, ज्या प्रांताचे शिक्षणमंत्री त्यांच्या मताचे किंवा त्यांच्या हातचे आहेत, त्या त्या प्रांतांत तींच पाठ्य पुस्तकें चालू करवावींत आणि अशा रीतीनें अुगवती पिढीची पिढीच अुर्दू शब्द-बहुल 'हिंदुस्तानी'च्या ढाळांतून ओतून काढावी असा त्यांचा अेक रोकडा डाव आहे. ह्या मुद्यांशीं असलेल्या विचारसरणीची स्फुटशः (तपशीलवार) कल्पना यावी, यास्तव कांहीं अुदाहरणें पुरावा म्हणून देत आहों. अर्थात ज्या अर्थीं ही माहिती वृत्तपत्रांतील वृत्तान्तांवरून बहुशः घेतलेली आहे त्या अर्थीं तींत कानामात्रा न्यूनाधिक असूं शकेल; परंतु अवान्तर पुराव्यांवरून ती वस्तुस्थितीची यथावत् रूपरेखा तरी प्रदर्शवीत आहे हें निश्चित.

## मराठीच्या माजघरांतच काय चाललें आहे?

हिंदुस्थानीचा प्रचार करण्याच्या अुद्देशानेंच सांगूनसवरून काढलेल्या अखिल भारतीय संस्थेचीच अेक प्रत असलेली महाराष्ट्र राष्ट्रभाषा प्रचार सभा मराठीच्या ह्या माजघरांतच स्थापिलेली आहे. ह्या सभेचें स्वतःचें मत असें आहे कीं, राष्ट्रभाषेला

हिंदी न म्हणतां हिंदुस्तानी म्हणावें; आणि राष्ट्रलिपीच्या प्रकरणीं देवनागरीप्रमाणेंच रोमन आणि अरबी ह्या लिपींचा पण 'अिस्तेमाल' केला जावा. मुंबअी प्रांताचे शिक्षण विभागाचे वरिष्ठाधिकारी नि मुख्यमंत्री असलेले माननीय बाळाराव खेर हेहि स्वतः 'हिंदुस्तानी कल्चर सोसायटी, अलाहाबाद,' या संस्थेचे सदस्य आहेत. ह्या संस्थेचें ध्येयहि अुर्दूशब्दमिश्रित हिंदुस्तानी ही राष्ट्रभाषा आणि अुर्दूलिपी नि नागरी-लिपी ह्या दोन्ही राष्ट्रलिप्या असाव्यात असेंच आहे. अन्थातच, मुंबअी प्रांतासाठी जी पाठ्यक्रम समिती माननीय खेरांच्या हातीं असलेल्या मुंबअीच्या शिक्षणविभागानें अेवढ्यांत नेमली आहे, तिच्या सहा सभासदांपैकी तीन सभासद वरील हिंदुस्तानी-निष्ठ 'महाराष्ट्र–राष्ट्रभाषा–प्रचारसभे'चे सदस्य असावेत आणि आज कित्येक वर्षे हिंदी राष्ट्रभाषेचा प्रचार महाराष्ट्रांत अधिकृतपणें करीत असलेल्या भारतीय हिंदी–साहित्य–संमेलनासारख्या प्रमुख संस्थेचा किंवा महाराष्ट्र राष्ट्रभाषा समितीच्या हिंदी प्रचार संघ पुणें यासारख्या प्रांतिक संस्थांचा अेकहि सदस्य त्या हिंदी पाठ्यक्रम समितीवर मुंबअी सरकारकडून नेमला जाअू नये, असा अन्याय न घडता तरच आश्चर्य! पुनः मुंबअी प्रांतांत घटनेनें ठरविलेल्या हिंदी या राष्ट्रभाषेचें शिक्षण विद्यार्थ्यांना देण्यासाठीं जो अभ्यासक्रम नि पाठ्यपुस्तकें ठरावयाचीं तीं ठरविण्यासाठीं नेमलेल्या या समितीचे अध्यक्ष कोणाला नेमले म्हणतां? तर महामहोपाध्याय पोत-दारांना. त्यांनीं पुण्यास अेका सभेंत अलीकडेच असें प्रकटपणें सांगितलें कीं, "यद्यपि घटनेंत जरी असें सांगितलें असलें कीं आमची राष्ट्रभाषा हिंदी आहे तथापि तिचें स्वरूप रहाणार हिंदुस्तानीच! आणि आमच्या पाठ्यक्रम ठरविणाऱ्या ह्या समितीचें कार्यहि चालणार तें त्याच धोरणानें!" हा वृत्तपत्रांतील अुतारा आहे. त्यामुळें आम्हांला जरी नसली तरी कांहीं मंडळींना अशी अंधुक आशा वाटत आहे कीं, हें भाषण आझादांसारख्या कोण्या मौलानाचें असावें आणि अेखाद्या खोडकर बातमी-दारानें श्रीयुत पोतदाराच्या तोंडीं तें घातलें असावें. नाहीं तर संस्कृतनिष्ठ हिंदीचा अितका तिटकारा नि अुर्दूनिष्ठतेचा अितका दुराग्रह पुण्याच्या अेका महाराष्ट्रीय विद्वानाला नि त्यांतहि अेका महामहोपाध्याय महाशयांना वाटावा तरी कां नि कसा! पण हें भाषण जर बिनचूक असलें तर ह्या सरकारी समितीकडून जीं पाठ्यपुस्तकें मुंबअी प्रांतांतील हिंदी राष्ट्रभाषेचीं म्हणून नेमली जाणार ती बिहार सरकारनें त्याचे शिक्षणमंत्री डॉ. सैय्यद महंमद यांच्याकडून रचवून शाळांतून घुसडविलेल्या 'बादशहा राम, बेगम सीता नि अुस्ताद वसिष्ठ' छापाचींच असणार हें अुघड आहे.

तथापि या प्रकरणीं सर्वांवर कडी केली आहे काकाराव कालेलकरांनीं. हे सद्-गृहस्थ 'हिंदुस्थानी तालीम' प्रभृति अुर्दूनिष्ठ संस्थांचे प्रमुख पुढारी आहेत. गेल्या

महिन्यांतच राजकोटला अेका राष्ट्रीय शाळेंत भरलेल्या प्रकट सभेंत ते म्हणाले कीं यद्यपि घटना समितीने 'हिंदी' वर राष्ट्रभाषेची मोहोर मारली असली तरीहि आम्ही बापूजींच्याच (गांधीजींच्याच) मार्गानें जाणार. हिंदी नव्हे हिंदुस्थानी म्हणजे अुत्तर हिंदमध्यें जी अुर्दूमिश्रीत भाषा बोलली जाते ती 'हिंदुस्थानीच' काय ती राष्ट्रभाषा होय नि अुर्दूलिपी हीहि राष्ट्रलिपि होय! बापूजींची दृष्टि म्हणजे केवळ आत्मदर्शन! त्यांना हें स्वच्छ दिसत होतें कीं, अुर्दू लिपि नि तींत लिहिलेली अुर्दूनिष्ठ हिंदुस्थानी भाषा ही स्वीकारण्यानेंच हिंदमध्यें संस्कृतींचा समन्वय साधतो" या वाक्यांत चुकून दोनचार शब्द तोंडांतून निसटून गेले म्हणूनच कीं काय ती चूक सुधारून ते लगेच म्हणाले, "कौमी अेकदिली है!" अितकेंच नव्हे तर जर आपण अुर्दू लिपि नि अुर्दूनिष्ठ हिंदुस्थानी भाषा नि राष्ट्रलिपी नि राष्ट्रभाषा म्हणून स्वीकारूं तर त्या द्वारा "अुभ्या आशियाचें संघटन साधूं शकूं !"

आले का ध्यानांत! संबंध अेशियाचें संघटन अं! —अुर्दू लिपि नि अुर्दूनिष्ठ हिंदुस्थानी भाषा आम्ही स्वीकारली कीं साधूं शकूं! निःसंशय बापूजींच्या 'आत्म दर्शनाने' आपला वरहस्त कालेलकर महाशयांच्या मस्तकावर केव्हां तरी ठेवलेला असलाच पाहिजे.

परंतु ज्यांच्यावर असला प्रसंग केव्हांहि गुदरलेला नाहीं, त्यांना अशा विधानाचें रहस्य सहसा समजूं नये हें बुद्धिमत्तेला साजेसेंच आहे. कारण आजच्या भूगोलाप्रमाणें अशियाच्या अेका टोकांस मूळ अरबी भाषा नि लिपिलाच दंडनीय ठरवून ज्याने हिब्रु भाषा नि लिपि राष्ट्रीय ठरविली तें अिस्रायल राष्ट्र आहे. तेथपासून तो थेट जपानपर्यंत रशियन हीच सार्‍या कम्युनिस्ट जगताची विश्वभाषा करून सोडण्याचा चंग बांधलेल्या सोवियट रशियानें आशियाचा सारा अुत्तर पट्टा व्यापून टाकलेला आहे. पुढें जपान, त्याच्याखालीं चिनी भाषा-भाषी तो विस्तीर्ण चीन देश पसरलेला! ह्या अुण्यापुर्‍या तीनचतुर्थांश आशिया खंडांत ह्याची लखनौकडच्या बाजारांतून तेवढी बोलली जाणारी 'हिंदुस्थानी' बोली नि अुर्दू लिपि कोणच्या झाडाचा पाला आहे हें सुद्धां कोणास ठाअूक नाहीं. अुरलेल्या टीचभर भारताबाहेरील आशियांत अफगाण, अिराण, अरबस्तान नि पाकिस्तान हे विती विती येवढाले मुस्लीम देश अुरतात. त्यांतहि अेक पाकिस्तान सोडलें तर बाकीच्यांत 'हिंदुस्थानी' अुर्दू भाषेंत लिहिली तरी कोणास समजणें अशक्य. तेव्हां संघटन सोडाच पण साध्या विचारविनिमयापुरती तरी संबंध अेशियांत अुर्दूनिष्ठ हिंदुस्थानी कोणास समजूं शकत असेल तर ती अेकट्या पाकिस्तानांत काय ती होय! त्या पाकिस्तानालाच बहुधा कालेलकर महाशय संबंध आशिया म्हणून समजत असावेत. तरच काय तें 'अुर्दूभाषा नि अुर्दूलिपि

स्वीकारल्यास सबंध आशियाचें संघटन साधतां येअील' या कालेलकरांच्या वाक्याचा कांहीं अन्वय तरी करूं शकेल; त्याचा अर्थ कळण्याची अपेक्षा कोणीच धरलेली नाहीं. किंबहुना ज्या संप्रदायाला खिलाफत म्हणजेच स्वराज्य हें राजकीय समीकरण पूर्वी पटलें त्यालाच आज 'पाकिस्तान म्हणजेच आशिया' हें भौगोलिक समीकरणहि पटावें ह्यांत अधिक अनर्थक विक्षिप्तपणा असा कोणताच नाहीं!

## आणखी अेक गंमत

तथापि ज्यांना हिंदु शब्द अुच्चारतांच विंचू डसावा तशा वेदना होतात, स्वदेशाला अिंडिया म्हणण्यांत ज्यांना जागतिक प्रतिष्ठा वाटते, पण त्याला हिंदुस्थान म्हणणें हा मात्र जातीय हलकटपणा वाटतो तोच श्री. नेहरूंपासून तो काकाराव कालेलकरांपर्यंतचा निधर्मी संप्रदाय आज राष्ट्रभाषेच्या प्रश्नापुरतां कां होअीना. आमची राष्ट्रभाषा अुर्दूनिष्ठ हिंदुस्तानी, हिंदुस्तानी, हिंदुस्तानी' असा टाहो फोडतांना पाहून आम्हांस कितीतरी गंमत कांहींशी धन्यता नि किंचित् आशाहि वाटल्यावांचून राहात नाही. वाल्मिकीची गोष्ट नाहीं कां सांगत! कीं तो थोर पुरुष मरा, मरा असा अुलटा अुचार करीत असतां राम, राम, राम असा अुच्चार करूं लागला आणि त्याच न कळत पुण्याअीनें पुढे त्याचें अंतःकरण निवळलें. तसेंच कदाचित अुर्दूनिष्ठ भाषेचे मिषानें कां होअीना पण 'हिंदुस्तानी हिंदुस्तानी' असा टाहो फोडीत असतां त्यांच्या मुखांतून होणाऱ्या हिंदु, हिंदुस्थान, ह्या पवित्र नामघोषाच्या नकळत पुण्याअीनें हे आमचे वाट चुकलेले देशभक्तही हिंदुद्वेषाच्या पापापासून मुक्त होण्याचा योगायोग असेल? वामन पंडितांनीं म्हटलेंच आहे कीं, 'न कळतां पद अग्नीवरी। पडे न करि दाह असें न कधीं घडे॥ अजित नाम वदो भलत्या मिसें। सकळ पातक भस्म करीतसें॥

## अुर्दुनिष्ठ हिंदुस्तानीच्या या प्लेगावर रामबाण औषध म्हणजे भाषाशुद्धि!

अुर्दूनिष्ठ हिंदुस्तानीलाच राष्ट्रभाषा आणि अुर्दूला जोड राष्ट्रलिपि करण्यासाठीं चाललेल्या ज्या कूट यत्नाचा वर अुल्लेख केला आहे तो केवळ दिग्दर्शनापुरता आहे. यापेक्षां फारच मोठ्या प्रमाणावर हिंदुस्थानभर या पक्षाचे संघटित प्रयत्न चाललेले आहेत. त्यांना आजच्या सत्ताधाऱ्यांपैकीं अनेकांनीं पाठिंबा दिलेला असून आपल्या हातीं असलेल्या सत्ताकेंद्राच्या बळावर ते शाळाविभागांतून अुर्दूचा प्रचार करीत आहेत अशा वेळीं, 'राष्ट्रभाषा हिंदी झालीच आहे' अशी आत्मवंचक निश्चिंति केवळ घटनेंतील ठरावाच्या आधारावर बाळगून संस्कृतनिष्ठ हिंदीच्या पुरस्कर्त्यांनी स्वस्थ बसतां कामा नये. त्यांनींसुद्धा आपली प्रबळ संघटना करून हा अुर्दूनिष्ठ हिंदुस्तानीचा

प्रचार नि प्रयत्न वेळींच हाणून पाडला पाहिजे, तो हाणून पाडण्याचें परिणामकारक साधन म्हणजे भाषाशुद्धि ! भाषाशुद्धीचें आंदोलन अखिल भारतीय प्रमाणावर प्रबळपणें फोफावलें, तरच संस्कृतनिष्ठ हिंदी ही राष्ट्रभाषा वस्तुतः होअू शकेल, तें कसें तें पुढें पाहूं.

अुर्दूनिष्ठ 'हिंदुस्तानी' ही राष्ट्रभाषा आणि अुर्दू लिपि ही जोड राष्ट्रलिपि करून सोडण्यासाठीं अेका प्रबळ गटाच्या कसून प्रयत्न चाललेला आहे हें येथपर्यंत सांगितलेंच आहे.

हा गट सोडला असतां 'संस्कृतनिष्ठ' ह्या व्यावर्तक विशेषणास बुजणारा आणि स्वतःस मध्यम म्हणून म्हणविणारा दुसरा अेक गट आहे. त्यांना हिंदी ही राष्ट्रभाषा नि देवनागरी हीच राष्ट्रलिपि व्हावी हें मान्य आहे. पण हिंदी म्हणजे कशा प्रकारची हिंदी या विषयींच्या त्यांच्या कल्पना गोंधळलेल्या आहेत. अुदाहरणार्थ राष्ट्रपति डॉ. राजेंद्रप्रसाद अेका भाषणांत म्हणाले, 'जी सर्वसाधारण लोकांत बोलली लिहिली जाते ती हिंदीच राष्ट्रभाषा होय.' पण 'लोकांत' म्हणजे कोणच्या लोकांत? लखनौच्या बाजूला बोलल्या जाणाऱ्या हिंदींत अरबी, पर्शियन शब्द शेंकडा पन्नासपर्यंत आढळतात. तिकडची लिहिली जाणारी हिंदी म्हणजे तर जवळजवळ देवनागरींत लिहिलेली अुर्दूच म्हणायची. विवाहालासुद्धां बायकासुद्धां 'शादी' म्हणतात आणि देवाला 'हे मालिक' किंवा 'खुदा'! अुलटपक्षीं बनारसच्या आसपास बोलल्या लिहिल्या जाणाऱ्या हिंदींत संस्कृत शब्दांचें प्रमाण अुणेंपुरें शेंकडा पंचाहत्तरपर्यंत पडतें. ती हिंदी महाराष्ट्र–बंगाल प्रभृति प्रांतांना नुसती अैकून सुद्धां बहुधा समजूं शकते. दुसरें अुदाहरण मुंबअीचे गृहमंत्री श्री. मुरारजीभाअी देसाअी ह्यांचें. ते अलिकडेच म्हणाले, 'अहो, संस्कृत शब्द हिंदींत घ्यावे म्हणजे काय? घेतलेच पाहिजेत. पण भाषेंत आधींच रुळलेले अुर्दू, अिंग्रजी परकीय शब्द बळेंच काढून टाकावेत अशा मतास माझा विरोध आहे.

## रुळलेल्या परकीय शब्दांची मालिका

परंतु आज रुळलेले परकीय शब्द म्हणजे कोणते नि किती? हिंदी-भाषीय प्रांतांतील कोणत्याहि नगरांत पाअुल टाका. राजमार्गांत दोन्हीं बाजूंनीं 'क्लॉथ स्टोअर्स', 'जनरल मर्चंट', 'डेअरी', 'राजपाल अँड सन्स बुकसेलर', 'कृष्णमॅन्शन' 'आयस्पेशालिस्ट', 'हेअर कटिंग सलून', 'श्रीराम वॉशिंग कंपनी' अशा पाट्यांच्या रांगाच्या रांगा आढळून येतील. 'कचेरी'त पाअुल टाका; 'कायदा, मामलेदार, फौजदार, हवालात, जामीन, हुकुमनामा, वकील, फिर्याद' अित्यादि अुर्दू शब्दांचा अेकच धुमाकूळ अुडालेला. कोर्टांत पाअुल टाका; 'लॉ, पिनलकोड, पिटिशन, अपेलेट, सेक्शन, जजमेंट, अपील, बाररूम प्रभृति अिंग्रजी शब्दांचा पाअुस पडूं लागेल. घरांत

जा; 'आअुट, अिन' च्या पाट्या खोल्यांवर, कुटुंबांत 'मिसेस, मिस्टर, फादर, वालिद, औरत, वाअिफ, मॅरेज, सेरिमनी' प्रभृति शब्द स्त्री-पुरुषांच्या तोंडीं रुळलेले, संभाषणात दोन हिंदी शब्दांमधून तीन अुर्दू वा अिंग्रजी शब्द खच्चून भरलेले, रूढ झालेले तिथं विज्ञानाच्या परिभाषेची गोष्ट काय सांगावी ?

अिंग्रजी शब्दांवांचून विचार व्यक्तविणेंच तिथें दुर्घट अितके ते वैज्ञानिक परकीय शब्द 'आज रुळलेले', तेव्हा 'आज रुळलेले परकीय शब्द मात्र राष्ट्रीय भाषेतून वळें काढू नका' म्हणणें म्हणजे अठरा धान्यांचें कडबोळें झालेल्या या आजच्या बाजारु नि बाटग्या हिंदीसच राष्ट्रभाषेच्या प्रौढ नि पवित्र पीठावर स्थापा असेंच म्हणण्यासारखे आहे. यास्तव 'संस्कृतनिष्ठ' विशेषणांस बुजणाऱ्या या माध्यमिक पक्षाच्या त्या राष्ट्रभाषेच्या स्वरूपासंबंधींच्या व्याख्याहि भोंगळसुती आहेत. तथापि हिंदी देवनागरी स्वीकारण्याविषयीं त्यांचा मूलगामी विरोध नसल्यामुळें 'संस्कृतनिष्ठ' म्हणजे काय ह्याची अधिक फोड करून सांगितल्यास त्यांच्यांतील पुष्कळांची समजूत पटून ते 'संस्कृतनिष्ठ हिंदी हीच आमची राष्ट्रभाषा' या मताचे होण्याचा अुत्कट संभव आहे. ती फोड पुढे करीतच आहों.

## अुर्दू नि हिंदी यांतील मुलभूत प्रभेद

अुर्दू नि हिंदी ह्यात खरा प्रभेद काय आहे हें स्पष्टपणें कोणी सहसा सांगत नसल्यामुळें बहुतेक लोकांना यांतील निवड करण्याचा वाद अेवढा कां माजवावा हेंच कळत नाहीं. मराठी किंवा तामीळ आणि हिंदी ह्यांत मुलगामी भेद नाहीं; पण अुर्दू नि हिंदी ह्यांतील प्रभेद मूलगामी आहे. त्यांचे व्याकरण बहुतांशी अेक असलें तरी त्या दोघी दोन भिन्न संस्कृतींच्या प्रतीक आहेत. अुर्दू – तिलाच हिंदुस्थानी हें छद्मी नांव पडलेलें आहे–ही मुस्लीम संस्कृतीतून जन्मली असल्यामुळें तिच्यावर अरबी कुराण = पराणांची, संदर्भाची, संकेताची, मनोवृत्तीची छाया घनदाटपणें पडलेली असणारच. तिच्यांत अरबीपर्शियन शब्दांची रेलचेल असणारच. अुर्दूचा पिंडच मुस्लीम – अरबी आहे यास्तव ती आम्हांस परकी वाटणारच. तिला आम्ही आमच्या हिंदुस्थानची, हिंदुराष्ट्राची, राष्ट्रभाषा म्हणून केव्हांहि मानणार नाही. अुलटपक्षी हिंदी ही हिंदु संस्कृतीच्या कुशींतून जन्मलेली, संस्कृतच्या दुधावर जोपासलेली, तिचा पिंड, प्रवृत्ती, भावभावना, संदर्भ, संकेत, कोश, काया आमच्या भारतीय जीवनाशीं समरस झालेल्या ! यास्तवच ती हिंदी आम्हांस आमची स्वकीय भाषा वाटते तिला आम्ही आमच्या हिंदुस्थानची राष्ट्रीय भाषा जें आनंदानें मानूं शकतों तेंहि यास्तव हें स्पष्टपणें सांगून टाकणें कर्तव्यच म्हणून तें सांगून टाकीत आहोंत.

## भाषाशुद्धींची सूत्रें

वरील प्रभेद ध्यानांत घेतला म्हणजे राष्ट्रभाषा हिंदी ही संस्कृतनिष्ठच कां असली पाहिजे तेंहि आपोआपच स्पष्ट होतें आणि संस्कृतनिष्ठतेचें साधन म्हणजे भाषा शुद्धीचा अवलंब.

जेव्हा सन १९२४ मध्यें आम्हीं भाषा शुद्धीचें आंदोलन प्रकटपणें चालू केलें, तेव्हां 'भाषाशुद्धि' नांवाची अेक पुस्तिका छापली होती. तिच्या पहिल्याच पानावर भाषाशुद्धीचीं मुख्य सूत्रें ठसठशीतपणे ग्रथिलीं. तेव्हांपासून त्याची यथेच्छ चर्चा महाराष्ट्रांत वारंवार झालेली आहे. आम्ही तेव्हापासूनच हेंहि वारंवार सांगत आलों कीं, जेव्हा केव्हा हिंदी ही आमची राष्ट्रभाषा अधिकृतपणें ठरविली जाअील तेव्हा तिची घडण नि विकास हाहि याच सूत्रानुरोधें करण्यासाठीं हें भाषाशुद्धीचें आंदोलन अखिल भारतीय प्रमाणावर चालवावें लागेल तो चिरकांक्षित समय आज आला आहे. यास्तव आतां राज्यघटनेअन्वयेंच अधिकृतपणें राष्ट्रभाषा ठरलेल्या त्या हिंदीच्या अनुरोधें भाषाशुद्धीचीं ती मुख्य सूत्रें खाली देत आहोंत.

१. गीर्वाण भाषेतील साराचा सारा संस्कृत शब्दसंभार आणि संस्कृतनिष्ठ अशा तामीळ, तेलगू, कानडी ते थेट काश्मिरी – आसामीपर्यंत ज्या आमच्या प्रांतिक भाषाभगिनी आहेत त्या सर्वांतील मूळचे प्राकृत शब्द हें आमच्या राष्ट्रभाषेच्या शब्दकोशाचें मूलधन, स्वकीय शब्दांचें भाडवल आहे.

२. जगांतील कोणत्याही भाषेपेक्षां आपल्या संस्कृत भाषेची सृजनशक्ति अितकी बलवत्तर आहे; अुपसर्ग, प्रत्यय, संधि, समास, धातुसंपत्तिप्रभृति साधनें तिच्यांत अितकीं विपुल आहेत की अर्वाचीन विज्ञानाची अबाढव्य परिभाषा सांगोपांग व्यक्तविणारे नवे नि आटोपशीर शब्द त्या संस्कृतमधून सहज निर्मितां येतात. यास्तव त्या अद्यतन विज्ञानास अनुवादितांना ती सारी परकीय परिभाषा आम्ही आमचे नवे नवे संस्कृतोत्पन्न शब्द पाडून व्यक्तविली पाहिजे.

३. त्याचप्रमाणें जगांतील कोणत्याही परकीय भाषेंत जर अेखादी शैली, वाक्यप्रचार, मोड हीं सरस वा चटकदार आढळली तर तीहि आत्मसात् करून आपल्या राष्ट्रभाषेत अवश्य अनुसरिली जावी.

थोडक्यांत असें सांगतां येअील कीं, अनावश्यक असा अेकहि अुर्दू किंवा अिंग्रजी प्रभृति परकीय शब्द हिंदींत जुना झाला असला तरी राहूं देअू नये. नवा असला तरी येअू देअू नये. पण अवश्य ते परकीय शब्द वापरण्यास प्रत्यवाय नाहीं; मग

ते जुने असोत वा नवे. अवश्य कोणते नि अनावश्यक कोणते त्यांची कसोटी या लेखाच्या प्रारंभी अुल्लेखिलेल्या सूत्रांवरून पारखून घ्यावी. माध्यमिक पक्षाचेंहि या लक्षणांनीं समाधान होअील अशी आशा वाटते.

भाषाशुद्धीच्या वरील नियमानुसार जिची घडण घडविलेली असेल तिला आम्ही 'संस्कृत-निष्ठ हिंदी' म्हणतों. आमच्या भारतीय राष्ट्राची राष्ट्रभाषा म्हणून तीच काय ती शोभूं शकेल.

## प्रयोगसिद्ध पुरावा

भाषाशुद्धीवरील आक्षेप–प्रत्याक्षेपांच्या वादाची महाराष्ट्रांत पहिल्या दहा वर्षांत जी वावटळ अुठावयाची ती अुठून गेली आणि आतां मराठी साहित्यांत ती अेक चिरस्थायी नि सहज प्रवृत्तिच होअुन बसली आहे. परंतु हिंदीमध्ये हें आंदोलन तीव्रतेने असें आतांच चालू झालें असल्यामुळें महाराष्ट्रांत आज नाहींसे झालेले ते प्राथमिक आक्षेप हिंदी प्रांतांत नव्यानेच काढण्यांत येअून वाद माजावा हें सहाजिकच आहे. संस्कृतनिष्ठता हा अतिरेक आहे, संस्कृत परिभाषा अगडबंब असते, त्यामुळें भाषा बोजड होते, संस्कृत नवे शब्द रुळविणें अशक्य, परकीय शब्दांना अन्वर्थक शब्दच सांपडत नाहींत अित्यादि शंकाकुशंकांची लाट तिकडे अुसळली आहे. हा लेख हिंदीमध्येंहि भाषांतरीत होण्याचा संभव असल्याने ह्या आक्षेपांविषयीं आम्हीं अितकेंच सांगतों कीं त्या आक्षेपकांना वरील प्रकारची भीति खरोखरीच वाटत असेल तर त्यांनीं भाषाशुद्धीच्या मराठीवर झालेल्या सुपरिणामाचा खालील प्रयोगसिद्ध पुरावा तेवढा जरी पाहिला तरी त्यांची ती भीती दूर होअील. आमच्या स्वतःच्या अनुभवापुरतें जरी पाहिले तरी गेल्या वीस वर्षांत भाषाशुद्धीच्या दृष्टीनें चारशें पांचशें स्वकीय शब्द तरी मराठींत आम्ही नव्याने पाडले किंवा जुने पुनः प्रचारविले. अर्थात तितक्या अुर्दू वा अिंग्रजी परशब्दांना खो दिला. हे नवे संस्कृतनिष्ठ शब्द बहुतेक मराठींत आज अितके रुळून गेलेले आहेत कीं ते गेल्या दहाअेक वर्षांत आम्ही हेतुतः नव्यानें पाडलेले आहेत हें उगवत्या पिढीस सांगितलें तरी सहसा खरे वाटत नाहीं. त्याचा धाअुक पुरावा अितकाच देतां येअील कीं, सन १९२४ च्या पूर्वीचीं मराठी वृत्तपत्रें नि मराठी साहित्य चाळून पहावें म्हणजे झालें. त्यांत ह्या शब्दांतील बहुतेक स्वकीय शब्द मुळींच आढळणार नाहींत आणि जे अगदीं थोडे आढळतील ते अपवादापुरतेच. त्या शेंकडो शब्दांपैकीं वानगीपुरते कांहीं शब्द खालीं देत आहोंत ते पहा. *

---

* *मुळच्या लेखांत हे 'वानगी'साठीं जे शब्द दिलेले आहेत ते सर्व आतां इतर शब्दांसह अेकत्र करून या पुस्तकाच्या शेवटी जो भाषाशुद्धि शब्दकोष दिला आहे त्यांतच ते अेकत्र प्रसिद्ध केले आहेत. ते वाचकांनीं पहावे.*

शंभर शंभर वर्षे भाषेंत रुळलेले अनावश्यक शब्द नामशेष करून अेका दहा वर्षांत हे बहुतेक स्वकीय शब्द मराठींत रुळलेच कीं नाहींत ? चिकाटी हवी अितकेंच काय तें ! ह्या मराठीच्या प्रयोगसिद्ध पुराव्यानें अुत्साहित होअून रिकामटेकडे आक्षेप काढीत न बसतां आमच्या हिंदी भाषिकांनीं भाषाशुद्धीचें आंदोलन गेल्या स्वदेशी आंदोलनासारखें वादळी वेगानें फैलावून सोडावें, अुर्दू अिंग्रजीच्या मगर-मिठींतून सोडवून हिंदीला पूर्ण संस्कृतनिष्ठ नि संपन्न करून सोडावी. तसें म्हणावें तर स्वामी दयानंदजींपासून कित्येक हिंदी लेखकांनीं संस्कृतनिष्ठ हिंदी कटाक्षानें लिहिलेली आहे. पण तें व्यक्तिशः झालें. आतां संस्कृतनिष्ठतेची सांघिक नि अखिल भारतीय अुठावणी अशा प्रबळपणें केली पाहिजे कीं 'याने हिंदुस्तानी'च्या बंडाचा न भूतो न भविष्यति असा बोजवारा अुडून जावा !

## डॉ. रघुवीर

त्यांतहि आतां हिंदीला संस्कृतनिष्ठ राष्ट्रभाषेचें कार्य करण्याअितकी समर्थ, संपन्न नि सर्वांगपूर्ण करण्याचें कार्य अंगावर घेण्यास डॉ. रघुवीरांसारखे कार्यकर्ते पुढें येत आहेत. ही अेका अर्थीं भाषाशुद्धीच्या आंदोलनाची सफलताच होय. संस्कृतनिष्ठ परिभाषा निर्मिण्यास जे जे गुण अवश्य ते ते सर्व ज्यांच्या ठायीं अुत्कटतेनें निवसत आहेत त्या डॉ. रघुवीरांनीं राज्यघटनेचेंहि हिंदींत भाषांतर केलेलें असून दैनंदिन राज्यव्यवहारास्तव 'आंग्ल भारतीय प्रशासन शब्दकोश'हि प्रसिद्धिला आहे. त्याचप्रमाणें वाअीच्या तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनीं राज्यघटनेचें भाषांतर संस्कृतमध्येंच केलेलें आहे. हे दोन्ही ग्रंथ भाषाशुद्धीच्या दृष्टीनें सध्यां बहुमोल आहेत. त्यांचें समालोचन करण्यासाठीं अेक स्वतंत्र लेखच केव्हांतरी लिहूं. सध्या अितकेंच सांगणें पुरें कीं, आतां हिंदी, मराठी, बंगाली प्रभृति सर्व संस्कृतनिष्ठ संपादकांनीं, लेखकांनीं नि भाषिकांनीं परकीय अुर्दू, अिंग्रजी अित्यादि शब्दांना या दोघां महापंडितांनीं जे जे संस्कृतनिष्ठ शब्द योजलेले आहेत ते ते अगदीं तोंडपाठ करून आपल्या दैनिक लिखाणांत नि संभाषणांतून योजण्याची प्रतिज्ञा करावी आणि तिचें अगदीं कट्टरपणें आचरण करावें. असे दहा सहस्र प्रचारक जर हिंदुस्थानांत आजच्या आज निघतील ना तर मग बघूं येत्या दहा पांच वर्षांच्या आंत संस्कृतनिष्ठ हिंदीच कशी राष्ट्रभाषा होत नाहीं तें !

● ●

# प्राध्यापक क्षीरसागर आणि भाषाशुद्धि *

गेल्या जानेवारींत बडोदें येथील १४ व्या वाङ्मय परिषदेचें जें अधिवेशन झालें त्याचे अध्यक्ष प्रा. क्षीरसागर हे होते. त्यांच्या अध्यक्षीय भाषणांत त्यांनीं भाषा-शुद्धीवर पुष्कळच कडक टीका केलेली आहे. त्याविषयीं आमचें मत काय आहे तें कळावें म्हणून अनेक जणांनीं नि स्वतः क्षीरसागर महाशयांनींहि मनमोकळेपणें अिच्छा प्रदर्शविल्यामुळें या लेखांत तें कळवीत आहों.

प्रा. क्षीरसागर हे महाराष्ट्रांतील अेक नामांकित समालोचक आहेत. मराठींत 'टीकाकार' या शब्दाचा सध्यां 'दोष दिग्दर्शक' अेवढाच जो सामान्यतः अर्थ होतो तशा अर्थीं ते टीकाकार नाहींत. तर कोणत्याहि विषयाचे मार्मिक, विचक्षण, दोषां-प्रमाणेंच गुणांचाहि यथावत् परामर्श घेणारे असे ते अेक संभावित समालोचक आहेत. ते स्वतःच सांगतात त्याप्रमाणें त्यांचे प्रस्तुतचें भाषणहि मराठी भाषेविषयीं नि साहित्याविषयीं त्यांना वाटणाऱ्या कळकळीचें द्योतक आहे. ह्या भाषणांत त्यांनीं आजच्या मराठी साहित्याच्या कित्येक पैलूंविषयीं अुद्बोधक अुहापोह केलेला आहे त्या क्षेत्रांत घडणाऱ्या अनेक प्रमादांचें परिश्रमानें टिपण करून ते टाळण्याचा जो अुपाय त्यांना सुचला तो सांगितला आहे. त्यांचें भाषण त्या त्या प्रकरणीं मननीय आहे. तथापि कालाभावीं नि स्थलाभावीं त्यांच्या भाषणांतील अितर भाग गाळून त्यांतील भाषाशुद्धीच्या विवेचनापुरताच काय तो त्याचा परामर्श ह्या लेखांत आम्हांस घ्यावा लागत आहे याचा आम्हांसहि खेद वाटतो. पुन्हां या विषयावर त्यांनीं अेखादा वैयक्तिक लेख लिहिला असता तर ती गोष्ट निराळी होती पण हें भाषण त्यांनीं अेका वाङ्मय परिषदेच्या अध्यक्षीय पीठावरून दिलें असल्यानें त्याला थोडसें स्थानमहात्म्य आलेलें आहे. ह्यामुळें त्याची अगदींच अुपेक्षा करतां येत नाहीं.

---

* *'केसरी' मध्ये दोन लेखांकांत मार्च १९३१ मध्ये हा लेख प्रसिद्धला होता.*

भाषाशुद्धीचे क्षीरसागर, हे प्रथमपासून कडवे विरोधक आहेत. प्रथम प्रथम तो सहाजिकच होता. सन १९२४ मध्यें आम्हीं हें आंदोलन संघटितपणे चालू केल्यानंतर त्यावेळच्या साहित्यरथी समजल्या गेलेल्या बहुतेक गृहस्थांनीं भाषाशुद्धीविषयीं विरोधकाची भूमिकाच घेतलेली होती. साहित्यसंमेलनाचें अध्यक्षपद ज्यांनीं केव्हांतरी भूषविलें अशा दोन तीन प्रख्यात साहित्यिकांची अुदाहरणें पुरावा म्हणून दिलीं तरीं पुरे आहेत. कै. प्रा. माधवराव पटवर्धनांनीं तर भाषाशुद्धि विरोधकांचें त्यावेळीं नेतृत्व स्वीकारलें होतें. परंतु आमचे लेख केसरींत सन १९२५ मध्यें आल्यानंतर ते भाषाशुद्धीचे अितके अेकनिष्ठ पुरस्कर्ते बनले कीं, त्यांनीं आम्हांसहि अुर्दू शब्दांवरील बहिष्कारांत मागें टाकलें. त्यांनीं 'भाषाशुद्धि विवेक' म्हणून जें पुस्तक लिहिलें आहे त्यांत त्यांनीं म्हटलें आहे कीं "(भाषाशुद्धीचें ममत्व) सावरकरांच्या लेखमालेवर विचार करीत असतांना मला प्रथम कळलें" (पृष्ठ २) त्यावेळचे दुसरे साहित्यरथी म्हणजे कै. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर. त्यांच्या विरोधी लेखांना आम्ही १६ जून १९२७ चे श्रद्धानंदाचे अंकांत जें अुत्तर दिलें* तें वाचल्यावर त्यांनीं प्रकटपणें प्रसिद्ध केलें कीं "अनवश्यक अशा अिंग्रजी शब्दाप्रमाणेंच अुर्दू शब्दांनाही बहिष्कारलेंच पाहिजे हें भाषाशुद्धीवादाचें तत्व व्यवहारांतही आणण्याचा मीं निश्चय केला आहे." साहित्यसम्राट् तात्यासाव केळकरांचीही गोष्ट तशीच. वरील पुस्तकांत प्रा. पटवर्धन लिहितात "श्री नरसोपंत केळकर हेहो (भाषाशुद्धीचे) मूळचे विरोधकच (पण) सन १९३६ च्या आसपास त्यांचा तात्विक विरोध मावळला. अितक्या चळवळीनंतर महाराष्ट्रांतील या अग्रेसर लेखकाची भाषाशुद्धीचे तत्वाला मान्यता मिळाली. श्री. केळकर यांनीं अितक्या वर्षांची जडलेली संवय सोडून अनवश्यव (अुर्दू, अिंग्रजी) शब्द शक्यतों न वापरण्याची नवी संवय लावून घेण्याचा निश्चय या वयात षष्ठ्यब्दिपूर्तिनंतर करावा हें त्यांच्या तत्वनिष्ठेचें नि प्रगतिशीलतेचें द्योतक आहे. (पृष्ठें ५ ते ७) अशा अनेक साहित्यरथींचा विरोध मावळत गेला नि भाषाशुद्धी मंडळाच्या सक्रिय आंदोलनानें मराठीवर तिची छाप अधिकाधिक पडत गेली तथापि त्यावेळीं अेक अुपसाहित्यिक म्हणूनच गणले जाणाऱ्या क्षीरसागरांचा विरोध मात्र न मावळतां तो अधिकच कडवा होत गेला. त्यांना वाटणारा विरोध बोलून दाखविण्याचें त्यांचें स्वातंत्र्य आम्हांसहि मान्य आहे. पण त्यांच्या या प्रस्तुतच्या भाषणांत त्यांनीं ह्या विषयाशीं संबंध असलेले असे युक्तिसंमत आक्षेप कुठेंहि न घेतां आजच्या मराठी लिखाणांत, मुद्रणांत, शिक्षणांत, नभोवाणींत, भाषणांत त्यांना जे जे नानाप्रकारचे दोष आढळले त्यांची सर भेसळ चर्चा करीत जाअून अध्येमध्ये नि येतांजातां ते भाषाशुद्धीचें नांव अशाप्रकारें घेत

* हें अुत्तर याच पुस्तकांत पान ६८ ते ६७ वर प्रसिद्धिले आहे.

गेले आहेत कीं जणूं काय ह्या सर्व दोषांना भाषाशुद्धीच कारण आहे. हें त्यांचें धोरण मात्र सरळ, सुसंगत नि योग्य नाहीं. अितर विषयांत ते जी समालोचकाची भूमिका घेतात म्हणून आम्हीं वर सांगितलें आहे ती त्यांची भूमिका भाषाशुद्धीचा प्रश्न निघाला कीं अनेकदां ढळते नि ते टीकाकाराच्याच नव्हे तर अगदीं वाह्यात टीकाकाराच्या खालच्या पातळीवर येतात. जर त्यांनीं भाषाशुद्धीचें त्यांचें विवेचन वा आक्षेप निराळे नि अेकत्र दिले असते तर त्यांचा समाचार घेणें सोपें झालें असतें. भाषाशुद्धीचीं मूलसूत्रें आम्ही सन १९२५ पासून वारंवार सांगत आलों असताहि ह्यां विषयीं चकार शब्द न काढतां "भाषाशुद्धीच्या नि राष्ट्रभाषेच्या अशास्त्रीय कल्पना" या आक्षेपापासून तों "यांतच मराठीचें मरण आहे" ह्या आक्षेपापर्यंत त्यांनीं केवळ अभद्र विशेषणांचीच काय ती अुतरण रचली आहे. त्यापेक्षां तीं भाषाशुद्धीचीं मूल-सूत्रें देअून मग तीं कशीं अशास्त्रीय आहेत तें दाखविलें असतें तर त्यांची चर्चा शास्त्रीय युक्तिवादाला धरून झाली असती. तथापि जरी आम्ही तेंच तें सांगत बसण्यास आतां कंटाळलों तरीहि ज्या अर्थीं क्षीरसागरांनीं जुनाट आक्षेपच पण नव्यानें पुढें आणले आहेत, ज्या अर्थीं साहित्यिकांच्या नव्या पिढीला तीं मूलसूत्रें किंवा त्या आक्षेपांचीं जुनीं अुत्तरें माहीत नसल्यामुळे हे आक्षेप खरे वाटण्याचा संभव आहे त्या अर्थीं तीं मूलसूत्रें अेकदां पुढें ठेविलीं कीं त्या कसोटीवर पारखले जातांच क्षीरसागरांचे भाराभर आक्षेप आपोआप खोटे पडतात आणि ज्या अर्थीं प्रचाराचा आत्माच पुनरुक्ति असल्यामुळें भाषाशुद्धीचें मर्म नव्या पिढीला सांगणे हें अपरिहार्य कर्तव्यच आहे त्या अर्थीं आम्हीं तीं मूलसूत्रें पुन्हां अेकदां थोडक्यांत खालीं देत आहोंत.

## भाषाशुद्धीचीं मूलसूत्रें

**१. गिर्वाण भाषेंतील साराचेसारा संस्कृत शब्दसंभार आणि संस्कृतनिष्ठ अशा तामिळ, तेलगु ते आसामी, काश्मीरी, गौड, भिल्ल बोलीपर्यंत ज्या आमच्या प्रांतिक भाषा भगिनी आहेत त्या सर्वांतील मूळचे प्रांतिक शब्द हे सर्व आमच्या राष्ट्र-भाषेच्या शब्दकोशाचें मूलधन, स्वकीय शब्दांचे भांडवल होय.**

**२. ह्या आपल्या राष्ट्रीय शब्दभांडारांत ज्या वस्तूंचे विचारांचे वाचक शब्द होते वा आहेत वा निर्मितां येतात त्या अर्थाचे अुर्दू, अिंग्रजी प्रभृति परकीय शब्द वापरू नयेत. जर तसे परकीय शब्द आपल्या पूर्वींच्या ढिलाअीमुळें आपल्यांत घुसले असतील तर त्यांना हुडकून काढून टाकावें. अद्यतन विज्ञानाची परिभाषा नवेनवे संस्कृत प्राकृतोत्पन्न शब्द पाडून व्यक्तविली जावी.**

३. परंतु ज्या परदेशी वस्तु अित्यादि आपल्याकडे नव्हत्या. त्यामुळें ज्यांना आपले स्वकीय जुनें शब्द सांपडत नाहींत आणि ज्यांना त्यांच्या त्या परकीय शब्दां-सारखे सुटसुटीत स्वकीय शब्द काढणें दुर्घट जातें असे परकीय शब्द मात्र आपल्या भाषेंत जसेचे तसे घेण्यास प्रत्यवाय नसावा. जसें : बूट, कोट, जाकीट, गुलाब, जिलबी, बुमरँग, टेबल, टेनिस अित्यादि. तथापि अशा नव्या वस्तु आपल्याकडे येतांच त्यांना कोणी स्वकीय नावें देअून तीं रुळवून दाखवील तर अुत्तमच.

४. त्याचप्रमाणें जगांतील कोणच्याहि परकीय भाषेंत जर अेखादी शैली वा प्रयोग वा मोड ही सरस वा चटकदार वाटली तर तीहि आत्मसात करण्यास आडकाठी नसावी.

## निव्वळ कुभांड

या मूलसूत्रांवर आधारलेला भाषाशुद्धीच्या आंदोलनावर तात्विक असा अेकतरी आक्षेप क्षीरसागरांना घेतां आला आहे का? मराठी भाषेवर तिच्या झालेल्या व्याव-हारिक परिणामांविषयीं तरी त्यांनीं त्यां विषयाशीं सुसंगत अशी बांधेसूद चर्चा त्या भाषणाच्या अेखाद्या छेदकांत केली आहे का? जिथें जिथें त्यांनीं तशी चर्चा कर-ण्याचा देखावा अुत्पन्न केला आहे तिथें तिथें जें भाषाशुद्धीचें म्हणणें नाहीं तेंच तिचें म्हणणें आहे असा विपर्यास करूनच नाहीं नाहीं ते आरोप केलेले आहेत. भाष-णाच्या पहिल्या तीन चार पानांतच त्यांनीं कोण्या वृत्तपत्राच्या कोण्या सोलापूरच्या बातमीदारानें 'अुन्वरित' हा शब्द चुकीच्या अर्थीं वापरला, अेका साप्ताहिकांत अंतर्मुख ह्या शब्दाचे ठायीं अंतर्भूत जीवन हा शब्द वापरला अशीं निनांवी अुदाहरणें देअून लगेच म्हटलें आहे कीं. "माझी हाकाटी अर्थशून्य नि बोजड शब्द वापरण्याच्या बौद्धिक विकृतीसंबंधीं आहे. गेल्या २५ वर्षांत–म्हणजेच भाषाशुद्धीच्या आग्रहामुळें अनधिकारी व्यक्तींनाहि शब्दनिर्मितीची सनद मिळाल्यापासून – मराठी शब्दसंग्रहांत फार मोठी वाढ झालेली आहे. पण शब्दांचीं शुद्ध रूपें व शुद्ध अुच्चार यांची हानि झाली आहे." आतां, त्यांनीं दिलेल्या अुदाहरणांचा भाषाशुद्धीशीं काय संबंध? भाषाशुद्धीचीं जीं सूत्रें वर दिलेलीं आहेत त्यांत शक्य तों स्वकीय शब्द वापरावेत अेवढाच आग्रह आहे. अर्थशून्य, बोजड नि अशुद्ध शब्दच वापरले पाहि-जेत असा का त्यांत आग्रह धरलेला आहे? गेल्या पंचवीस वर्षांपूर्वीं (अगदीं मोजून अं!) कोणत्याहि साप्ताहिकांत किंवा कोण्याहि बातमीदारानें अशुद्ध वा चुकीचा शब्द वापरलेला असा आढळत नाहीं, शुद्ध नि सार्थ शब्दांचें तें केवळ सत्ययुग होतें आणि गेल्या २५ व्या वर्षाच्या पहिल्याच दुष्ट दिवसापासून काय तें अशुद्धतेचें

कलियुग चालू झालें असें का क्षीरसागरांना म्हणावयाचें आहे ? बरें; तेंहि गृहीत धरूं. तरीहि त्याच दिवशीं भाषाशुद्धिवादानें अनधिकारी व्यक्तींनाहि शब्दनिर्मितीची जी 'सनद' दिली म्हणून क्षीरसागर सांगतात ती मूळ सनद किंवा तिची निदान दुय्यम प्रत तरी ते आमच्याकडे किंवा भारत अितिहास संशोधन मंडळाच्या संग्रहालयाकडे धाडण्याची कृपा करतील काय ? त्यांतल्या त्यांत अितकें बरें झालें कीं गेल्या पंचवीस वर्षांत जे भूकंप झाले, विमानें कोसळलीं, अतिवृष्टी झाली तें सारें ह्याच भाषाशुद्धि-मुळें झालें कारण ती ह्याच पंचवीस वर्षांत जन्मली नि वळावली, अितकेंहि ठांसून सांगण्यास क्षीरसागर विसरले ! त्यांच्या वरील अुताऱ्यांतील शेवटचें वाक्य तर भाषा-शुद्धी विरुद्ध त्यांनीं केलेल्या कोटिक्रमाचा कळसच आहे. ते म्हणतात, "भाषाशुद्धीच्या आग्रहामुळें. . . . . . शब्दांचीं शुद्ध रूपें नि शुद्ध उच्चार यांची हानी झाली आहे." शब्दांचे अुच्चारहि अशुद्ध करीत जा असें भाषाशुद्धि म्हणाली अं ? हें अैकून आम्हांलासुद्धां तिच्या विश्वासघातकीपणाचा धाक वाटूं लागला आहे. त्या भाषा-शुद्धीचा नि आमचा अितकीं वर्षे अितका जिव्हाळ्याचा परिचय असतांहि तिनें "माझा संबंध मराठी शब्दांशींच काय तो आहे" अेवढेंच काय तें आम्हांस सांगितलें होतें. परंतु मराठी शब्दांचे अुच्चारहि ती बिघडविणार आहे या तिच्या अंतस्थ दुष्ट हेतूचा अुच्चारसुद्धां तिनें आमच्यापाशीं कधीं केला नाहीं !

'विद्यार्थ्यांनों, तुम्हीं यवन शब्दाचे ठायीं **यौवन** नि **यौवन** शब्दाचे ठायीं यवन शब्द वापरीत जा; जुळाऱ्यानों, तुम्हीं छपाअीची जुळणी करतांना विशेषतः क्षीरसागरांचें हें भाषण छापतांना शक्य तितके मुद्रण दोष करा; नभोवाणीवरील वक्त्यानों, तुम्हीं संस्कृत शब्द अशुद्धपणें अुच्चारीत जा; नभोवाणीवर अयोग्य व्यक्तींना नेमा; लोकांनों, घनश्याम शब्द घनःशाम असा नि शरच्चंद्र शब्द शरश्चंद्र असा नि दृश्य शब्द दृष्य असा पाट्यांवर लिहिण्याची चूक हटकून करीत जा;' असा अुपदेश भाषाशुद्धीच्या प्रवर्त्तकांनीं कधीं तरी दिलेला आहे का ? परंतु साहित्य क्षेत्रात घडणाऱ्या अशा नानाविध दोषांचें परिगणन दहापंधरा पानांतून करीत करीत मध्येंच शीणक आल्यासारखें अेकदम अुसळून क्षीरसागर सांगतात, "हे सारे भाषेंतील दोष करणारे लेखक अेका विशिष्ट संप्रदायाचेच आहेत. तो संप्रदाय मोडून काढला पाहिजे हें माझें आजचें 'प्रतिपादन' आहे. . . . . .ह्या क्षेत्रांत हिंदुत्ववादी, गांधीवादी, समाजवादी आणि साम्यवादीहि सारखेच अपराधी आहेत. प्रारंभ मात्र भाषाशुद्धीवादी हिंदुत्वनिष्ठांनीं केला या दृष्टीने ते या दोषाला अधिक जबाबदार आहेत अेवढेंच काय तें" यावर क्षीरसागर पंतोजींना आमचें अितकेंच अुत्तर आहे कीं त्यांच्या ज्या कोण्या विद्यार्थ्यानें यवन शब्दाचे ठायीं यौवन शब्द वापरला तशी चूक आपणहि

अिथे 'प्रतिपादन' हा तर्कशुद्ध विवेचनातच काय तो शोभणारा शब्द वापरण्यांत करतां आहां. भाषाशुद्धिवादाशीं बादरायण संबंधसुद्धा नसलेले हे भाराभर दोष तिच्यामुळें घडतात असें भासविणारी ही आपली अेक अडाणी चपळाओ आहे, निव्वळ कांगावा आहे, अेक कुभांड आहे, – प्रतिपादन नव्हे.

## हा म्हणे 'जातिवंत' मराठीचा अभिमान

'भाषाशुद्धीचा विडा हिंदुत्वनिष्ठानींच पहिल्यानेंच अुचलला' हें 'दोष' दाखविण्यासाठीं कां होअीना पण क्षीरसागरांनीं मान्य करावें ह्यांत हिंदुत्वनिष्ठ स्वतःचा गौरवच मानतील. समाजसत्तावादी प्रभृति अितर पक्षहि संस्कृतनिष्ठ शब्दांनीं मराठीची संपत्ति नि शोभा वाढवीत आहेत ही आनंदाची गोष्ट आहे. विरोधविकास, श्रममूल्य, वर्गविग्रह, शासनसंस्था, भाववाद, अुत्पादकधन, नि भोग्यधन प्रभृति अनेक नवे अर्थपूर्ण, स्वकीय शब्द त्यांनीं मार्क्स वादावरील मराठी पुस्तकांतून योजलेले आहेत. 'लोकमान्य' पत्राचे संपादक गाडगीळ यांचें आम्हीं अेकदां याविषयीं प्रत्यक्ष अभिनंदनहि केलें होतें पण क्षीरसागरांच्या 'जातिवंत' मराठीस पात्र यामुळें मळमळून येत आहे. अरबीनिष्ठ अुर्दू नि पार्लमेंट, कौन्सिलसारखे परके शब्द घेतलेच पाहिजेत हा ज्या क्षीरसागरांचा या भाषणांत अुबडअुबड आग्रह आहे, ह्यालाच जे अुदारपणा समजतात तेच क्षीरसागर हिंदी बंगालीसारख्या आमच्या भाषा भगिनींतून सुद्धा 'अुत्तरदायित्व, हार्दिक, साहित्यिक,' असे शुद्ध संस्कृत शब्दहि मराठींत वापरले जातात ह्याविषयीं निषेध करण्याअितके 'आकुंचित' बनतात. संस्कृत हा आमच्या सर्व प्राकृत भाषांचा समाअीक शब्दरत्नाकर आहे. हिंदींत मराठींतले 'हुतात्मा, क्रमांक, दिनांक' प्रभृति शब्द घेतले जातात. संस्कृतनिष्ठ हिंदी ही राष्ट्रभाषा झाली असतां आमच्या संस्कृतनिष्ठ मराठीला कांहींच भय नाहीं. भय आहे तें अुर्दूनिष्ठ 'याने हिंदुस्तानी'चें. अितिहासाला 'तवारिख' नि शिक्षणाला 'तालीम' म्हणा हा अुघड हट्ट धरणारी ही 'याने हिंदुस्तानी' राष्ट्रभाषा झाल्यास अुर्दू शब्दांचा लोंढाचे लोंढा मराठींत पुन्हां घुसेल हें आहे खरें संकट. पण क्षीरसागरानीं त्या 'याने हिंदुस्तानी' विरुद्ध चकार शब्द सुद्धां काढलेला नाहीं. कारण त्यांच्या जातिवंत मराठीचे नि 'याने हिंदुस्तानी'चें गोत्रच मुळीं अेक!

यामुळेंच "बौद्धिक, सामरिक, नौदल, सांसदिक, विधेयक, अवैध यासारखे शब्द दैनिकांच्या रात्रपाळींत पेंगतां पेंगतां कां वापरतां" म्हणून अुपसंपादकांना क्षीरसागर धमकावीत आहेत. वरील सारखे शुद्ध, प्रौढ, अर्थपूर्ण शब्द जे अुपसंपादक नि संपादक काढूं शकतात तेच आज मराठीचें वैभव, शक्ति नि सोज्वळता वाढवीत

आहेत. जर खरोखरीच असे अुत्तम शब्द कोणी अुपसंपादक पेंगत असतांनाहि काढ़ू शकत असेल तर त्याची ती पेंगच, पार्लमेंटसारखे शब्द सुद्धां परकीय भाषेंतून घरांत घेअीन असे म्हणणाऱ्या 'जातिवंत मराठीच्या' चवचाल जागरणापेक्षां, अधिक शुद्धीवर होती.

क्षीरसागर महाशयांनीं 'अशुद्ध' म्हणून आम्ही सुचविलेला 'अद्यावत' हा शब्दहि वेठीस धरला आहे. आणि सांगितलें आहे कीं, सुमारें वीस वर्षांनंतर मुंबअी सरकारनें तो 'अद्ययावत' असा सुधारून दिला. ही माहिती चूक आहे. आम्हीं up to date ह्या शब्दाला प्रथमच तीन शब्द सुचविले. अद्ययावत, अद्यावत नि अद्यतन. (प्रतिभा मासिक नोव्हेंबर १९३५) आणि तेव्हापासून हें वारंवार सांगितलें आहे कीं, मूळ शब्द 'अद्ययावत' हा संस्कृतांत शुद्ध परंतु तो प्राकृतांमध्यें तिच्या मोडीप्रमाणें 'अद्यावत' असा सुटसुटीत केला तरी तें प्राकृतांत अशुद्ध होणार नाहीं. संस्कृत शब्द प्राकृतांत प्राकृत व्याकरण नि रुढी याच्यामुळें असेच आखूड नि सुटसुटीत होतात. त्यांचीं अुदाहरणें आम्ही प्रारंभीच दिलेलीं होतीं. कीं, जसें यच्च-यावत् हा मूळ शब्द साधारणतः प्राकृतांत अुच्चारताना 'यच्चावत्' असा अुच्चारला जातो. तसेंच 'अद्यावत' ह्या प्राकृत रुपाविषयीं समजावें. अग्न्यागाराचें प्राकृत रुप अग्यारी, ज्ञानेश्वराचें ग्यानबा तसेंच हें. प्रथमच ही चर्चा आम्ही केलेली असल्या-मुळें 'वीस वर्षांनंतर मुंबअी सरकारनें ही चूक सुधारली' हें म्हणणें मिथ्या आहे. पण अशुद्धतेचीच अडचण असेल तर क्षीरसागरांनीं शुद्ध रुप जें 'अद्य–यावत्' तें वापरावें. अद्यतन हा शब्द योजावा. हे दोन्ही शुद्ध शब्दहि आम्ही 'अद्यावत्' हें रुप सुचविलें त्याचवेळी सुचविलेले आहेत. बरें, आम्ही सुचविले म्हणूनच ते शब्दहि नको असतील तर त्यांनीं त्यांचा अेखादा स्वकीय शब्द सुचवावा. आम्हीं चांगला असल्यास तोच वापरूं. पण अपटूडेट आणि त्यांतहि आजतागायतासारखा धेडगुजरी नि बाडगा शब्द जो क्षीरसागरांच्या 'जीवंत मराठींत' खपतो तो मात्र वापरूं नये.

ज्यांना खेडवळ म्हटलें जातें त्या मराठी लोकांत जीं खणखणीत नि रोकडी बोली बोलली जाते, तींतच खरे जिवंत नि स्वकीय मराठी शब्द सांपडतात. ते आम्हांस अतिशय आवडतात. परंतु क्षीरसागर जिला जातिवंत मराठी म्हणतात ती कशी असते हें त्यांच्या याच भाषणांतील मराठीवरून पाहूं म्हणजे संपलें.

## जातिवंत कसली — ही आहे पाकिस्तानी मराठी !

मार्गातून रंगीत पाटीवर कुठें 'घनःशाम' असा अशुद्ध शब्द लिहिलेला पाहून त्यांना चीड आली म्हणून भाषणांत ते सांगतात : तें ठीकच. परंतु त्याच मार्गामार्गांतून

क्लॉथ मर्चंट, फ्रुट मार्केट पासून तों वॉशिंग कंपनी, हेअर कटींग सलून पर्यंत ज्या शेंकडों पाट्या लागलेल्या असतात त्यांची कांहीं त्याना चीड येत नाहीं, भाषणांत त्या त्या वाङ्‌मया प्रवृत्तीविरुद्ध चकार शब्द नाही. त्यांच्या भाषणांत 'त्या शिवाय' 'त्या खेरीज' हे शब्द चाळीस पन्नास वेळां कुठेतर अेका वाक्यांतून अनेकदां आले आहेत. पण जर त्या अुर्दू शब्दांचे ठायी 'त्या वाचून त्या विना' अित्यादि स्वकीय शब्द योजले असते तर मराठी काय 'भ्रष्ट' झाली असती? 'बद्दल' शब्द तर त्यांच्या भाषणांत नुसता बोकाळला आहे. त्याचें ठायीं त्या विषयीं, त्या संबंधी, त्या प्रकरणीं अित्यादि अनेक स्वकीय पर्याय असतां त्याना ते शिवत नाहीत. जबाबदारी, बेजबाबदार हे शब्दहि ते पन्नास वेळां वापरतील पण अुत्तरदायित्व, दायित्वशून्य हे स्वकीय शब्द हिंदी बंगालींतून घेतले म्हणून 'यांतच मराठीचें मरण आहे' असें त्यांना वाटतें. 'कायदा' शब्दाला मराठींत प्रतिशब्द स्वकीय असा अुरला नाही याची त्याना खंत वाटत नाही. पण अवैध शब्द अैकतांच ते 'त्रस्त' होतात. भाषाशुद्धीच्या प्रवृत्तीनें शतावधि शुद्ध स्वकीय शब्द मराठींत रुळले असतांहि त्यांचें कौतुक न वाटतां त्यांत अेकादा अशुद्ध शब्द सांपडतो कीं नाहीं याविषयीं त्यांची लेखणी कावळ्यासारखी टपत आहे. तेंहि असो. पण कायदेपंडित, कायदेशास्त्र, कायद्यात्मक, कायदा असे परकी धेडगुजरी शब्द मराठींत येतां जातां वापरले जात असतांहि त्या अशुद्धतेची घाण मात्र त्यांना येत नाही अुलट 'विधिमंडळ' हा शब्द मराठींत रुळला असतांहि ते त्यांच्या भाषणांत कायदेमंडळ हा मळं बातलेला अशुद्ध परकी शब्दच पुन्हापुन्हा वापरतात. मथळा, शीर्षक हे स्वकीय शब्द असतां हेड-लाअीन, प्राध्यापक असतां प्रोफेसर, जुळारी सोडून कंपोझिटर असे कित्येक अिंग्रजी शब्द त्यांच्या 'साहित्यिक' भाषणांत डोलानें वावरत आहेत. तऱ्हा, अंदाज, बेसुमार, मगदूर, खाजगी, खातर, लष्कर, खबरदारी, मतलब, शहर, पेश, नजर, अिलाज, खास, कायम, अजिबात, अहवाल, जरूर, अशा अनावश्यक अरबी अुर्दू शब्दांचा त्यांचे भाषणांत[1] नुसता बुजबुजाट झालेला आहे. ह्या शब्दांना स्वकीय शब्द असतांहि, भाषा शुद्धीवर सूड अुगविण्याचें पंचमस्तंभीय समाधान अुपभोगिण्याकरितांच कीं काय हे अनावश्यक अिंग्रजी अुर्दू शब्द ते हटकून पानोपानीं वापरतात ही आहे त्यांची 'जातिवंत मराठी!' राष्ट्रभाषेंत निदान ३३ टक्के तरी अरेबी अुर्दू शब्द ठेवलेच पाहिजेत म्हणून अुघडपणें हट्ट धरणाऱ्या कांही 'याने हिंदुस्तानी' वाल्यांप्रमाणें प्राध्यापक

---

[1] बडोदा येथील १४ व्या वाङ्‌मय परिषदेच्या अध्यक्षपदावरून जानेवारी १९५१ मध्यें प्रा. क्षीरसागर यांनी केलेलें भाषण.

क्षीरसागरांनींहि अशी प्रतिज्ञाच केलेली दिसते कीं 'भाषाशुद्धीवाल्यांनीं तुमच्या संस्कृतनिष्ठ मराठीची मी पाकिस्थानी मराठी करून सोडीन तरच नांवाचा क्षीरसागर! नाहींतर नांव पालटून देअीन."

तसेंच असेल तर टीकाकार क्षीरसागरांना आम्ही कांहींच विनंती करूं अिच्छित नाहीं. परंतु समालोचक क्षीरसागरांविषयी आम्हास जो यथाप्रमाण आदर आहे त्यामुळें त्यानां मात्र शेवटी अेक विनंति, राष्ट्रीय स्वाभिमानापायींच नि स्वभाषेच्या प्रतिष्ठेसाठींच, करावीशी वाटते कीं, त्यांनी अेक आठवडाभर तरी भाषाशुद्धिविरुद्ध त्यांचे जे कांहीं पूर्वग्रह असतील ते अगदीं अेका बाजूस ठेवावे, समालोचकाला शोभेल अशा शांत नि समाहित मनस्थितींत भाषाशुद्धीची वर दिलेलीं मूलसूत्रें तेवढी पुढें ठेवावीं आणि स्वतःला विचारावें कीं परकीयांनीं तलवारीचे बळावर आमच्यावर जी पराराज्यें स्थापिली त्या दुःखद नि अवश काळांत आमच्या भाषेंतहि त्या परदास्याचा परिणाम म्हणून घुसलेल्या या दास्यशीलतेच्या सूक्ष्म रोगाणूंना, आमच्या मनोभूमींत परशत्रूंनी अुभारलेल्या या आमच्या पराभवाच्या सूक्ष्म स्मारकांना त्या अनावश्यक अिंग्रजी, अुर्दू शब्दांना आज आमचाहि दिवस अुगवला असतां, ती विधर्मीय नि विराष्ट्रीय राज्यसत्ता आज आम्ही अुखडून टाकिली असतां – ह्या अनवश्यक परकीय शब्दांनाहि कां अुखडून टाकूं नये? आपले स्वकीय शब्द कां वापरूं नयेत? निदान तसे ते कोणी वापरले तर त्यांत वावगें काय आहे?

अशाच भावनेनें अिंग्रजीला अुखडून आयरलंडनें गॅलिक भाषा पुनरुज्जीवित केली, अरेबीला अुखडून तुर्कांनीं स्वकीय तुर्की भाषा जिवंत केली नि गेलीं सहस्र वर्षे अक्षरशः मृतप्राय झालेली होती ती हिब्रू भाषा गेल्या अवघ्या दहा वर्षांत ज्यूनीं नुसती जिवंत केली नाहीं तर ती राष्ट्रभाषा नि राज्यभाषा करून सोडून परराष्ट्र दूतावासांतहि तीच वापरली पाहिजे म्हणून ठरवून टाकले! अशाच वीरोचित भावनेनें शिवछत्रपतींनीं राजव्यवहार कोश लिहविला. त्याच वीरोचित भावनेनें प्रेरित होअून आमच्या राष्ट्रभाषेंचें साहित्यमंदिर संस्कृत निष्ठतेच्या बळकट नि पवित्र पायावर अुभारवयास हवें.

● ●

# भाषाशुद्धि — शब्दकोश

परकीय शब्दांना वीर वि. दा. सावरकरांनीं स्वतः नवीन पाडलेले आणि जुनेच पण नव्यानें प्रचारांत आणलेले कांही स्वकीय प्रतिशब्द.

परकीय स्वकीय

### १. शिक्षणविषयक

स्कूल : शाळा.
हायस्कूल : प्रशाळा.
कॉलेज : महाशाळा, महाविद्यालय.
फॅकल्टी : ज्ञानशाखा.
ॲकॅडमी : प्रबोधिका.
हेडमास्तर : मुख्याध्यापक.
सुपरिंटेंडेंट हायस्कूल : आचार्य.
प्रिन्सिपॉल : प्राचार्य.
प्रोफेसर : प्राध्यापक.
लेक्चरर : प्रवाचक.
रीडर : प्रपाठक.
चेअर : अध्यासन, विद्यासन. जसें– (chair of Law)

### २. धंदेविषयक

वॉचमेकर : घड्याळजी.
वॉशिंग कंपनी, लॉंड्री : धुलाओीकेंद्र, धवलकेंद्र, निर्मलकेंद्र, परीटगृह.
हेअर कटिंग सलून : केशकर्त्तनालय, केस कापण्याचें दुकान.
डिस्पेन्सरी, दवाखाना : औषधालय.
कन्सलटिंग रूम : चिकित्सालय.
वकील : विधिज्ञ.
वकीली : विधिज्ञकी.
स्टेशनरी स्टोअर्स : लेखन साहित्य भांडार.
टेलरिंग शॉप : शिवणकलागृह, शिवणगृह.
बादशाही लॉजिंग बोर्डिंग : राजविलासी भोजन निवास गृह.

### ३. युद्ध विषयक

वॉर : युद्ध.
बॅटल : लढाओी, झुंज.
आरमिस्टिक : शस्त्रसंधि.
ट्रुस : अुपसंधि.
पीस, तह : संधि.
बफर स्टेट : कीलकराष्ट्र.
मोहीम : अभियान.
कॅम्पेन : अुपयुद्ध.

फौज } : सेना, सैन्य.
लष्कर }

फलटन : पृथना.

स्करमिश : चकमक.

कँप } : शिबीर, छावणी.
लष्कर }

वॉरशिप : रणतरी, युद्धनौका.

सबमरीन : पाणबुडी.

हवाओी दल } वायुदल, आकाश दल,
अेअर फोर्स } नभोदल.

लँडफोर्स : भूदल, पायदळ,

नेव्ही } नौदल, सिंधुदल, जलसेना.
आरमार }

### ४. मुद्रण विषयक

टाअीप फौंड्री : टंक शाळा.

पंच : नर.

मॅट्रिस : मातृका.

लेड : शिसपट्टी.

कंपाझिटर : जुळारी.

प्रूफ : अुपमुद्रित.

प्रुफ करेक्टर : मुद्रित निरीक्षक.

स्टॉप प्रेस : छापतां छापतां, छापबंद.

बाअिंडिंग : बांधणी.

मोनो टाअीप : अेक टंकक.

लायनो टाअीप : पंक्ति टंकक.

टाअीपरायटर : टंक लेखक, टंक यंत्र.

डिग्री : पूरण, अंश.

### ५. टपालविषयक

पोस्ट : टपाल.

बुकपोस्ट : ग्रंथ टपाल.

मनिऑर्डर : धनटपाल.

पार्सल पोस्ट : वस्तुटपाल, गठ्ठाटपाल.

रजिस्टर : पटांकण.

रजिस्टर्ड : पटांकित.

टेलिफोन : दूरध्वनि.

फोन : ध्वन, ध्वनि.

ट्रंक टेलिफोन, } परस्थ ध्वन.
ट्रंक कॉल }

फोन नंबर : ध्वन क्रमांक, ध्वनि क्रमांक.

टेलिप्रिंटर : दूरमुद्रक.

टेलिव्हिजन : दूरदर्शन.

### ६. सभाविषयक

जाहीर : प्रकट.

जाहीरसभा : प्रकटसभा.

हँडबिल : हस्तपत्रक.

सर्क्युलर : परिपत्रक.

वॉलपोस्टर : भितीपत्रक.

लाअुड स्पीकर : ध्वनिक्षेपक.

मेगॅफोन : ध्वनिवर्धक.

शेम : धिक्कार, धिक् धिक्

हिअर, हिअर : अैका, योग्य योग्य, ठीक ठीक.

रिपोर्ट, अहवाल : प्रतिवृत्त, अितिवृत्त.

रिपोर्टर : प्रतिवेदक.

मुर्दाबाद : नष्ट होवो, नाश हो.

झिंदाबाद : की जय, जयहो, अमर हो.

### ७. निबंध विषयक

लॉ : निर्बंध, विधि, दंडक.

लेजिस्लेचर–विधिमंडळ.

अुमेदवार } अिच्छुक, स्पर्धक, स्पर्धाळू.
कँडिडेट }

पार्लमेंटेरियन–संसदपटु.

बजट अंदाजपत्रक : अर्थसंकल्प
खातें : विभाग.
रेव्हिन्यू महसूल : राजस्व.
रेव्हिन्यू मिनिस्टर : राजस्व मंत्री.
लॉ मिनिस्टर : निर्बंधमंत्री, विधिमंत्री.
लेजिस्लेटीव्ह डिपार्टमेन्ट : विधिविभाग, निर्बंधविभाग.
* अेक्सिक्युटिव्ह डिपार्टमेन्ट : निर्वाह विभाग, कार्यवहनविभाग.
ज्युडिशिअल : न्यायविभाग.
अंमलबजावणी : वर्त्ताव, कार्यवाही.

### * भौगोलिक विभाग

अहमदाबाद : कर्णावती.
अरबी समुद्र : पश्चिमसमुद्र, सिंधुसागर.
हैद्राबाद (द.) : भाग्यनगर
हैद्राबाद (सिंध) : नगरकोट.
अलाहाबाद : प्रयाग.

### ८. चित्रपट विषयक

सिनेमाहअूस : पटगृह, चित्रगृह, चित्रपटगृह.
फिल्म : पट्टी, चित्रावली, चित्रपट्टिका.
सिनेमॅटोग्राफ, सिनेमा : चित्रपट.
मुव्ही : मूकपट.
टॉकीज : बोलपट.
अिन्टरव्हल : मध्यंतर.
स्टुडिओ : कलामंदीर, कलागृह.
शुटिंग : चित्रण.
आअुट डोअर शुटिंग : बाह्यचित्रण.
थ्री डायमेन्शन : त्रिमितिपट
ग्रीन रूम : नेपथ्य.
ड्रेसिंग : वेशभूषा.
ड्रेसिंग रूम : वेशकक्षा.
फोटोग्राफ : छायाचित्र, छाया.
फोटोग्राफर : छायाचित्रक.
कॅमेरा : छायिक.
पोर्ट्रेट : व्यक्तिचित्र.
पोझीशन : ठाण.
टेप रेकॉर्ड : ध्वनिमुद्रा, ध्वनिपट्टिका.
सिनेरीओ : पटकथा, चित्रकथा.
सिनेरीओ रायटर : पटकथक, चित्रकथक.
भपका : आडंबर, अवडंबर.
ग्रामोफोनरेकॉर्न्ड : नादांकण.
रेकॉर्डिस्ट : ध्वनिलेखक.
टॉपिकल : प्रचारपट.
न्यूजरील : वृत्तपट.
ट्रेलर : परिचयपट.
म्युझीक डिरेक्टर : संगीतनियोजक
डेमिनिटिह : लघुरूप.
डिरेक्टर : सूत्रधार, दिग्दर्शक.
अेडिटर : संकलक.
रिहर्सलरूम : अभ्यासकक्ष.
रिहर्सल : पूर्वप्रयोग, सप्रयोग.

---

** मुसलमानांनी हिंदुस्थानांत पुणें, नाशिक, काशी अित्यादि बहुतेक नगरांना मुसलमानी नांवें दिलीं होतीं. अिंग्रजांनी गांवागांवांना सुद्धां अिंग्रजी नांवें दिलीं. आतां त्या दोघांचीहि पर राजसत्ता धुळीस मिळाली असल्यानें तीं तीं सर्व परकीय नांवें पालटून आपलीं संस्कृतनिष्ठ भौगोलिक नांवें पुन्हां त्या स्थळांना ठेवणें आवश्यक आहे. अुदाहरण म्हणून हीं कांहीं नांवे दिलीं आहेत.*

स्टोअर : कोठार, भांडार, कोठी.
अेस्टिमेट : व्ययसंकल्प.

अ

आय बिटनेस : दृक साक्षी.
अर्ज : आवेदन, अभ्यर्थन.
अर्जदार : आवेदक, अभ्यर्थी, प्रार्थी.
अगर : जर, किंवा, अथवा.
अजिबात : मुळींच, आमूलात, अगदीं.
अक्कल : बुद्धि, मति, प्रज्ञा.
अंमल : सत्ता, अधिकार.
अिसम : मनुष्य, व्यक्ति.
अिमानी : प्रामाणिक, विश्वासू.
अिमान : विश्वास, आणभाक, वचन.
अिज्जत : प्रतिष्ठा, मान.
औपत : योग्यता, सामर्थ्य.
औवज : द्रव्य, सर्वस्व, धन.
अिशारा : चेतावणी.
अस्सल : प्रत्यक्ष, प्रमुळ.
अव्वलपासून अखेरपर्यंत : अथपासून अितीपर्यंत, आरंभापासून अंतापर्यंत.
अिन्कार : नकार, नाकारणें.
अेरवी : अन्यथा, नहून, नाहींतर.
अंदाज : अटकळ, अनुमान, आडाखा.
अेकजिनशी : अेकरस, अेकवस्तु.
अैनजिनशी : अेकात्मक.
अुमेदवारी : अिच्छुकता.
अेक्झामिनर : परीक्षक.
अिमला : घर, भवन, वास्तु.
अिमारत : बांधकाम.
अिमारत : घर, भवन, सदन.
ओलीस गहाण : तारण.
अहवाल : प्रतिवृत्त, अितिवृत्त.

अुन्फ : अन्थात, अुपाख्य. (अुपाख्य हा शब्द श्री. ग. वि. केतकर यांनी योजला आहे तो अगदीं योग्य आहे.)
अेक्झरसाअीज बुक : रेखावही, अभ्यासवही.
ऑडिटर : गणनेक्षक, गणन नीरीक्षक.
अन्वंट : त्वन्य.
ऑनरेरीयम् : पुरस्कार, संभावना.
अंडर लाअीन : अधोरेखित.
अेजंट : अडत्या, अभिकर्ता.
अिन्स्पेक्टर : अन्वेक्षक.
अँब्युलन्सकार : रुग्णवाहन.
अिरादा : हेतु, बेत.
अुमर : वय.
अेअर कंडिशंड : संयत वात, समशीतोष्ण, सुखशीतोष्ण, शीतल.
अल्टीमेटम् : अंतिमोत्तर.
अिनहेरंट : अंगभूत.
अिझीली अ‍ॅप्रोचेबल : सुलभ गम्य, सुलभ प्राप्त.
अपिल : अभ्यर्थन.

क

कमाल : धन्य, पराकाष्ठा, अधिकांत अधिक, सीमा.
कव्हर : आच्छादन, वेष्टन, पुष्ठा, मलपृष्ठ.
कब्जात : हातांत, अधिकारांत.
काबीज : हस्तगत.
कदर : मर्यादा, आतिथ्य, चिंता जाणीव.
कारटून : व्यंगचित्र, व्यंग.
कुस्ती : नियुद्ध, झोंबी, मल्लयुद्ध, झुंज.
कर्ज : ऋण.

कायम : स्थिर, नित्याचा, स्थायी.
कायमनिधी : स्थिरनिधी, स्थायीनिधी.
कोम : भ्रतार (सारा राज्यकारभार उर्दूत चाले तेव्हां हिंदु स्त्रियांची नांवें सीता कोम रामा गांवकर अशी लिहिली जात. अजूनहि ती पद्धत गेली नाही. त्यासाठीं तो कोम शब्द कटाक्षानें गाळावा आणि भ्रतार शब्द योजावा.)
कैदी : बंदीवान, बंदी.
कैदखाना : बंदीगृह, कारागार.
किंमत : मूल्य.
कारकून : लेखनिक, कारणीक.
कायमठशी स्टिरोटाअिप : स्थिर टंकी.
क्युरेटर : ग्रंथाध्यक्ष.
क्युरेटर ऑफ म्युझियम : वस्तुपाल.
कोरम : गण, गणसंख्या.
क्रॉसएक्झामिनेशन : प्रतिपृच्छा.
कमिशन : वटाव, अडत.
कन्फेशन : स्वीकारोक्ती.
कॉलम, रकाना : स्तंभ.
कॅलेंडर : कालदर्श, मितिपट.
कवायत, ड्रिल : संचलन.
कॉपी : प्रत, अनुलेख.
खातें : विभाग.
खलास : संपलें, संपूर्ण, समाप्त.
खास अंक : विशेषांक.
खात्री : निश्चिति.
खात्री पटली : निश्चिति पटली.
खुष : प्रसन्न.
खबरदार : सावध, ध्यानांत ठेवा.
खराब : वाअीट, नीच, गदळ.
खुनशी : कुढा, घातक, आंतल्या गाठीचा.
खुद्द : प्रत्यक्ष, स्वयं, स्वतः.
खून : हत्या.
खूनी : हत्यारी.
खेरीज : विरहित, व्यतिरिक्त, सोडून, वांचून, आणखी.
खुषी : लहर, अिच्छा.
खिदमत : परिचर्या.
खजिनदार : कोषाध्यक्ष, कोषधर, कोषपाल.
खावंद : स्वामी, अधिप, धनी, शेठ.
खैर : बरें झालें, कल्याण, बरें.
खरीप : कार्त्तिकान्न, कार्त्तिकी पिकें, पावसाळी पिकें.
† खबर : बातमी, वृत्त, वृत्तान्त.

---

*† पहिल्या आवृत्तींत या शब्दावर जी टीप दिली आहे ती अशी, "स्वदेशीचे कट्टे पुरस्कर्ते किर्लोस्कर बंधु आपल्या 'किर्लोस्कर खबर' या मासिकाचें नांव 'किर्लोस्कर-वृत्त' असें ठेवतील का? 'वर्तमानपत्र' हा शब्द ज्यांनी पहिल्याने रूढ केला त्यांनी अजाणपणानं 'खबरकागज' किंवा 'अखबार' हा शब्द वापरला असता तर आज तोच रूढ होअून आपण आपल्या वृत्तपत्र ह्या सुंदर शब्दास मुकले असतो. अुत्तरेस अखबारच रूढ होता. आतां हटतां हटत नाही."*

*वीर सावरकरांच्या विनंतीप्रमाणें शेवटीं 'किर्लोस्कर'च्या सुविद्य संपादकांनीं 'खबर' हा शब्द आपल्या नांवांतून गाळला.* —प्रकाशक

खुलासेवार : सुस्पष्टपणे, फुटकळ, स्पष्टीकृत, स्फुट.
खुलासा : स्पष्टीकरण, स्फुटता, अुलगडा.
खानेसुमारी : शिरगणति, शिरगणना, गणना.

ग

गैरहजर : अनुपस्थित.
ग्यालरी : दीर्घिका, वीथिका.
गोडाअुन : कोठी, भांडार.
गरीब : दीन, हीनदीन, सालस, बापडा.
गुलाम : दास, बंदा.
गुलामी : दास्य, पारतंत्र्य.
गुदस्तां : गतवर्षी.
गुन्हा : अपराध, पाप.
गुन्हेगार : अपराधी, पापी.
गैर : बाअीट, अनुचित.

च

चॅम्पीयन : धुरीण, प्रविण, धुरंधर, पुरस्कर्ता.
चष्मा, स्पेक्टेकल् : अुपनेत्र.
चैन : विलास गम्मत, आराम.
चेहरा : मुद्रा, तोंडावळा.

ज

जाहिरात : विज्ञापन, प्रसिद्धक.
जमीन : भू, भुअी.
जमीन अस्मान : आकाश पाताळ.
जामीन : प्रतिभू.
जबर : प्रबळ, बलाढ्य, दांडगा.
जिमखाना : क्रीडांगण, क्रीडानगर.
जरूरी : आवश्यकता.
जरूर : अवश्य.
जबरी संभोग : बलात्कार, आस्कंदन.
जुलूम : अन्याय, छळ, प्रपीडन, पीडा, बलात्कार.
जुलमी : पीडाजनक, छळक.
जखम : दुखापत, घाव, व्रण, क्षत.
जखमी : घायाळ, आहत.
जमीनजुमला : शेतीवाडी.
जासूद : हेर, चार, दूत.
जहाज : जलयान, नौका, तारूं.
जबाबदारी : अुत्तरदायित्व, भार, दायित्व.
जबानी : कथन, वक्तव्य.
जिन्नस : वस्तु, पदार्थ.
जबरदस्त : प्रबळ, दांडगा, दंडम, बलवत्तर.

ट, ड

ट्रस्ट : निक्षेप, न्यास, ठेव.
ट्रस्टी : अभिभावक, पालक, विश्वस्त.
टेंडर : भावपत्र.
ट्रस्टडीड : निक्षेप पत्र.
डिफमेशन : अपकीर्त्ति.
डेपो : भांडार.
डिनॅमिक लीडरशिप : गतिमान नेतृत्व.
डॅश (dash) : अनुषंगक (लेखनांत हा शब्द नेहमीं येतो.)
डिस्पेन्सरी : औषधालय किंवा वितरणालय.
ड्रेस : वेश (फुलड्रेस=भर-वेष, संगतवेष.)
डायरी : दैनंदिनी, आन्हिकी, दैनिकी.
डिनॅमिक : गतिमान, स्फोटक.
डिव्हिडंड : भागांश, भाज्यांश.

### त

तयार : सिद्ध, पूर्ण, सज्ज, सन्नद्ध.
(पूर्वतयारी : पूर्वसिद्धता, पूर्वव्यवस्था, पूर्वसज्यता.)
तब्येत : प्रकृति, स्वास्थ.
तपासणी : चौकशी.
ताबा : सत्ता.
तूर्त : सध्यां.
ताबा घेणें : हस्तगत करणे, हाती असणे.
तहाहयात : आजीव, आजन्म, यावज्जीव.
तारीख : दिनांक.
तोतया, अिंपोस्टर : मिथ्यारूपी, खोटा.
तपासणे : निरीक्षणे.
तक्रार : गाऱ्हाणे, प्रतिवाद, कुरकर.
ताकद : शक्ति, सामर्थ्य.
तहाहयात : यावज्जीवन, आमरण, आजन्म, आजीव.
तह : संधि, समेट.
तपशील : स्फुटीकरण, विवरण, विवरा.
तुफान : वादळ, वादळी (विशेषण).
तऱ्हा : रीति, प्रकार.
तालीम : कसरत, व्यायाम, शिक्षण, अभ्यास.
ताकीद देणे : आज्ञा देणे, सावध करणे. सावधानी (नाम).
ताजीम : अभ्युत्थान.
तपास : शोध.
तपासणे : शोधणे, अन्वेक्षणे, निरीक्षणे.
तपासनीस : परीक्षक, निरीक्षक.
तख्त : सिंहासन.
तपकीर : नस्य, नस.
तसबीर : आलेख्य.
तर्फे : वतीनें द्वारा, बाजूने.
दुवा : धन्यवाद, आशीर्वाद.
दरम्यान : मध्यंतरी.
दोस्त : मित्र, सुहृद्, जिवलग, वयस्थ.
दवाखाना : औषधालय.
दस्तुर खुद्द : स्वाक्षर, स्वहस्त.
दर्या : नदी, समुद्र.
दगलबाजी : कापट्य, विश्वासघात.
दर्जा : प्रत, प्रतिष्ठा, स्थान.
दिल : हृदय, अंतःकरण, मन.
दिलगिरी : दुःख, पश्चात्ताप, विषण्णता.

### न

नकलाकार : सोंगाड्या, अनुकारिक.
निगेटिव्ह : अकारात्मक, अकरणात्मक. नकार धंटा.
निरूल्ष्करीकरण : निःसैनिकीकरण.
नशिब : दैव.
नकाशा : मानचित्र.
नंबर : क्रमांक.
नशीब : दैव, भाग्य, कर्म.
नाअीलाज : निरुपाय.
नजर (Present) : भेट, अुपायन, अुपहार पुरस्कार.
नजर करणे : सादर करणे.
नुकसान : हानि, तोटा.
नजीक : जवळ, सन्निध.
नेस्तनाबूद : विनष्ट, निर्मूल.
निसबत : संबंधी.
नापास : अनुत्तीर्ण, असंमत (ठराव अित्यादि).
नरव्हस : बावरणे, घाबरणे.
नंबर : क्रमांक, अंक.

नकाशा : मानचित्र, आकृती.

प

पार्टी : पंगत (भोजनाची.)
पास : अुत्तीर्ण.
पोषाख : वेष, वसन.
पारिग्राफ : छेदक, अनुवाक्.
प्लॅटफ़ार्म : चवुतरा (स्टेशन अित्यादि स्थानाचा), मन्च (सभामन्च) वाक्पीठ. अुच्चासन, वेदी.
पेन्शन : भृति, बिदागी, पोषण, निवृत्तिवेतन.
पागा : अश्वशाळा.
पेन्शनर : सेवानिवृत्त.
पेटंट : निजस्व, रामबाण.
पेंटर : रंगकार, रंगारी, चित्रकार.
पार्लमेंट : संसद, लोकसभा.
पोलीस : आरक्षक.
प्रिॲम्बल : मुखबंध.
पर्सनॅलिटी : व्यक्तिमत्व.
प्रिलिमिनरी : पूर्वपरीक्षा.
पब्लिक : जनिक, सार्वजनिक.
प्रेस : मुद्रापीठ.
प्रेस ॲन्ड प्लॅट फार्म : मुद्रापीठ आणि वाक्पीठ.
प्रॉमिसरी नोट : वचन पत्र.
पेअींग गेस्ट : सशुल्क अतिथि, खाणावळ्या (मुंबअीतील कामकरी लोकांत हा शब्द रूढ आहे.).

फ

फायदा : लाभ.
फोनोग्राफ : ध्वनिलेख.
फाअुंटनपेन : झरणी.
फॅशन : टूम.
फाअील : धारिका.
फाअिल : टांचण, आवली, ओळ, पंगत.
फिकीर : चिंता, काळजी.
फक्त : केवळ, मात्र.
फत्ते : जय.
फी : शुल्क, (शाळेत, न्यायालयांत अित्यादि); पुरस्कार, देय (डॉक्टर अित्यादि विषयीं); वेतन.

ब

बेहत्तर : अनुकूल, फार चांगलें, ठीक.
बेअिज्जत : अपमान, अमर्यादा, अप्रतिष्ठा.
बेअब्रू : मानहानी, अप्रतिष्ठा.
बेअब्रूची फिर्याद : मानहानीचा खटला, अभियोग.
बाजार : हाट.
बिलकुल : अगदीं, समूळ.
बक्षीस : पारितोषिक, अुत्तेजक, अुपहार.
बेलाशक, खूशाल : निःसंकोचपणें, निर्भयपणें.
बेहोष : बेभान, बेशुद्ध.
बहाद्दर : वीर, शूर पठ्ठा. (भलेबहाद्दर– भलेपठ्ठे !
बिल : आकारणी, मूल्यदेयक, देयक.
बाब : गोष्ट, प्रकरण, विषय.
बाबत : संबंधीं विषयीं, प्रकरणीं.
बोनस : लाभांश.
बजेट : अर्थसंकल्प.

बरोबर : सह, समवेत, ठीक.
बरोबर : विषयीं, प्रकरणीं, संबंधी गोष्टींत.
बद्दल : संबंधी, विषयीं, प्रकरणीं.
बदल : पालट, परिवर्तन.
बेफिकीर : बेधडक, निर्भय, निशंक, निश्चास्त, निडर, निर्भीक.
बुकसेलर : पुस्तकविक्रेता, विक्रेता.
बुकडेपो : ग्रंथ भांडार, पुस्तक भांडार
बडतर्फ : पदच्युत.
बेमालूम : न कळतां.
बरखास्त : विसर्जन.

म

मालमत्ता : भत्ता, रिक्त.
मार्फत : वतीनें विद्यमानें, द्वारा.
मटन : सागुती.
मैदान : पटांगण.
माजी : विगत, मागील, भूतपूर्व.
मुद्दा : विधेय.
मुद्देसुद : सूत्रबद्ध.
मुद्दाम : हेतुतः हेतुपूर्वक.
मुत्सद्दी : कारस्थानी.
मजल : टप्पा.
मरहूम : परलोकवासी, दिवंगत, मृत्युंगत (जे लोक परलोक मानीत नाहींत त्यांच्यासाठीं मृत्युंगत).
मेनू : पदार्थिका (अुपहारगृहांतील).
मतलब : सारांश, मर्म, स्वार्थ.
मसाज : चोळणें, संवाहन, मर्दन, संमर्दन.
म्याग्निफाअिंग : दृक्वर्धक.
मार्फत : वतीनें, द्वारा.
मातबर : श्रीमंत, संपन्न.
मोहीम : अभियान.
म्युनिसिपालटी : नगरपालिका.
म्युनिसिपल कॉर्पोरेशन : महापालिका
मेयर : महापौर.
मेयर (डेप्युटी) : अुपमहापौर, अुपपौर.
मोनोपॉली : अेकस्व, अेकहाटी.
मसाजिस्ट : संवाहक.
मिनिट्स ऑफ अे मिटिंग : टिप्पण.
मॉनर्की : राजसत्ता.
मेमोरांडम : आवेदनपत्र.
मास्टर : शिक्षक, गुरुजी.
मास्टर : कुमार, किशोर.
मिस : कुमारी, किशोरी.
मार्जिन : समास, कोर.
मोका : संधि, प्रसंग.
मंजूर : संमत, अनुमत, मान्य.
मुक्काम : टप्पा, ठिकाण, निवास.
मेजवानी : जेवणावळ, पंगत, भोजन.
मुष्किल : कठिण, कठिनाअी, अडचण.
मोबदला : प्रतिमोल, विनिमय.
मालक : धनी, स्वामी.
मालकी : स्वामित्व.
मुलख : देश, विदेश.
मुलखगिरी : देशाक्रमण, स्वारी.
मर्जी : अिच्छा, लहर.
मुक्रर : स्थिर, निश्चित.

मना : निषेध.
मुबलक : पुष्कळ, समृद्ध.
मुदत : अवधि.
मातब्बरी : थोरवी, प्रतिष्ठा.
मदत : सहाय्य, आधार.
माफी : क्षमा.
माल : वस्तुजात, सामान.
मेहेरबान : महाशय, कृपावंत.
मेहेरबानी : कृपा, दया, आभार.
मजकूर : लिखाण, विषय, वक्तव्य, लेख्य, आशय.
मेजवानी : जेवणावळ, भोजन, भोज.
मिशन : प्रचार-केंद्र, प्रचारसंघ, कर्तव्य.
मिशनरी : प्रचारक, नियोजित.
मार्टिर, शहीद (Martyr) : हुतात्मा.

य

युनिफार्म : गणवेश, समवेश.
यादी : टिपणी, टांचण, स्मरणी, तालिका.
याद राख : ध्यानांत धर ! समजून अैस ! !

र

रियासत : राजवट, सत्ताकाल.
रब्बी : वैशाखान्न, वैशाखी पीकें. हिवाळी पिकें.
रेकॉर्ड (प्लेट) : तबकडी, ध्वनिमुद्रिका.
,, संग्रह.
,, अुच्चांक, विक्रम. (अुच्चांक पटकावला).
रिस्टवॉच : हातघडी.
रेडिओ : नभोवाणी.
रिडींग रूम : वाचनालय.
रिफ्रीजीयेटर : शीतळी, शीतगृह.
रिपब्लीक : प्राजक, लोकसत्ता.
रेकमेंडेशन : प्रशस्ती, भलावण, अनुरोध
रेसिग्नेशन, राजिनामा : त्यागपत्र.
रोजनिशी : दैनंदिनी आन्हिकी, दिनलेखा, दैनिकी.
रिवाज : रीति, चाल, प्रघात, परिपाठ.
रजा : सुटी, निरोप, अवधि, अवसर.
रवानगी : प्रेषण, धाडणें, पाठवणी.
रुजू : दाखल, अुपस्थित.
राजी : संतुष्ट.
रंगीत तालीम : रंगप्रयोग, पूर्वप्रयोग.
रुजूवात : मेळ, पडताळा, मेट.
रेस्टारंट (हॉटेल) : अुपहारगृह, खाणावळ, भोजनालय.

ल

लवाजमा : परिवार.
लायक : योग्य.
लायब्ररी : ग्रंथालय.
लायब्ररीयन : ग्रंथपाल.
लीव्ह, रजा : अवसर, अवधी, सुटी.

व

व : नि, आणि.
वगैरे : अित्यादि.
वहिवाट : भोगवटा, वापर.
वसुली : अुगराणी.
वहिम : संशय, शंका.
वस्ताद : शिक्षक, गुरु, अध्यापक.
वन्समोअर : पुनश्च ! पुनश्च !!

श

शोक : हौस, विलास, छंद.
* शेम : धिक्कार.
शाहीर : राजकवी, भाट, कवी.
शिताफी : कौशल्य, चलाखी.
शाबूद : सुरक्षित, अखंड, अक्षुण्ण.
शिकार : पारध, मृगया.
शागीर्द : शिष्य, सेवक, अनुचर.
शागिर्दी : परिचर्या, सेवा.
शिकस्त : पराकाष्ठा.
शिकारी : मृगयु, पारधी.
शिफारस : अनुरोध, प्रशस्ति.
शिफारसपत्र : प्रशंसापत्र, प्रमाणपत्र.
शाबास : भले ! धन्य ! वाहवा.
शिक्का : मुद्रा.
शिवाय : विना, व्यतिरिक्त, वांचून.
शर्यत : चोडदौड, स्पर्धा, चढाओढ, पैज.

स

सनद [जहागीर आदीची] : अधिपट.
सनद : (वैद्यकीय, विधिज्ञकी आदिव्यवसायांची) अधिपत्र.
सल्ला : समादेश.
सल्लागार : समादेशक.
सुरू : चालू.
सुरुवात : आरंभ.
साली : वर्षी.
सालाबादप्रमाणें : प्रतिवर्षाप्रमाणें.
सदरहू : वरील, अुपरोक्त.
सही : स्वाक्षरी.

* सभांमधून "शेम ! शेम !" म्हणून ओरडण्याचा प्रघात पडलेला आहे; परंतु तो अिंग्लिश शब्द मुळींच आवश्यक नाहीं. त्या अर्थीं "धिक्कार ! धिक्कार" हा आपला पूर्वींचा शब्द वापरावा, धिक्कार शब्द अर्थानुकूल ध्वनीनें अधिक युक्त आहे आणि गर्जनानुकूल आहे. म्हणून सभांतून "धिक्कार !" असेंच विरोधार्थीं ओरडतांना ओरडावें. त्याचप्रमाणें "हिअर"— "हिअर" ओरडण्याचीहि विचारशून्य पद्धत मोडावी. अैका ! अैका ! असें म्हणणें काय कठीण आहे ? आम्हां स्वतःस असे लोक माहित आहेत कीं ज्यांना हिअरचा अर्थ कळत नाहीं पण ते तो शब्द ओरडतात "अैका !" हा शब्द सर्वांस कळेल तरी !

* साहेब : सेठ, महाशय.
साहेब : राव, पंत [तात्यासाहेब अण्णासाहेब असें न म्हणतां तात्याराव, दादाराव, अण्णाराव.].
सेक्रेटरीअेट : सचिवालय.
सर्चलाअीट : शोधज्योत.
स्ट्रेचर : पसरी.
सोकॉल्ड : तथाकथित.
सर्टीफिकेट : प्रमाणपत्र.
स्टॉप : थांबा.
स्टँड : तिठ्ठा, तळ, अड्डा.
सिंबॉलिक : प्रतीकात्मक.
स्टेशन : स्थानक.
स्टेशनमास्तर : स्थानकपाल.
सिग्नल : वाहुटा, वावटा.
सस्पेन्ड : अपसृत.
सस्पेन्शन : अपसरण.
सेकण्डहँड : आडहाती, आडगिन्हाअिकी.
स्टॉल : पाल, मांडणी.
साल मजकूर : चालू वर्ष, वर्तमान वर्ष.
साल गुदस्त : गत वर्ष.
सुमारें : जवळजवळ, तर्कानें, कांहीं.
सीनसीनरी : दृश्यें देखावे
स्टेज : रंगभूमी, रंगमंच.
सनदशीर : (राजकीय अर्थी) वैध नैर्बंधिक.
सर्टिफिकेट : प्रमाणपत्र, प्रशंसापत्र, परिचय पत्र.
सॅनिटोरियम : आरोग्यालय.

ह

हॉस्पिटल : रुग्णालय.

---

* साहेब याचा अर्थ स्वामी. मद्रासकडे अजूनहि मोठीं माणसें आलीं म्हणजे आपण जसें "या साहेब!" म्हणून म्हणतों तसें "या स्वामी! काय स्वामी!" असे प्रयोग करतात. आपल्या अिकडे माधव, नारायण अित्यादि शब्दांमागें "राव" हा सन्मान्यार्थी शब्द लावतात, कधीं पंत अित्यादि लावतात; परंतु टोपण नावांस मात्र बहुधा तीं नावें द्व्यक्षरी असतात तेव्हां साहेब हा शब्द लावण्याची आम्हांस चटक लागून गेली आहे. जसें तात्यासाहेब, नानासाहेब अित्यादि, पण ही सोडावी. अितरत्र लावतां तसा राव शब्द त्यासहि लावावा. तात्याराव, नानाराव, भाअुराव असें म्हणण्यास माधवराव वा बाजीराव म्हणण्याहून अधिक प्रत्यवाय तो काय आहे? ब्राह्मणांतहि माधवादि नावांस राव लावतातच. अुत्तर हिंदुस्थानांत आपले सत्तावनच्या क्रांतियुद्धाचे नेते शेवटचे "नानासाहेब" पेशवे यांस नानारावच म्हणतात. त्यांचे बंधूस बाळाराव म्हणत. आपणहि बापूराव म्हणतों. मग तात्या, भाअु, दादा या नावांसच या 'साहेबाचें' विलायती पंचगव्य पाजण्याचा कां आग्रह! स्वकीय हिंदुनामांस म्लेंच्छ प्रत्यय लावणें मानास्पद नसून अपमानास्पद समजलें जावें आणि तात्याराव, नानाराव असे प्रयोग करावे. आठ दहा दिवसांच्या अुपहासानंतर ते रूढ होतील; जसे बापूराव, बाजीराव हे रूढ आहेतच तसें.

हद्द : सीमा, पराकाष्ठा, मर्यादा.
हवा : वायु, वारा.
हवापाणी : जलवायु, वारापाणी.
हवामान : वायुमान, ऋतुमान.
हवापालट : वारेपालट.
हयात : अस्तित्वांत, विद्यमान, वर्त्तमान.
हजर : अुपस्थित, प्रत्यासन्न.
हजेरी : अुपस्थिति, विद्यमानता.
हजाम : न्हावी, नापित.
हजामत : स्मश्रू, डोअी करणें.
हुशार : तरतरीत, चाणाक्ष, चलाख, प्रज्ञावान, बुद्धिमान.

हल्लीं : सध्यां, आजकाल, प्रस्तुत, सांप्रत.
हवा : वायु.
हवामान : वायुमान.
हवाअी : आकाशी.
हवापाणी : जलवायु (हिंदी, बंगालींत रूढ).
हुकमत : स्वामित्व, आज्ञाधिकार, प्रभुत्व.
हयात : विद्यमान, जिवंत.

● ●

## परिशिष्ट १

# भाषाशुद्धि विषयक मराठींतील कोश

१. **राजव्यवहारकोश**— मुसलमानांच्या अनेक शतकांच्या आक्रमक राजवटीमध्ये आमच्या भाषेंत आणि विशेषतः तींतील शासन नि प्रशासन विषयक विभागांत मुस्लिमांच्या बळावर घुसून घर करून राहिलेल्या अरबी फारशी अित्यादि परकी शब्दांना—ज्यांना आम्हीं सोकऱ्यासाठीं अुर्दू या नांवेंच संबोधित असतों त्यांना—मराठींतून हेतुपूर्वकच काढून टाकून त्या त्या स्थलीं आपले संस्कृत वा प्राकृतनिष्ठ स्वकीय शब्द पुन्हां स्थानापन्न करण्याची पहिली राजाज्ञा म्लेंच्छराज्यांचा अुच्छेद करून हिंदुपद पादशाहीची स्थापना करणाऱ्या श्रीशिवछत्रपतींनीं जेव्हां दिली तेव्हां त्या कामीं त्यांनीं नियुक्त केलेल्या त्यांच्या रघुनाथ पंडित नांवाच्या अमात्यवर्यानें जो 'राजव्यवहार कोश' रचला त्यालाच भाषाशुद्धिविषयक मराठींतील पहिल्या कोशाचा मान दिला पाहिजे. त्या कोशाच्या प्रस्तावनेंचे कांहीं श्लोक ह्या पुस्तकाच्या आरंभींच आम्ही दिले आहेत. त्यांतच मराठींत घुसलेल्या म्लेंच्छ शब्दांच्या अुच्छेदार्थच तो कोश रचला गेला हें स्पष्टपणें सांगितलें आहे.

हा कोश पुण्याच्या अितिहास संशोधन मंडळानें पूर्वीं प्रकाशित केला होता. अलिकडे तो अगदीं दुर्मिळ झालेला होता. परंतु मराठवाडा साहित्य परिषदेनें तो कोश संपादून गेल्यावर्षी (सन १९५६ मध्ये) पुन्हा प्रकाशित केला आहे या प्रकाशनाविषयीं मराठवाडा साहित्य परिषदेचें आम्हीं मनःपूर्वक अभिनंदन करतो. त्याचें संपादन चिकित्सा पूर्वक परिश्रमानें केल्या विषयीं श्री. रा. गो. काटे हेहि प्रशंसेस पात्र आहेत.

२. **वीर सावरकरांचा शुद्ध शब्द लघु कोश**— शिवछत्रपतींच्या पुरस्कारानें लिहिलेल्या वरील राजव्यवहार कोशानंतर परकीय अुर्दू शब्दांना मराठींतून शक्य तों काढून टाकण्याची स्पष्ट प्रतिज्ञा करून जी दुसरी अुठावणी झाली ती म्हणजे भाषा शुद्धीच्या प्रचाराचा नि आचाराचा धूमधडाका अुडवून देणारी वीर सावरकरांची





चळवळ होय. त्या प्रचारांत त्यांनीं मराठी भाषेचें शुद्धीकरण नांवाची जी पुस्तिका सन १९२६ मध्यें लिहिली तिचे शेवटीं 'त्याज्य विदेशी शब्दांचे टांचण' या नांवाचा अेक स्वकीय शब्दांचा लघुकोश दिलेला आहे त्याचें जें वैशिष्ट्य– आहे तें हें कीं त्यांत केवळ मराठींत घुसलेल्या अुर्दू शब्दांनांच नव्हे तर अिंग्रजी शब्दांनाहि स्वतः वीर सावरकरांनीं जे स्वकीय प्रतिशब्द पाडलेले आहेत आणि ज्या लुप्तप्राय होणाऱ्या जुन्या स्वकीय शब्दांना पुनरुज्जीवित केलें आहे त्यांचाच काय तो मुख्यतः समावेश केलेला आहे. तोच लघुकोश आम्ही या पुस्तकांत, वीर सावरकरांनी १९२६ नंतर पाडलेल्या किंवा प्रचारविलेल्या नवीन शब्दांची भर घालून पृष्ठ १०४ ते ११६ पर्यंत छापलेला आहे.

३. **शुद्ध शब्द कोश—** भाषाशुद्धीच्या चळवळीचे अेक निस्सीम प्रचारक नि रत्नागिरीच्या भाषालिपिशुद्धिमंडळाचे अध्यक्ष श्री. अ. स. भिडे गुरुजी यांनीं १९३७ मध्यें बहिष्कार्य अशा अुर्दू शब्दांचा आणि त्यांना योजलेल्या स्वकीय मराठी शब्दांचा अेक लघुकोश प्रकाशिलेला आहे. त्यास वीर सावरकरांनी प्रस्तावनाहि लिहिलेली असून हा कोश सावरकरी लिपिशुद्धींत छापलेला आहे.

४. **'बहिष्कार्य शब्दांचा कोश'—** वीर सावरकरांच्या भाषाशुद्धीच्या चळवळीचे प्रथमतः अेक प्रमुख विरोधक असलेले परंतु पुढें त्या चळवळीचें मर्म मनाला पटतांच भाषाशुद्धीचा प्रकटपणें नि प्रबळपणें पुरस्कार करण्याचें धैर्य दाखविणारे कै. माधवराव पटवर्धन यांनीं **'भाषाशुद्धी विवेक'** या नांवाचें जें अभ्यसनीय पुस्तक सन १९३८ मध्यें प्रसिद्ध केलें होतें त्याच्या शेवटीं हा **'बहिष्कार्य शब्दांचा कोश'** त्यांनीं प्रसिद्धिलेला आहे. मराठीमध्यें आज जितके परकी अुर्दु शब्द घुसलेले आहेत त्यांतील बहुतेक शब्द या कोशांत दिलेले असून त्यांना यथायोग्य मराठी प्रतिशब्द दिलेले आहेत. ह्या कोशामुळें 'फलाण्या अुर्दू शब्दास कोणता स्वकीय प्रतिशब्द योजूं' अशी आळशी पृच्छा करण्याचें कोणासहि कारण अुरलें नाहीं.

५. **श्री. सयाजी शासन शब्द कल्पतरु—** यद्यपि या कोशाचा प्रकट अुद्देश विदेशी शब्द स्वकीय हिंदु भाषासंघांतून काढून टाकण्याचा नाहीं आणि यद्यपि ह्या कोशांत केवळ राज्यशासन आणि प्रशासन या शास्त्रांतील अिंग्रजी शब्दांनाच काय ते स्वकीय प्रतिशब्द दिलेले आहेत तथापि हा कोश अितका शब्दसंपन्न आणि विस्तृत आहे कीं त्याचा नामोल्लेख करणें आणि तो कोश ज्यांच्या आज्ञेनें नि आश्रयानें प्रसिद्ध झाला त्या श्री. सयाजी महाराज गायकवाड यांचेंहि वाङ्मयऋण स्मरणें हें भाषाशुद्धीच्याहि दृष्टिकोनांतून पहातां आमचें अेक कृतज्ञ कर्तव्यच आहे.

---